# नावडतीं मुलें

शरच्चंद्र दामोदर गोखले
बी. ए. डिप. एस्. एस्. ए.



किंमत तीन रुपये

चित्रशाळा प्रकाशन, पुणें २

'ज्यांचा आशीर्वाद ह्याच माझा आधार'

त्या

ती. माई व बाबूराव यांना

अ र्प ण

# प्रस्तावना

श्री. द. वि. कुलकर्णी एम्. ए. एम्. एस्सी (कोलंबिया) डिप्. एस्. एस्. ए.
( चीफ इन्स्पेक्टर ऑफ सर्टिफाइड स्कूल्स मुंबई राज्य. )

" मूल आणि फूल " ह्या दोन गोष्टींची तुलना करण्याचा संकेत प्राचीन काळापासून चालत आला आहे. "वंशवृक्षाला आलेलीं सुकुमार फळें" अशा लालित्यानें मुलांविषयींचा उल्लेख आपणांस गतिमान् रूढींतहि आढळून येतो.

" मूल " ह्या शब्दाचा प्रयोग केल्याबरोबर आपल्या मनांत कितीतरी मधुर गोष्टींच्या संवेदना उत्पन्न होतात ! भगवान् गोपालकृष्णाचें बालपण एखाद्या सहृदय माणसाच्या हृत्पटलावर उभें राहील. भगवान् रामचंद्राची पितृभक्ति कित्येकांना आकर्षित करील, तर भक्तोत्तम ध्रुवबालाची तपस्या आणि कुमार एकलव्याचें गुर्वाराधन कांहीं सहृदयांच्या मनाचा ठाव घेईल. निरागस प्रेमाचा आविष्कार करणारें मुखकमल, भवितव्यतेच्या अज्ञात गिरि-कुहरांचें जणूं शोधन करणाऱ्या नेत्रदीपिका, कुंदाच्या कळ्यांनाहि लाजावि-णाऱ्या दंतपंक्ति, आणि प्राचीच्या अरुणप्रभेसहि लाजविणारें निरलस बालहास्य कोणाला मोहित करणार नाहीं !

क्षणभर हा कल्पनाविलास बाजूला ठेवला आणि तर्काच्या निकषावर बालत्वाचें महत्त्व घासून पाहिलें तरी त्याची महती रतिमात्र कमी ठरत नाहीं. आजचीं गोजिरवाणीं मुलें हीं उद्यांचे नागरिक होत. वर्धमान राष्ट्रवृक्षाचें सिंचन करून त्याचें प्रवर्धन करणाऱ्या अमृतधारा म्हणजे आजचीं मुलें. आमच्या ह्या सार्वभौम प्रजासत्ताक राज्यमंदिराचे सुवर्णस्तंभ म्हणजे आजचीं मुलें. दिगंतरांत आमच्या मातृभूमीच्या ऐश्वर्याचा निनाद उठविणारी महाशक्ति म्हणजे आजचीं मुलें.

दैवदुर्विलास मात्र असा कीं ह्याच महाशक्तीचा विकास आमच्याकडून पूर्णतया होत नाहीं. नव्हे—समाजांतील ह्या महान् घटकाची जोपासना, संवर्धन आणि संयोजन ह्यांच्याविषयीं अद्यापहि आम्ही निश्चिंत आहोंत. समाजांतील निरनिराळ्या थरांवर दृष्टिक्षेप केला तर पुष्पवाटिकेंत गळून, चुरगळून, वाळून गेलेल्या फुलांचीच आठवण येते. ह्या कोमेजून गेलेल्या फुलांस, कोणाला

माहीत किती फुलें दारिद्याच्या प्रखर तापानें खालीं गळून पडलीं असतील, कोणाला माहीत किती व्याधिग्रस्त अवस्थेंत निखळून निघालीं असतील, कोणाला माहीत किती कलिकावस्थेंत कालानें खुडून टाकलीं असतील अन् कोणाला माहीत किती अज्ञातावस्थेंतच विराम पावलीं असतील.

राष्ट्रीय संयोजनाच्या काळांत अशा अभागी पुष्पांचा सुसंचय करून त्यांची पूजा राष्ट्रदेवतेवर बांधतां येणार नाहीं कां ? इतर सुसंस्कृत देशांत ज्याप्रमाणें जाणूनबुजून प्रयत्न करून समाजाच्या ह्या महत्त्वपूर्ण घटकांची जोपासना केली जाते त्याप्रमाणें आमच्या ह्या सुसंस्थित देशांतहि प्रयत्न करतां येणार नाहीं कां ? सुदैवानें भारतवर्षांतील समाजपुरुषाची दृष्टि ह्या नवीन दालनाकडेहि वळली आहे. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर भारताच्या संविधानांत अशा अभागी मुलांचें कल्याण हें राष्ट्राचें एक धोरण म्हणून मानण्यांत आलें आहे. आणि त्या अनुरोधानें आमचे राज्यधुरंधर ह्या क्षेत्रांतहि नवनवीन योजना आंखीत आहेत.

ह्या ठिकाणीं एक गोष्ट नमूद करावीशी वाटते ती अशी कीं भारताच्या-विस्तीर्ण आणि कोटि कोटि कंठनिनादित भूमींत राहणाऱ्या असंख्य बालकांचें कल्याण साधणें ही साधारण गोष्ट नव्हे. निमिषार्धांत हें ध्येय सिद्ध होणें अशक्य, पण एक गोष्ट मात्र खरी कीं स्वातंत्र्याच्या प्राप्तीनंतर समाज-कल्याणाच्या ह्या विशिष्ट दालनांत एक प्रकारचें अभिनव व अभूतपूर्व असें संचालन सुरू झालें आहे.

निरनिराळ्या राज्यघटकांनीं मुलांसंबधींचीं विधेयकें पुढें आणलीं आणि उपरिनिर्दिष्ट निर्माल्यवत् समजल्या जाणाऱ्या समाजाच्या पुष्पवाटिकेंतील वाया जाणाऱ्या फुलांविषयीं सामान्य जनतेंत एक कुतूहल निर्माण केलें.

ह्या वैचित्र्यपूर्ण सामाजिक घटनेचा साद्यंत इतिहास भारतांत अद्याप लिहावयाचा आहे. इंग्रजी भाषेंत ह्या विषयांवर भारतीय परिस्थितीला धरून असें फारच थोडें वाङ्मय उपलब्ध आहे. आणि मराठी वाङ्मयांत तर प्रस्तुतचा ग्रंथ हा पहिलाच असें म्हणण्यास मुळींच प्रत्यवाय नाहीं. त्या दृष्टीनें माझे सहकारी श्री. शरच्चंद्र गोखले ह्यांनीं अग्रपूजेचा मान मिळविला असें माझें प्रांजळ मत आहे. निदान ह्या विषयापुरतें तरी त्यांनीं अनुभवी अशा वाटाड्याचें काम केलें आहे आणि मागाहून होणाऱ्या आणि होऊं घात-लेल्या ह्या विषयावरच्या वाङ्मयकृतींना उत्तम दिग्दर्शन केलें आहे. मला आशा

आहे कीं ह्या विषयांतील तज्ज्ञ व अनुभवी समाजसेवक आपले अनुभव भावी वाङ्मयांत ग्रथित करतील आणि आतांपर्यंत उपेक्षिलेल्या ह्या क्षेत्रांत एकाहून एक अशी वरचढ भर घालतील.

श्री. गोखले ह्या विषयाचे व्यासंगी आहेत. त्यांनीं ह्या विषयाचीं अंगोपांगें अभ्यासण्याचा निरलस बुद्धीनें प्रयत्न केला आहे, हें त्यांच्या ह्या पुस्तकांतील विवेचनावरून अगदीं स्पष्ट आहे.

आतां एक गोष्ट मात्र खरी कीं ह्या विषयाचा विस्तार पाहतां एका लहानशा ग्रंथांत आणि तेंहि शास्त्रीय परिभाषेचें बंधन पाळून साकल्यानें विचार करणें हें कार्य जरा दुर्घट आहे. पण श्री. गोखले ह्यांनीं शक्य तितका प्रयत्न करून ह्या मर्यादाहि पाळल्या आहेत आणि विहंगावलोकनाची शैली स्वीकारून विषयाचें दिग्दर्शन पण योग्य तसें केलें आहे. कांहीं ठिकाणीं परिभाषेविषयीं किंवा शास्त्रीय सिद्धान्ताविषयीं कदाचित् कांहीं वाचकांचा त्यांच्याशीं मतभेद होण्याचा संभव आहे. पण एका लहान ग्रंथांत एका मोठ्या विषयाचें कोंदण करणें ही एक करामत आहे. त्यांतूनच परकीय अशा शास्त्रीय परिभाषेचे पैलू विषयाला पाडून मग तो कोंदणांत बसविणें हें कार्य जरा कठिणच. पण इतकें असूनहि श्री. गोखले ह्यांनीं ह्या कौशल्यपूर्ण कार्यावर किती श्रम घेतले आहेत, ह्याची जाणीव वाचकांना पदोपदीं आल्यावांचून राहणार नाहीं.

समाजांत प्रत्यहीं आढळून येणारीं नावडतीं अपंग, मनोविकृत, उन्मार्गी ( Delinquent ) अशा सर्वसाधारण उपेक्षित मुलांच्या परिस्थितीविषयीं विवेचन करून श्री. गोखले यांनीं त्यांच्या मानसिक, सामाजिक आणि वैधानिक बाजूंचा शक्यतोंवर खोल असा विचार केला आहे. ह्या प्रश्नाचें प्रश्नांला दुसरीहि एक बाजू आहे आणि ती म्हणजे समाजशास्त्रदृष्ट्या ग्रामीण आणि नागरी असें आणखी एक नवीन वर्गीकरण करून ह्या यथातथ्य दिग्दर्शन करणें. स्थलाभावामुळें ह्या प्रकारचा विचार करण्याचा मोह श्री. गोखले यांना आवरावा लागला असेल. पण भारतासारख्या कृषिप्रधान देशांत हा प्रश्न ह्याहि बाजूनें अभ्यासिला जाणें हें आवश्यक आहे. ह्या ग्रंथाची द्वितीयावृत्ति निघेल त्या वेळीं माझी खात्री आहे कीं ह्या सूचनेचा लेखकांकडून अवश्य विचार केला जाईल. वस्तुतः

नागरी जीवनांतले प्रश्न आणि ग्रामीण जीवनांतले प्रश्न ह्यांत मूलतःच भेद असणें स्वाभाविक आहे. त्यांतच आचार, विचार, आर्थिक परिस्थिति ह्यांचाहि परिणाम मानवी मनाची विशिष्ट अशी ठेवण बनण्यांत होत असलाच पाहिजे. आणि त्या दृष्टीनें भारतांतहि विचार होणें आवश्यक आहे. इंग्लंड, अमेरिका इत्यादि प्रगत पाश्चिमात्य राष्ट्रांतील ह्या विषयावरची विचारसरणी आम्हां भारतवासियाना कांहींहि फेरबदल न करता लागूं होणार नाहीं. म्हणूनच भारताच्या सांस्कृतिक, भौगोलिक, आर्थिक आणि तदनुषंगिक अशा इतर बाबींचा विचार केल्यानंतर हें स्पष्ट होईल कीं श्री. गोखले ह्यांनीं विवरण केलेल्या विषयाबद्दलची ही विशिष्ट दृष्टि आम्हाला ह्या क्षेत्रांत ठेवणें आवश्यक आहे. किंबहुना आम्हांला आमची विशिष्ट अशी, नवीन प्रणाली ह्या विषयांतहि रूढ करावयाची आहे. आणि ह्या अनुरोधानें ह्या विषयावर अद्याप ग्रंथनिष्पत्ति व्हावयाची आहे.

श्री. गोखले ह्यांचा हा ग्रंथ ह्या भावी प्रणालींचा पाया असें समजल्यास त्यात वावगें होणार नाहीं. श्री. गोखले ह्यांनीं दहाव्या व शेवटच्या प्रकरणांत ह्या क्षेत्रांत प्रत्यक्ष कार्य करीत असलेल्या कर्मचारी वर्गास अत्यंत महत्त्वाच्या अशा सूचना पण केल्या आहेत. तसेंच विषय नवीन असल्यानें ह्या कार्याची प्रक्रिया समजावून सांगणेंहि त्यांना क्रमप्राप्तच होतें. भावी काळात ह्या विषयांसबंधीचें जें वैचारिक आंदोलन निर्माण होणार आहे त्या दृष्टीनें पण श्री. गोखले ह्यांचा हा प्रयत्न स्तुत्य आहे.

ह्या क्षेत्राशीं संबंध असणाऱ्या समाजसेवकांना सोयीचें पडावें म्हणून मुंबई-राज्यांत ह्या कार्याचा विस्तार किती आहे ह्याची रूपरेखा श्री. गोखले यानीं सादर केली आहे. ह्या कार्याचा विस्तार वाढत आहे आणि म्हणून ग्रंथांत निर्दिष्ट केलेली माहितीहि बदलत जाणार हें खरें आहे. तथापि सर्वसाधारण वाचकांस निदान ह्या कामाची अद्ययावत् व्याप्ति किती आहे हें समजण्यास त्यामुळें सुलभ झालें आहे. खाजगी प्रयत्नांना ह्या सामाजिक क्षेत्रांत किती मोठें स्थान आहे ह्याचेंहि यथातथ्य चित्रण श्री. गोखले ह्यांनीं जनतेसमोर मांडलें आहे. ह्यावरून जनतेच्या अंतर्यामीं असणारा जनार्दन समाजवाटिकेंत वाया जाणाऱ्या ह्या फुलांचें संयोजन करून त्यांचा स्वीकार करण्यास उद्युक्त होईल असें वाटतें.

श्री. शरच्चंद्र गोखले ह्यांचे हातून ह्या तऱ्हेची वाङ्मयसेवा अशीच होत राहो आणि त्यांचेकडून समाजसेवेंच्या ह्या अप्रकाशित दालनाचीं अंगोपांगें उत्तरोत्तर अशींच प्रकाशित होत राहोत हीच देवाजवळ प्रार्थना.

---

# हृद्गत

कांहीं वर्षांपूर्वी टाटा समाजशिक्षण महाविद्यालयांत संशोधन करीत असतांना व नंतर व्यावसायिक समाजसेवेच्या निमित्तानें मुंबई राज्यांत फिरतांना कित्येक नावडत्या मुलांच्या जीवनकथा अभ्यासण्याचा योग आला. त्यांच्या दुःखाला वाचा फोडावी, त्यांच्या प्रश्नाचें स्वरूप स्पष्ट करावें, व जातांजातां ह्या दिशेनें काय प्रयत्न होत आहेत, काय व्हायला हवें, हें सांगण्याच्या इच्छेचें मूर्त रूप म्हणजे हें पुस्तक.

चित्रशाळा संस्था व विशेषतः श्री. दा. पां. रानडे यांच्या सहकार्याशिवाय हें कार्य शक्य झालें नसतें. प्रस्तुत विषयावरच्या पुस्तकाला त्या विषयांतील तज्ज्ञाचीच प्रस्तावना असावी हा माझा आग्रह श्री. द. वि. कुलकर्णी, जुवेनाईल व बेगर्स खात्याचे प्रमुख, ह्यांनीं पूर्ण केला.ज्यामुळें ही पुस्तकरचना होऊं शकली असें आपुलकीचें प्रोत्साहन व मार्गदर्शन श्री. गोविंद ना. हर्षे ह्यांनीं केलें.त्या सर्वांचे अंतःकरणपूर्वक आभार.

पुढील पानें वाचतांना समाजानें जवळ न केलेल्या अशा कित्येक अपंग, मनोदुर्बल, अनाथ, अनौरस व उन्मार्गी मुलांबाबत, जर आपणांला माझ्याप्रमाणेंच एकदां जरी सहसंवेदना निर्माण झाली तरी ह्या प्रयत्नाचें सार्थक झालें असें मी समजेन.

या पुस्तकांतील उदाहरणें खरीं असलीं तरी त्यांचीं नांवें व गांवें काल्पनिक आहेत.

या पुस्तकांत घातलेलीं सर्व छायाचित्रें ' युसिस 'च्या कृपेनें मिळालीं आहेत.

३४८ शनिवार पेठ, पुणें २<br>दि. १ जाने. १९५४

शरच्चंद्र गोखले

# अनुक्रमणिका

: १ :

# पार्श्वभूमि

"नावडतीं मुलें ' हा एक चमत्कारिक विरोधाभास आहे यांत शंका नाहीं. एके काळीं आपल्याकडे निपुत्रिक असणें हा कमीपणा व वांझ ही शिवी ठरत असे; अर्थात् ओघानेंच संतति हें साऱ्या घराचें आशास्थान असें. फुलांनीं वेल डंवरावा तशी शोभा भरल्या घराला मुलांची असे. साऱ्या आयुष्यभर जे कांहीं कडु गोड अनुभव वांट्याला आले त्यांचें सारसर्वस्व मुलांना द्यावें व आपल्या सुधारणेची, संस्कृतीची एक पुढची पायरी मुलांनीं गांठावी म्हणून साऱ्या वडीलधाऱ्या माणसांचे प्रयत्न चाललेले असत. किंबहुना देवळामध्यें अखंड नामसंकीर्तन चालत असतांना प्रत्येकाला शक्य असेल तेथपर्यंत त्यानें तंबोरी गळ्यांत ठेवावी व नंतर तीच तंबोरी दुसऱ्याच्या हातीं द्यावी, पण नामस्मरण मात्र अखंड, अविरत चालू ठेवावें अशाच तऱ्हेची रचना साऱ्या मानववंशाची आहे. प्रत्येक पिढीला जें जें कांहीं नवीन शिकतां आलें, नवीन निर्माण करतां आलें, त्या त्या विकासाच्या प्रयत्नांतून त्यांनीं मानव जात सुधारण्याच्या मार्गावरचा एक टप्पा गांठला व नंतर मिळविलेली भौतिक व सांस्कृतिक संपत्ति मुलांच्या हातांत देऊन मानवाच्या पुढच्या पिढीचें प्रगतीचें काम त्यांच्यावर सोंपविलें. एका ज्योतीवर दुसरी ज्योत पेटावी त्याप्रमाणेंच एका पिढीच्या अनुभवाच्या पायावर दुसरी पिढी उभी असल्यानें मानवाची प्रगति होऊं शकली. ह्या विचारा-

वरूनच मुलांच्यावर केवढी मोठी जबाबदारी आहे व त्यांच्याबद्दल केवढें प्रेम व केवढा विश्वास वडील मंडळींना वाटतो, केवढी आत्मीयता कुटुंबाला वाटते व केवढी आशा समाजाला वाटते हें स्पष्ट होतें. परंतु ह्या विचाराची जाणीव मात्र समाजाच्या अगदीं प्राथमिक अवस्थेपासून लोकांना होती असें म्हणण्याजोगा पुरावा आज उपलब्ध नाहीं. उलट पक्षीं वेगवेगळ्या कालखंडांत मुलांच्याकडे पाहण्याच्या दृष्टींत फरकच झालेला आपल्याला दिसतो.

समाजाच्या अगदीं पहिल्या अवस्थेपासून निरोगी, अव्यंग व समाजाला उपयोगी पडूं शकतील अशा माणसांना अर्थात् मुलांनाहि समाजानें मान दिला आहे. परंतु ज्या मुलांच्या वागण्यांत, मनांत व शरीरांत कांहीं दोष असेल त्यांची समाजानें उपेक्षाच केली आहे. त्या दोषांचें स्वरूप कांहीं वेळां स्पष्ट असते तर कांहीं वेळां काल्पनिक असतें. मध्य-युरोपच्या इतिहासांत तर ज्या मुलांची जन्मपत्रिका वाईट असेल त्या मुलांना ठार मारण्यांत येत असे वा टाकून देण्यांत येत असे, अशा अर्थाचे उल्लेख आहेत. भारतांतहि कांहीं विशिष्ट दोष असलेल्या मुलांना भुतानें पछाडलेलें आहे असें समजण्यांत येत असे. आजहि जन्मतः दांत आलेल्या मुलांना कांहीं भागांत अशुभ मानलें जातें. मुळावर आलेला मुलगा, पांढऱ्या पायाची मुलगी हे शब्दप्रयोग तर प्रचा-रांतच आहेत. कित्येक युगांपर्यंत मुलांच्या करितां कांहीं वेगळी व्यवस्था केली पाहिजे, त्यांच्या प्रगतीकरितां सर्व प्रकारच्या सोयी त्यांना उपलब्ध करून द्यावयास हव्यात ही जाणीवहि कोणाला नव्हती. कारण मुलांचें मन व त्याचें स्वरूप याविषयीं खरी कल्पनाच आलेली नव्हती. लहान मूल म्हणजे लहान माणूस हीच समजूत प्रचलित होती. शिवाय विसाव्या शतकापर्यंत वंशवादाचा पगडा विचारवंतांच्या मनावर असल्यामुळें, गुलाम माणसांचीं मुलें गुलाम, गुन्हेगारांचीं मुलें गुन्हेगार, शूद्राचा मुलगा शूद्र हा विचारप्रवाह होता; व त्यामुळें त्या मुलांना नेहमीं अवहेलना करून वागवण्यांत येत असे. शिक्षणशास्त्राच्या, मानसशास्त्राच्या व समाजशास्त्राच्या इतिहासांत याबाबत अनेक उदाहरणें दिलीं आहेत. पण लवकरच हा विचारप्रवाह बदलत गेला. त्याचा तो इतिहास आतां येथें प्रस्तुत नाहीं. त्याचें फलित येवढेंच की समाजाला नावडत्या असणाऱ्या मुलांच्याकडे पाहण्याचा दृष्टिकोण बदलत गेला. कोणत्याहि समाजाच्या सांस्कृतिक उंचीबाबत विचार करतांना त्या समाजांत

निरोगी, अव्यंग व शक्तिशाली नागरिकांना कोणती वागणूक मिळते यापेक्षां उपेक्षित, अनाथ व नावडत्या नागरिकांच्या करितां काय व्यवस्था केली आहे, त्यांना कोणती वागणूक मिळते यावरूनच त्याचें श्रेष्ठत्व ठरूं लागलें.

ह्या नव्या दृष्टीनें व मुलांच्या हक्काबाबत जागरूक राहणें आवश्यक आहे असें वाटल्याकारणानें विसाव्या शतकांत निरनिराळ्या विचारवंतांनीं त्या दिशेनें प्रयत्न करायला सुरुवात केली. मुलें हीच मानव वंशाच्या सुधारणेची एकमेव आशा आहे हा विचार मनांत धरूनच निरनिराळ्या आंतरराष्ट्रीय परिषदांमध्यें मुलांच्या हक्कांसंबंधीं व त्यांच्या वाढीबाबतच्या समाजाच्या जबाबदारीसंबंधीं ठराव संमत करून कार्यक्रम आंखला गेला. अमेरिकेच्या ' व्हाइट हाउस ' परिषदा, जुन्या संयुक्त राष्ट्रसंघाची ' जिनेव्हा सनद ' व हल्लींच्या ' यूनो 'च्या सांस्कृतिक व तांत्रिक कार्यक्रमांत मुलांच्या कल्याणाला दिलेला अग्रमान, ह्या सर्वांचा अर्थ एकच आहे आणि तो म्हणजे, समाजाजवळ जें जें कांहीं उत्तम आहे,—मग तें भौतिक वा सांस्कृतिक जीवन असो—त्यावर उद्यांच्या मातापित्यांचा म्हणजेच आजच्या बालकांचा पहिला हक्क आहे.

चौथ्या ' व्हाइट हाउस ' परिषदेनें मुलांच्या जपणुकीसंबंधीं जे विचार नमूद केले आहेत त्यांमध्यें " प्रत्येक मुलामध्यें,घर व त्यांत मिळणारी सुरक्षितता व प्रेम यांचा विश्वास निर्माण करणें, ज्यांना घर नाहीं त्यांना जवळ जवळ त्याच धर्तीची दुसरी कांहीं व्यवस्था करून देणें, सुशिक्षण देणारी शाळा, शारीरिक व नैतिक अवनतीपासून रक्षण करणारा व सांस्कृतिक—सामाजिक प्रगतीला मदत करणारा समाज निर्माण करणें, जीं जीं आंधळीं किंवा शारीरिक व मानसिक दृष्ट्या पंगु असलेलीं मुलें आहेत त्यांच्या रोगाची त्वरित चिकित्सा व उपचार करण्याची सोय करणें व सर्वसाधारणपणें आरोग्य, शिक्षण व इतर सुविधा प्राप्त करून देणें ही मूलतः समाजाची जबाबदारी आहे, " असें म्हटलें आहे. जवळ जवळ याच तऱ्हेचे विचार जिनेव्हाच्या सनदेमध्यें घातलेले आहेत.

( १ ) मुलांच्या आरोग्यसंपन्न वाढीकरितां आवश्यक असणाऱ्या सर्व भौतिक व सांस्कृतिक सोयी त्यांना उपलब्ध करून देण्यांत याव्या.

( २ ) जें मूल भुकेलें असेल त्याला अन्न मिळालें पाहिजे. जें आजारी असेल त्याला औषधोपचार व्हायला पाहिजे. जें उन्मार्गी आहे त्याला सुधारलें पाहिजे व जें मूल निराधार व एकटें आहे त्याला आसरा मिळाला पाहिजे.

( ३ ) संकटकाळीं पहिली मदत मुलांना मिळायला हवी.

( ४ ) मुलांना स्वतःच्या पायावर उभे राहायला शिकवून त्यांचें सर्व तऱ्हेच्या पिळवणुकीपासून संरक्षण केलें पाहिजे.

( ५ ) मुलांना आपल्या सुप्त शक्ति समाजाच्या प्रगतीकरितां उपयोगांत आणण्याचें शिक्षण व तशी संधि मिळायला हवी.

यूनोच्या मानवी हक्कांच्या सनदेंत किंवा ' यूनिसेफ ' ( मुलांच्या मदतीकरितां निर्माण करण्यांत आलेली आंतरराष्ट्रीय गंगाजळी ) सारख्या कार्यक्रमामध्यें वरील तत्त्वप्रणालीचाच पाठपुरावा केलेला आढळतो. जर मुलांच्या संबंधीं इतकी काळजी व जागरूकता घेतली जात असेल तर मुलें नावडतीं असण्याचें कारणच उरणार नाहीं.

दुःखाची गोष्ट अशी आहे कीं वरील उदात्त तत्त्वज्ञानाच्या पार्श्वभूमीवरच व्यावसायिक समाजसेवेच्या निमित्तानें मला भेटलेल्या निरनिराळ्या मुलांचीं विरोधी जीवनचित्रें माझ्या मनश्चक्षूपुढें उभीं राहतात. खायला अन्न नाहीं म्हणून आईबापांनीं एका लहान मुलाला एका भिकाऱ्याला विकलें. त्या निरोगी, धडधाकट मुलाला पाहून लोक भीक घालणार नाहींत म्हणून त्या भिकाऱ्यानें त्या मुलाचे पाय जन्माचे फेंगडे केले. आतां तो मुलगा धंदेवाईक भिकारी होऊन त्या विकत घेणाऱ्या बापाचें पोट भरत असतो. महारोगी आईबापांचें एक मूल होतें. तें जन्मतःच जर वेगळें ठेवलें असतें तर तें सुधारण्याची पुष्कळच शक्यता होती. पण ही जाणीव संस्थेच्या चालकांना वेळच्या वेळींच न झाल्यानें तें मूल महारोगी झाल व हातपाय झडलेला तो चार वर्षांचा लोळागोळा आतां कसा तरी जगतो आहे.एक मुलगा अनैतिक वातावरणांत वाढून आतां वेश्यांच्या वस्तींत हॉटेल बॉय म्हणून जगतो आहे. त्याचा भविष्यकाळ आजच डागळलेला आहे. अल्पवयी अशा एका मुलीला 'सिनेमा नाटकांत नेतों, पैसे देतों' म्हणून प्रलोभनें दाखवून कांहीं लोकांनीं

पळवून नेली. तिच्याकडून तिच्या नीतिमत्तेचा बळी घेतला आणि तिला लाथेनें रस्ता दाखवला. एक चित्रचंद्रिका व्हायला गेलेली, भोळी मुलगी अनुभवाचें कडू शहाणपण शिकून वेश्या–जीवनांत गुंतलेली आहे. आई ज्या ठिकाणीं कामाला जात असे तेथून कांहीं तरी चोरून, पदरा आडून घरीं आणायची. बाप कुठें फुटकळ हातचलाखी करायचा, त्यामुळें लहानपणापासूनच एका मुलाला चोरी करणें यांत कांहीं वाईट आहे ही कल्पनाच नव्हती. तो पोरगाहि शाळेंत, बाहेर चोऱ्या करूं लागला. एकदां चुकला आणि सभ्य आयुष्याला कायमचा मुकला. ही स्वारी आतां तुरुंगांत आहे. एका श्रीमंत घरांतला मुलगा चैनीची चटक लागून व्यसनांच्या फंदांत पडला. तो चोरून सिगरेट्स् ओढत असे. त्याचें अप्रत्यक्षपणें कौतुकच झालें आणि आतां तो मुलगा सर्व तऱ्हेचे ढंग करून गांवोगांव हिंडतो आहे. दर गांवाला नवें नांव घ्यायचें, नवें लग्न करायचें, नवें कर्ज आणि नवें आयुष्य. एका भंग्याचा मोठा उमदा मुलगा होता. तो हुषार होता. पण त्याची जात त्याच्या प्रगतीमध्यें आली आणि समाजांत त्याला स्थान मिळालें नाहीं, संधि मिळाली नाहीं. अर्धवट शिक्षण झालेल्या या मुलाला जातींतल्या इतर लोकांसारखीं सफाईसारखीं कामें करायला लाज वाटते. पांढरपेशा वर्गासारखी नोकरी करण्याइतका शैक्षणिक दर्जा त्यानें मिळविला नाहीं; अशा विलक्षण अवस्थेंत हताश होऊन तो बसला आहे. पंजाबमध्यें सायकलींचा मोठा कारखाना असलेला गृहस्थ फाळणीनंतरच्या कत्तलीमध्यें बरबाद झाला आणि आज तो भारतांत मेकॅनिक म्हणून काम करतो आणि त्याचा छोकरा रेल्वेगाडींत बिनतिकिटानें हिंडून लेमनड्रॉप्स् आणि शेवगांठ्या विकतो. तिकिट चेकर आला म्हणतांच जिवाची तमा न धरतां धांवत्या गाडींतून उडी टाकतो. एके काळीं ऑक्सफर्डला जाण्याची आशा धरणारा हा पोरगा, आज त्याला शाळेंत जायला वेळ होत नाहीं, कारण पोट मागें लागलें आहे ना !

अशीं एक ना दोन, हजारों मुलें आहेत. मुंबई प्रांतांत फिरतांना जागोजाग अशीं मुलें मला भेटलीं आहेत. कोणी उन्मार्गी आहेत, कोणी भटकीं आहेत, कोणी गुन्हेगार आहेत, तर कोणी निराश्रित आणि उपेक्षित आहेत. पण गरिबी, स्वभावाची किंवा आर्थिक–हा का अपराध आहे ! ह्या मुलांनी असें कोणतें पाप केलें आहे कीं त्यांना

समाजांतून उठवून लावावें ? त्या मुलांच्या आईबापांनीं, शिक्षकांनीं किंवा समाजाच्या नेत्यांनीं जिनिव्हाची सनद पाहिली नसेल; पण आपल्या लेकरांच्या काळजीचा विचारच त्यांच्या मनांत आला नसेल, हें कसें म्हणावें ? समाजाला नको असलेल्या अशा अनेक मुलांच्या स्वभाव–विकासाचा अभ्यास केला तर एक गोष्ट अगदीं स्पष्टपणें लक्षांत येते कीं एखादा मुलगा मूलतः वाईट आहे हें म्हणणें म्हणजे धादान्त खोटेपणा आहे. ह्याचा विचार थोडा खोलवर करायला हवा. अजूनहि कांहीं शिक्षणशास्त्रज्ञांची, विचारवंतांची अशी समजूत आहे कीं गुन्हेगारी ही संपूर्णतः अनुवंशिक आहे; परंतु ती धादान्त खोटी असल्याचें आतां सिद्ध झालें आहे. प्रत्येक मूल जन्माला येतांना आपल्याबरोबर कोणत्या प्रमाणांत कोणत्या प्रवृत्ति घेऊन येतें आणि त्यांचा त्या मुलाच्या वाढीवर काय परिणाम होतो ह्याची चर्चा इथें अभिप्रेत नाहीं. पण गुन्हा किंवा उन्मार्गीपणा म्हणजे काय हा मूलभूत प्रश्न मात्र अभिप्रेत आहे. एखाद्या मुलाला वाईट ठरवतांच आपली वाईटपणाची कसोटी ही असते कीं समाजानें घालून दिलेल्या चाकोरी-बाहेर हा मुलगा वागतो आहे. तो चाकोरीबाहेर कां वागतो ह्याचा शास्त्रशुद्ध विचार करायला हवा. नेहमींच्या आढळामधलें अपहरणाचें किंवा चोरीचें उदाहरण आपण घेऊं. आपल्या समाजाची रचना व्यक्तिप्रधान असल्यानें प्रत्येक व्यक्तीला आपल्या मालकीच्या कांहीं वस्तु असाव्यात असें वाटतें व सामाजिक स्वास्थ्याच्या दृष्टीनें तें योग्यच आहे. आतां लहान मूल जेव्हां वाढूं लागतें तेव्हां त्याच्या मनाची वाढ कशी होते हें पाहायला हवें. लहान मुलांना जरा समजूं लागतांच रंगीत वस्तु, हलणाऱ्या वस्तु, चकचकीत भांडीं आवडायला लागतात व तीं त्या घेण्यासाठीं धडपडत असतात. हें वय म्हणजे जें आवडेल, जें नवें दिसेल तें हवें अशा प्रकारचें असतें. पण ह्याला पहिला धक्का भीतीचा बसतो. तो म्हणजे, समजा, एखाद्या मुलाला समईची हलती ज्योत फार आवडली व तें मूल ती धरायला गेलें तर हात भाजतो; व त्याची भीति निर्माण होऊन तें मूल पुन्हा त्याला हात लावत नाहीं, किंवा त्या वस्तु मागत नाहीं; पण ही शारीरिक भीति आहे. नंतर मानसिक भीति येते. समजा, एखाद्या मुलाला रंगीत शाईची बाटली सांडण्यांत फार गंमत आहे हें कळलेलें असतें तरी सुद्धां तें मूल पुन्हा

शाई सांडत नाहीं. कारण त्याला समजतें कीं ही गोष्ट जर आपल्या आईनें पाहिली तर ती रागावेल. इथें भीति आणि शाई सांडण्यांतील गंमत यांपैकीं ज्या गोष्टीचें पारडें जड होईल तसें मुलाचें वागणें असतें. नंतर मुलाला आपल्या हक्कांची हळू हळू जाणीव होऊं लागते. हा खेळ माझा आहे, ही आई माझी आहे, ही जाणीव निर्माण होतांच तें मूल दुसऱ्या मुलाला आपला खेळ देत नाहीं. आईच्या मांडीवर दुसऱ्या मुलाला, (दोन मुलांत अंतर थोडें असल्यास) धाकट्या भावंडाला सुद्धां बसूं देत नाहीं. आपल्या हक्कावर दुसऱ्यानें आक्रमण करूं नये ह्या इच्छेंतूनच आपणांलाहि हा न्याय लागू आहे ह्याची जाणीव निर्माण होते.

ह्या सर्व परिस्थितीशीं जुळतें घेण्याऱ्या क्रियेमध्यें मुलांच्या मनामध्यें जो संघर्ष होत असतो त्यामध्यें मुलांना सामाजिक वागणुकीचें शिक्षण मिळत असतें, व ह्यांतूनच त्यांना कळतें कीं आपण समाजानें घालून दिलेल्या पद्धतीप्रमाणेंच वागायला हवें. मग असें असतांना एखादा मुलगा ह्या पद्धतीनें न वागतां चोरी करतो ह्याचें कारण त्याला बरेंवाईट ह्यामधला फरक कळण्याइतकें गृहशिक्षण मिळालेलें नसतें, किंवा हें तारतम्य कळण्याइतकी बौद्धिक पात्रता नसते. ह्यापेक्षांहि वेगळी शक्यता आहे ती म्हणजे हें तारतम्य असूनहि, आपण वाईट गोष्ट करतों आहोंत ही जाणीव येऊन सुद्धां चोरी करणें ही. ह्या चोरीमध्यें त्या मुलाला चोरलेल्या वस्तूचें आकर्षण सामाजिक नीतिनियमांपेक्षां जास्त वाटत असतें. जितकी वस्तु दुष्प्राप्य तितकें तिचें आकर्षण वाढलेलें असतें. आपण मोठ्या माणसाचें उदाहरण घेऊं. एक गृहस्थ सामान्य स्थितींतला आहे, त्यानें कधींहि स्प्रिंगच्या मऊ कोचावर बसण्याचें सुख उपभोगलेलें नाहीं. तो एखाद्या श्रीमान् गृहस्थाला भेटायला गेला असतां कोचावर बसला. कोचाची स्प्रिंग, त्यावरचा मऊ गालिचा ह्यानें त्याला सुख होत असतें. तो घरधनी समोर असेपर्यंत त्याला ह्या सुखाचा पूर्ण अनुभव घेतां येत नाहीं. पण समजा तो घरधनी चहा सांगायला आंतमध्यें गेला तर हा गृहस्थ साहजिकपणें त्या कोचावर, जरा ह्या बाजूला, जरा त्या बाजूला बसतो. त्या मऊ आसनावरून हात फिरवीत असतो. ही सुखाची चोरी नसेल, पण जर मोठ्या माणसाला लोभवणारी, वेडावणारी, ही भावना वा आसक्ति असेल तर संवेदनाक्षम अशा

लहान मुलाच्या मनांत हा संघर्ष किती मोठ्या प्रमाणावर होत असेल हें पाहायला हवें व यामुळेंच रोज अनवाणी शाळेंत येणाऱ्या पोरीला मामलेदाराची मुलगी बाहेर गेली असतांना तिच्या मखमली चपला घालून पाहण्याची तीव्र इच्छा होते व ती चोरीचा आळ येऊन मार खाते. ह्याशिवाय कांहीं बाबतींत सामाजिक नीतिनियम ओलांडण्यामागें गरज भागवण्याचा हेतु असतो. मुंबईत रस्त्यावर राहणारीं अनेक मुलें आहेत. ह्या मुलांना चार दिवस जर उपाशी राहावें लागलें तर पांचव्या दिवशीं तो मुलगा हमखास चोरी करतो. कारण नीतीपेक्षां जीवनाची लालसा जास्त तीव्र असते. आपल्याला पांघरायला कमी असलें व थंडी असली तर आपण पांघरूण हवें म्हणतों. पण चोरी करीत नाहीं. हा मनाचा संयम त्या माणसाच्या मनाच्या घडणीवर व गरजेच्या तीव्रतेवर अवलंबून आहे. अशा चोऱ्या पुरातन काळींसुद्धां विश्वामित्रापासून केल्या गेल्या आहेत. येथें नीतिशास्त्राचा विचार करायचा नाहीं; पण हें कठोर सत्य विसरतां येणार नाहीं. कोणत्याहि घटनेची शुद्धता व नीति त्या घटनेपेक्षां त्या घटनेमागच्या हेतूवर अवलंबून असते.

सर्वसामान्य व्यवहाराचें नीट अवलोकन केलें तर हें स्पष्ट दिसतें कीं कांहीं माणसें जगांत सभ्य जीवन जगत असतात, कारण त्यांना असभ्यपणा करण्याची संधि मिळालेली नसते किंवा गरज भासलेली नसते. वरील विवेचनांतून असें दिसतें कीं प्रत्येक माणसाला समाजाचा रूढ मार्ग सोडायला लावणारें कारण पुष्कळदां भोंवतालच्या परिस्थितींत असतें व अत्यंत थोड्या उदाहरणांतच आपणांला असें म्हणतां येईल कीं त्यांची जन्मजात प्रकृति समाजविरोधी असते. उन्मार्गी मुलांच्या बाबतींत घरची शिक्षण-पद्धति, परिस्थिति, आईबापांची वागणूक, मित्रांची संगति, प्रलोभन, गरज वगैरे अनेक कारणें त्यांच्या उन्मार्गीपणाला जबाबदार असतात व म्हणूनच मुलांना त्यापासून संरक्षण देण्याची जबाबदारी समाजावर पडते. पण हा शास्त्रीय विचार अनेक वेळां लक्षांत घेतला जात नाहीं असें दिसतें, व याचा परिणाम शिक्षेच्या पद्धतीवर होतो. मुलाला शिक्षा देतांना शिक्षेचा हेतु काय असतो हें पाहायला हवें. शिक्षेचा हेतु अपराधाचें शासन का मुलांची सुधारणा? ह्याचें उत्तर मुलांची सुधारणा हेंच आहे. मुलानें चोरी केल्यानंतर त्याला मारल्यानें त्याच्या अपराधाबद्दल शासन होत असेल, कदाचित् मारणारा असें समजत

असेल कीं आपण आपलें कर्तव्य केलें. परंतु ह्याच्या पलीकडे जाऊन त्यांतून मुलगा सुधारला का ? हा प्रश्न विचारला तर उत्तर नकारार्थी येतें. ह्याचें कारण शिक्षा करण्याचा हेतु मुलाला सुधारण्याचा आहे हें शिक्षा करणारा व भोगणारा दोघांच्याहि लक्षांत आलेलें नसतें.

शाळेमध्यें एखाद्या मुलाचीं गणितें चुकल्यानंतर मास्तरांनीं त्या मुलाला दहा छड्या मारल्या तरी सुद्धां मुलाची सुधारणा होणार नाहीं.कारण छड्या खातांना सुद्धां मुलाला असें वाटत असतें कीं हीं गणितें मला येतच नाहींत, मी कांहीं मुद्दाम चुकीचीं उत्तरें मांडीत नाहीं. शिक्षकाच्या हें लक्षांत येत नाहीं कीं मुलाचीं गणितें चुकलीं ह्याची पुष्कळशी जबाबदारी शिक्षकावरच आहे. कारण गणिताची पद्धत त्यानेंच शिकवलेली असते. जर गणितें चुकलीं असतील तर त्याचें कारण शिक्षकाच्या अयशस्वी शिक्षणदानांत, मुलाच्या बौद्धिक पात्रतेंत, किंवा मुलाच्या परिस्थितींत असेल, पण मुलाला छडया मारून यांतील कोणतेंहि कारण सुधारण्याजोगें नाहीं, हें शिक्षकाच्या लक्षांत यायला हवें. पण छडया मारण्याचा हेतु मुलाचें गणित सुधारण्याचा असतो, केवळ गणितें चुकल्याच्या अपराधाबद्दल शासन करण्याचा नाहीं हें शिक्षक व विद्यार्थी यांपैकीं कोणाच्याच लक्षांत येत नाही. म्हणूनच ज्या हेतूकरितां शिक्षा केली जाते तो हेतूच फसून जातो. पण शास्त्रीय दृष्टीनें शिक्षा करण्याच्या पद्धतीमध्यें मुलाच्या हातून जी चूक घडलेली असते, त्या चुकीची व त्या चुकीमागें असलेल्या कारणपरंपरेची चिकित्सा अभिप्रेत असते. ही चिकित्सा करण्याची शक्ति पालक वा शिक्षक ह्यांच्यामध्यें नसल्याकारणानें मुलांच्या अपराधांच्या प्रमाणांत व अपराधाला योग्य अशी शिक्षा दिली जात नाहीं. आपल्या आसपास असणाऱ्या दहा शिक्षकांना अगर दहा पालकांना मुलांचे दहा अपराध सांगावे, चोरी, भटकेपणा, खोटें बोलणें, नीतिबाह्य वर्तन किंवा इतर कोणतेंहि, व त्यांना विचारावें कीं या अपराधाबद्दल मुलांना शासन काय करावें ? वस्तुतः मूल सुधारावें ह्या हेतूनें जर शिक्षा करायची असेल तर ती अपराधपरत्वें वेगवेगळ्या स्वरूपाची असायला हवी. परंतु आजचा अनुभव असा आहे कीं कोणत्याहि प्रकारचा, कितीहि तीव्रतेचा अपराध असो, चूक असो, त्याला सुधारण्याचा एकच रामबाण उपाय सांगितला जातो आणि तो म्हणजे छडी किंवा मार. कित्येक लोकांना अजून असा विश्वास

वाटतो कीं ह्या शिक्षण-पद्धतीनें मुलांचा बुद्धिविकास होतो. कित्येक लोक असें अभिमानानें सांगत असतात कीं ' एक मुस्काडींत मीं मारली मात्र, तो मुलगा तावडतोब सुधारला. पुन्हा म्हणून चोरी केली नाहीं. ' एकदां थोबाडींत मारून तो मुलगा सुधारला असेल तर तो अपघात तरी असेल किंवा पुढच्या खेपेला चोरी करतांना न सांपडण्याचा निश्चय त्या मुलानें केला असेल.

ह्या सदोष-शिक्षण-पद्धतीचा पुरस्कार करणाऱ्यांमध्यें मोठमोठे लोक आहेत. परंतु खरा मार्ग अपराधाची शास्त्रीय चिकित्सा व त्याला योग्य अशी सुधारणा–पद्धतीवर आधारलेली शिक्षा हा आहे. कांहीं लोकांचा असा एक अपसमज झाला आहे कीं नव्या मानसशास्त्राला शिक्षेचें वावडें असून मुलांना फुलदाणींतील फुलांच्या सारखें लाडावून ठेवायचें आहे. पण हा समज मानस–शास्त्राला सर्वस्वीं अन्याय करणारा आहे.

पूर्वीच्या काळीं मुलांना कमी शिक्षा करण्यांत येत असे ह्याचें कारण अपराधाची योग्य चिकित्सा होत असे म्हणून नव्हे, तर मुलें लहान आहेत, कोवळीं आहेत ह्यावर आधारलेल्या दयाधर्माच्या भावनेमुळें. मनु, आपस्तंभ किंवा विष्णु–स्मृतीमध्यें, मुलें, स्त्रिया व पंगु लोक ह्यांना वेगळ्या प्रकारची शिक्षा दिली गेलेली आहे. पाश्चात्य देशांतहि १० व्या शतकांत 'अथेलस्टेन' च्या कायद्यांत म्हटलें आहे कीं १५ वर्षांखालील मुलाला फांशीं देऊं नये, मारूं नये. त्याला सुधारण्याकरितां उपदेश करावा. पण जर ह्यानंतरहि त्याचा अपराध चालूच राहिला तर त्याला फांशीं द्यावें, खुशाल मारावें. ( बाल–गुन्हेगारांच्या शासनाकरितां नेमलेल्या खाते–समितीचा अहवाल–१९२७. ) पण प्रत्यक्ष व्यवहारामध्यें मात्र अपराधाची चिकित्सा व शास्त्र-शुद्ध शिक्षेचें तत्त्व बाजूला सारलें गेल्याचें आपल्याला आढळून येतें. १८४० सालीं इंग्लंडमध्यें एका १५ वर्षांच्या मुलाला ४० संत्रीं आणि ५० अंडीं चोरल्याच्या आरोपावरून १४ वर्षें काळें पाणी देण्यांत आलें होतें. पण ही तर १९ व्या शतकांतली कथा झाली. विसाव्या शतकांत सुद्धां मुलांच्या अप-राधाचा शास्त्रीय विचार केला जाऊं नये, ह्यापेक्षां दुर्दैवाची गोष्ट कोणती ! १९४९ सालीं ११ वर्षांच्या एका मुलाला ४६ वर्षांच्या मुदतीची शिक्षा देण्यांत आली. नुकतेंच उत्तर प्रदेशामध्यें शांतीदेवी नांवाच्या १३ वर्षांच्या

कोवळ्या मुलीला एका खून–खटल्यामध्यें, तिच्या कोवळ्या वयाकडे पाहून जन्मठेप काळेपाणी देण्यांत आलें; नाहींतर न्यायमूर्तींची इच्छा फांशीच देण्याची होती. आजहि भारतांतील सतरा सुधारलेल्या प्रांतांचा विचार केला तरी असें दिसतें कीं त्यांपैकीं आठ प्रांतांत मुलांच्या करितां सुधारण्याची वेगळी यंत्रणा निर्माण झालेली नाहीं; व चार प्रांतांत मुलांना कायदेशीर संरक्षण दिलेलें नाहीं. कायद्याचा विचार आतां करायचा नाहीं. पण देशांतील या क्षेत्रांतील स्थिति किती मागासलेली आहे हें दाखवण्याचाच फक्त हेतु आहे. उन्मार्गी, भटकी, भिकारी, न ऐकणारीं, दंगेखोर, नीतिबाह्य वागणारीं, बेवारशी, उपेक्षित वगैरे अनेक तऱ्हेचीं मुलें समाजांत वावरत असतात; व त्यांना समाजानें सुधारून संभाळून घ्यावें लागतें आणि त्या-करितां वेगळी व्यवस्था निर्माण करावी लागते.

वर उन्मार्गी मुलांच्यापैकीं एका प्रकारचा थोडासा विचार करण्यांत आला परंतु केवळ उन्मार्गी मुलें हींच केवळ समाजाचीं नावडतीं लेकरें आहेत असें नव्हे तर उन्मार्गी मुलांच्या शिवाय शरीरानें किंवा बुद्धीनें पंगु असणारीं मुलें, सामाजिक व राजकीय दृष्ट्या पंगु झालेलीं मुलें, ( ह्यामध्यें मागासलेल्या जाती, निर्वासित, दुसऱ्या देशाचें राष्ट्रीयत्व असणारीं, युद्धामुळें पळापळ होऊन भटकीं झालेलीं मुलें, ह्यांचा समावेश होतो.) हीं सर्व मुलेंहि समाजानें नावडतीं म्हणून खड्यासारखीं बाहेर काढलेलीं आहेत; किंवा त्यांना निर्दय-पणानें उपेक्षिलेलें तरी आहे.

शरीरानें पंगु असणारीं मुले हीं सर्व देशांत, सर्वकालीं आढळून येतात.कारण शारीरिक दुर्बलता ही समाजांत अपघातानें, रोगामुळें उत्पन्न होणारी,जन्मजात व अशा अनेक प्रकारची असूं शकते.ह्या मुलांना निरनिराळ्या कालांत समाजानें, वेगवेगळ्या पद्धतीनें वागविलेलें आहे. पुरातन कालांत प्रत्येक व्यक्तीला समा-जाच्या सुरक्षिततेकरितां श्रम करणें अवश्य असे. कारण समाजापुढें सुरक्षितता, स्वास्थ्य व वंशसातत्याची काळजी हेच महत्त्वाचे प्रश्न असत. त्यामुळें ज्या व्यक्ती समाजाच्या अस्तित्वाला धोंडगुळाप्रमाणें असतील त्या नष्ट केल्या जात, ज्या व्यक्ती समाजाला उपयोगी, उत्पादक श्रम करणाऱ्या असतील त्या ठेवल्या जात. ज्या व्यक्ती समाजाला निरुपयोगी असतील त्यांना अस्तित्वाचा अधिकारच नसे. अशा निरुपयोगी व्यक्तींमध्यें पंगु मुलांमाणसांचा अंतर्भाव

केला जात असे. या माणसांना पुष्कळदां झपाटलेलें समजण्यांत येत असे आणि त्या काळच्या भयग्रस्त व अस्थिर जीवनामध्यें तीं माणसें अनावश्यक बोजा समजलीं जात. ह्याचा साहजिक परिणाम म्हणून क्वचित् या मुलांना ठार मारण्यांत येई, किंवा बहुधा रानावनांत टाकून देण्यांत येई. परंतु सामाजिक जीवनांत थोडीशी सुस्थिर परिस्थिति निर्माण होतांच ह्या मुलांना दयाधर्माच्या व कनवाळुपणाच्या भावनेनें समाजांत ठेवण्यांत येऊं लागलें. अनाथ अपंगांना हें संरक्षण जास्तींत जास्त असें, मध्ययुगांत मिळालें. त्या वेळीं धर्माच्या नांवा-खालीं कां होईना राजसत्ता, खेड्याची व्यवस्था, गांवपंचायत, व एकत्र कुटुंब-पद्धति यांमुळें ह्या पंगु मुलांना आसरा मिळत गेला. परंतु आजच्या युगामध्यें पूर्वीची राजसत्ता कोलमडून गेली आहे, ग्रामव्यवस्था संपुष्टांत आली आहे व एकत्र कुटुंबपद्धति झपाट्यानें नष्ट होत आहे आणि म्हणूनच अपंग मुलांच्या प्रश्नाला पुन्हा महत्त्व येत आहे. सुदैवाची गोष्ट इतकीच आहे कीं आजच्या काळांतील बहुतेक सर्व राजकीय, सामाजिक तत्त्वज्ञानामध्यें पंगु समाजघटकांची जबाबदारी समाजानें घ्यावयाची हें तत्त्व मान्य करण्यांत आलें आहे. परंतु अन्न, वस्त्र, आसरा ह्यापेक्षांहि दुसरा एक प्रश्न ह्या मुलांच्या बाबतींत समाजापुढें उभा आहे, तो म्हणजे या मुलांच्या बाबतींतील समाजाची उपेक्षा वृत्ति आणि पिळवणुकीची लालसा हा होय. पुष्कळदां अज्ञान व भ्रामक, धार्मिक आणि सामाजिक समजुतींमुळें पंगूपणा उपेक्षिला जातो. मुंबई सरकारच्या सामाजिक कल्याण खात्यातर्फें (ज्युवेनाईल अँड बेगर्स डिपार्टमेंट) चालविण्यांत येणाऱ्या भिकाऱ्यांच्या वसाहतीमध्यें अनेक आंधळ्या लोकांचीं नांवें सूरदास असतात. ह्याचें कारण मुलाचे डोळे जायला लागले, अधू झाले, म्हणजे त्यावर उपचार करण्याऐवजीं ती दैवी आपत्ति आहे असें समजून त्याला सुप्रसिद्ध 'सूरदास' संताचें नांव देऊन भीक मागायला पाठवण्यांत येतें. वेळींच उपचार केला असता तर तीं मुलें कदाचित् सुधारलीं जातीं. शिवाय जबाबदारी टाळण्या-करितां अनेकदां हीं पंगु मुलें टाकून दिलीं जातात, विकलीं जातात किंवा दिलीं जातात. ह्या मुलांच्या पंगूपणामुळें लोकांची सहानुभूति मिळवून भीक मागतां येते, म्हणून हीं मुलें घेतलीं जातात. क्वचित् तर चांगल्या मुलांचे हातपाय मोडून भिकेकरितां त्यांचा उपयोग केल्याचीं सुद्धां उदाहरणें आढळतात.

ह्या सर्व मुलांच्या बाबतींत समाजाचें अनेक प्रकारानें नुकसान होत असतें. ह्या मुलांच्या मधील सुप्त शक्तींचा उपयोग न केला गेल्याकारणानें राष्ट्राचें

केवढें तरी नुकसान होत असतें. ज्या देशामध्यें ह्या पंगु मुलांच्या शिक्षण-पोषणाची व्यवस्था केलेली नसते त्या राष्ट्राला तेवढा अधिक खर्चच असतो. शिवाय त्या त्या कुटुंबांतील लोकांना ह्या मुलांची काळजी करावी लागते व त्यांच्या पुनःस्थापनेचा विचार करावा लागतो. वैद्यकशास्त्राच्या वाढीबरोबरच शारीरिक पंगूपणावर अनेक इलाज शोधून काढण्यांत येत आहेत. परंतु कोणत्याहि पंगूपणाचा जो परिणाम होतो तो केवळ त्याच्या शरीरापुरता मर्यादित राहात नाहीं, तर त्याच्या संपूर्ण व्यक्तिमत्त्वावर त्याचा परिणाम होत असतो. कोणताहि माणूस, हा शरीर व मन असणारा असल्यानें केवळ शरीरावरचे किंवा केवळ मनावरचे उपचार हे अपुरे ठरतात. शरीर व मन हें बऱ्याच प्रमाणांत परस्परावलंबी असल्यानें शारीरिक उपचाराबरोबरच पंगु मुलांच्या भावना व वागणूक यांवर काय परिणाम होतो,ह्याचा अभ्यास व्हायला हवा. हें पाहण्या-करितां लोकांच्या ह्या पंगु मुलांच्याबद्दल काय प्रतिक्रिया आहेत तें पाहायला हवें. पंगूपणा जितका भेसूर तितक्या तीव्र प्रमाणांत त्यांच्या बद्दलची प्रतिक्रिया असते. पुष्कळदां हीं पंगु माणसें आपल्यापेक्षां वेगळीं दिसतात. ह्याकरितांच धडधाकट माणसें त्यांना टाळत असतात. कांहीं वेळां ज्या रोगामुळें पंगूपणा येतो त्या रोगाचें चिन्ह म्हणून रोग्यांचा उल्लेख केला जातो. क्वचित् प्रसंगीं पंगूपणा हा पापाचरणामुळें येतो. असें समजून त्यांना पापी म्हणून अवहेल-ण्यात येतें. ही प्रतिक्रिया बाहेर समाजांत तर होतेच, परंतु प्रत्यक्ष आईबाप व मुलें ह्यांच्या वागण्यांतहि हा फरक दिसून येतो. म्हणूनच या पंगु मुलांच्या बाबतींत अधिकांत अधिक काळजी घेणें जरूरीचें असतें.

शारीरिक दृष्टया पंगु असणाऱ्या मुलांच्या पेक्षांहि मनानें मागासलेल्या किंवा दुर्बल मुलांचा प्रश्न अधिक गुंतागुंतीचा आहे. जीं मुलें संपूर्णपणें वेडीं असतात, त्यांच्या बाबतींत करण्याजोगें असें फार थोडें असतें. परंतु जीं मुलें मनानें दुर्बल किंवा मागासलेलीं असतात त्यांना योग्य ती मदत दिल्यास तीं सुधारण्याचा, निदान समाजाच्या दृष्टीनें सुयोग्य होण्याचा पुष्कळ संभव असतो. बौद्धिक दृष्टया कमकुवत व मनानें दुर्बल असणारीं मुलें ह्यामध्यें थोडासा फरक आहे. परंतु समाजाच्या प्रतिक्रियेच्या दृष्टीनें तीं एका गटा-मध्येंच येतात. ह्या मुलांच्याकरितां उपचार कसे करतां येतील हा प्रश्न वेगळाच आहे. पण निदान त्यांना त्यांच्या घरामध्यें व समाजामध्यें स्वास्थ्य मिळावें

ही अपेक्षा तरी पूर्ण व्हायला हवी. त्या मुलांना हें आवश्यक स्वास्थ्य बहुधा मिळत नाहीं. कारण त्यांच्या कमकुवतपणाची जाणीव ठेवली जात नाहीं, त्यांच्या अडचणी समजून घेतल्या जात नाहींत व त्यामुळें त्यांच्या कुवतीपेक्षां अधिक जबाबदारीचीं कामें त्यांना सांगितलीं जातात किंवा त्यांच्या शक्ती-पेक्षां अधिक अपेक्षा त्यांच्याबाबत बाळगल्या जातात. भलत्या अपेक्षा केल्यानें साहजिकच तीं मुलें, आपल्याला सामान्य वाटणाऱ्या पण त्यांना अवघड वाटणाऱ्या कामामध्यें अयशस्वी होतात. त्यामुळें ह्या मुलांच्या मनांत एक प्रकारची समाजाशीं फटकून राहण्याची प्रवृत्ति निर्माण होते. कारण जेथें आपण नको आहोंत तेथें जाऊं नये ही साधी व्यावहारिक गोष्ट आहे. पण योग्य वेळीं उपचार न झाल्यास ही समाजाच्या रीतीशीं विसंगत वागण्याची प्रवृत्ति समाजविद्रोही बनते. एखादा मुलगा जर सामाजिक चाली-रीतींशीं विसंगत वागत असेल तर तो त्याच्या घरांतील मंडळींना ओझें वाटूं लागतो व त्यामुळें पुष्कळदां हीं मुलें न्यूनगंडानें पछाडलीं जातात. नंतर तीं न्यूनगंड टाळण्याकरितां भटकीं बनतात, भीक मागतात किंवा समाजशत्रूंच्या हातांतलीं तीं बाहुलीं बनतात. म्हणून ह्या मुलांना समाजामध्यें जर बसवून घ्यायचें असेल तर समाजानेंच एक पाऊल पुढें जाऊन, त्यांना आधार दिला पाहिजे. कांहीं पाश्चात्य संशोधकांचें असेंहि म्हणणें आहे ( सिरिल बर्ट ) कीं मुलांच्या उन्मार्गीपणामध्यें मागासलेलेपणा हें एक महत्त्वाचें कारण आहे. परंतु कांहींहि असलें तरी प्रत्येक मुलाला प्रगतीकरितां संपूर्णपणें स्वातंत्र्य व आवश्यक अशी संधि मिळाली पाहिजे.

आतांपर्यंत आपण पाहिलेल्या उन्मार्गी, शरीरानें पंगु किंवा मनानें दुर्बल असणाऱ्या सर्व मुलांत एकसारखेपणा आहे. आणि तो म्हणजे ह्या सर्वांची तक्रार वैय्यक्तिक आहे. पण वर उल्लेख केलेल्या मुलांच्या शिवाय असा एक मुलांचा गट आहे कीं जीं त्यांचा कांहींहि दोष नसतांना केवळ सामाजिक, राजकीय किंवा आर्थिक परिस्थितीमुळें गांजलेलीं असतात. आजपर्यंत आपणा-कडे अशी दृढ समजूत होती कीं गुन्हेगारी ही अनुवंशिक आहे. ह्या तत्त्व-ज्ञानाला अनुसरूनच मागासलेल्या जमातींचा कायदा करण्यांत आला होता. या कायद्याप्रमाणें त्या त्या जातींत बायकापोरें, म्हातारेकोतारे साऱ्यांनाच गुन्हे-गार किंवा होतकरू गुन्हेगार समजण्यांत येत असे व त्यांच्यावर नाना तऱ्हेचे निर्बंध लागू करण्यांत येत असत. म्हणजे मांगगारुडी, हरिणशिकारी, घंटीचोर

किंवा अशा तऱ्हेच्या जातींतील मुलांना इतर मुलांच्यासारखें कधींच समजण्यांत येत नव्हतें किंवा वागवण्यांत येत नव्हतें. पण नुकताच हा कायदा रद्द करण्यांत आला आहे. केवळ कायदा रद्द करण्यानें त्यांची परिस्थिति सुधारण्यासारखी नाहीं. त्याकरितां प्रयत्नपूर्वक श्रम करायला हवे आहेत. आदिवासी जमातीमध्यें थोड्या प्रमाणांत हीच परिस्थिति आहे. कांहीं वेळां राजकीय परिस्थितीच अशी येते कीं त्यामध्यें हजारों लोकांचा आसरा तुटून जातो. आज आपल्या प्रांतांत आलेल्या निर्वासितांची संख्या हेंच दर्शवते. कांहीं वर्षांपूर्वी भारत पाक सरहद्दीवर दंगे झाले व शेंकडों लोकांचे जीवनवृक्ष उन्मळून पडले. कोणताहि अपराध नसतांना हजारों मुलें अनाथ झालीं. सारें रानच वणव्यांत सांपडलें म्हणजे चिमणीं पांखरें कोण सांभाळतो ? त्याप्रमाणें अल्पसंख्य जमातीचीं मुलें निराधार झालीं. ह्या मुलांमध्यें कित्येक मुलें बुद्धिवान् आहेत, होतकरू आहेत. पण संधि आणि परिस्थिति निर्माण करण्याची करामत करत तीं काळ कंठत आहेत. ह्या मुलांची सोय लागेल तो सुदिन. आर्थिक परिस्थितीमुळें सुद्धां अनेक प्रश्न उद्‌भवतात. समाजाच्या तळच्या थरांतील मुलांचा प्रश्न बहुधा मूलतः आर्थिक असतो. जसजसें वरच्या थरांत यावें तसतसें इतर प्रश्न डोकें वर काढूं लागतात. मला आठवतें आहे, 'टाटा इन्स्टिट्यूट ऑफ सोशल सायन्सेस'च्या वतीनें आम्हीं मुंबई शहरांतील 'गृहहीन' लोकांची पाहणी केली, त्यांत असें आढळून आलें कीं शहराच्या एका भागांत ८'×१०' फुटांच्या खोलींत १२ माणसें राहात होतीं व त्यांत तीन जोडपीं होतीं व तीं पाळीपाळीनें आंत राहात. ह्या वातावरणांत राहिलेल्या मुलांची नैतिक पातळी जर खालीं आली तर त्याला कोण जबाबदार आहे !

नावडतेपणाचीं सामाजिक, आर्थिक वा राजकीय कारणें कोणतींहि असोत, पण आजचीं मुलें हीं भविष्याचीं शिल्पकार आहेत. आज आम्ही जीं स्वातंत्र्य व समतेचीं स्वप्नें पाहतों तीं साकार करण्याचें सामर्थ्य केवळ त्यांच्यांत आहे. समाजाचें स्वास्थ्य व संरक्षण व्हावें म्हणूनच नव्हे तर माणसाच्या बुद्धीचा व शक्तीचा प्रत्येक क्षण संस्कृति व सुधारणेच्या कामीं लागावा ह्या हेतूनें आजच्या मुलांची जपणूक करणें, समाजाला नावडत्या वाटणाऱ्या प्रत्येक मुलाच्या प्रगतीकरितां आवश्यक अशी संधि व परिस्थिति निर्माण करणें, हें प्रत्येक पालक, शिक्षक व समाजनेता यांचें काम आहे.

* * *

: २ :

# ' अपंग मुलांची हांक '

एका अंध-शाळेला भेट देतांना मला एक मुलगा भेटला. सात वर्षांचा तो कोवळा अंध मुलगा मला त्याच्या दुर्दैवाची कहाणी सांगत होता. एवढ्याशा मुलाची आठवण ती काय आणि तो सांगणार कसा ! स्मृतीचे धागे जुळत होते, तुटत होते; पण त्या कहाणीचा परिणाम मात्र त्या मुलावर भयंकर झाला होता. जगांतल्या चांगुलपणावरचा त्याचा विश्वास उडाला होता. त्यामुळें त्याला शरीरानें व मनानें कोठें तरी अधांतरीं राहिल्यासारखें वाटे. कोणाचाच आधार वाटत नसे व मग तो हताश होऊन आपल्या मनाच्या अंधारांत चांचपडत राही. संस्थेचे लोक म्हणत तो मुलगा वेडसर आहे; पण खरी गोष्ट अशी कीं ज्यांच्यावर त्यानें विश्वास टाकला, त्या सर्वांनीं त्याला फसवलें. त्याला विश्वास तरी कोणाचा वाटावा ! पंढरपूरजवळच्या खेड्यांतल्या एका गृहस्थाचा तो आठवा पुत्र होता. त्याचें नांवहि कृष्णा होतें. पण आठ मुलें, बायको व आई ह्यांचा संसार चालवितांना दारिद्र्यानें वाकलेल्या माणसानें ह्या कृष्णाला पंढरपूरच्या यात्रेंत सोडून दिलें व बापाच्या जबाबदारींतून तो मोकळा झाला. कारण पुढची काळजी देवाला असें त्याला वाटत असावें; पण त्या जत्रेंतल्या एका साधूनें त्याला आपल्या ताब्यांत घेतलें. त्याचा गांजा मळावा, त्याचे कपडे धुवावे व राहिलेल्या वेळांत भीक मागावी. हा कार्यक्रम होता. त्या मुलाला चांगलेंचुंगलें खायला मिळे.



' मुलांचें बुद्धिमापन (बालमार्गदर्शन केंद्र, पुणें)

पोरगा खूप होता. तो त्या साधूबरोबर असतां, त्याच्या लक्षांत आलें कीं, ह्या मुलाचा भीक मागण्याला व्हावा तसा उपयोग होत नाहीं. लोकांना ह्या मुलाची दया येत नाहीं, कारण दोन वेळां खायला व गांवभर हिंडायला मिळाल्यानें पोरगा अंगासरशी सांवरला होता. तेव्हां त्या साधूनें एक नवी युक्ति योजिली. एके दिवशीं सकाळीं त्या पोराच्या डोळ्यांत कसलें तरी मलम घातलें आणि त्या पोराची दृष्टि साफ गेली.नंतर त्या साधूला चांगलेंच फावलें.तो सांगे कीं 'पटकीच्या रोगांत माझीं सारीं माणसें मेलीं. आतां मी म्हातारा आजोबा व हा कोवळा नातू दोघेच शिल्लक राहिलों. गांवावर वणवा आला आणि गेला. माझ्या वठलेल्या झाडावर ही कोवळी पालवी उरली. ' ही गोष्ट ऐकून लोकांना दया येई. ते त्याला भीक घालीत. आंधळा 'सूरदास' तुकारामाचे अभंग गात गांवोगांव फिरे आणि त्याच्या त्या दत्तक आजोबाचें उखळ पांढरें होई. पुढें चोरून गांजा आणण्याच्या एका खटल्यांत हे साधुबुवा सांपडले आणि हें पोर आमच्या ताब्यांत आलें. आतां तें शाळेमध्यें लिहावयाला वाचावयाला शिकतें आहे. आतां त्याचें पुढचें सारें आयुष्य लोकांच्या दयाबुद्धीवर अवलंबून आहे. हें एकच पोर नव्हे अशीं हजारों मुलें आहेत. त्यांच्या त्या थिजलेल्या डोळ्यांना लुकलुकतांना पाहिलें म्हणजे वाटतें कीं त्यांना आशेचा किरण कोण दाखविणार ?

जेव्हां जेव्हां हिमालयाच्या सान्निध्यांत कोणी जातो तेव्हां तेव्हां तीं सकाळच्या किरणांनीं तेजस्वी वाटणारीं त्यांचीं शुभ्र शिखरें पाहून प्रत्येकाला भारावून गेल्यासारखें वाटतें. शब्दांना ज्याचें वर्णन अशक्य आहे असा गुलाबाचा मोहक रंग, विशेषतः दुधांत आरक्त छटा आल्यासारखें त्याचें दर्शन, शांत रात्रीं चांदण्याचा आलेला महापूर, लहान अर्भकाच्या चेहऱ्यावरचें निरागस हास्य आणि वृद्धाच्या चेहऱ्यावर दिसणारी अनुभवाची खोल रेखा प्रत्यक्ष दृष्टीनें पाहिल्यामुळें मन आनंदानें पुलकित होतें; पण ह्या साऱ्या दृष्टिसौख्याला हीं आंधळीं मुलें पारखीं झालेलीं आहेत. भारतामध्यें आज असणाऱ्या अंधांची संख्या सुमारें वीस लाख आहे व त्यांना शिकविण्यासाठीं असलेल्या संस्था सुमारें बत्तीस आहेत. समुद्र उपसण्याला संध्येची पळी आणण्यापैकींच प्रकार आहे हा. असेंहि सांगतात कीं वेळच्या वेळींच, सरकारतर्फें वा समाजातर्फें ह्या अंधांना, वैद्यकीय उपचार, नेत्ररोगांचा

प्रतिकार ह्याची व्यवस्था झाली असती तर ह्यांतील साठ टक्के लोकांना आंधळें व्हावें लागलें नसतें. वर उल्लेखिलेल्या संस्थांमध्येंहि वेतकाम, संगीत, मालीश, नवार विणणें व तत्सम कलेचें काम ह्याव्यतिरिक्त धंद्यांचें शिक्षण मिळत नाहीं. इतर देशामध्यें टायपिंग, रेडिओ दुरुस्ती, टेलिफोन कारखान्यांतील काम, शिवणकाम वगैरे उद्योग शिकविले जात असतात. आमच्या देशांत मात्र ते यशस्वी होत नाहींत. ह्याचें मुख्य कारण म्हणजे नोकरी देणारे लोक, कारखानदार, संस्था वगैरेंना अंध लोकांना काम देणें मोठें जड वाटतें. काम होईल कीं नाहीं ह्याची त्यांना शंका वाटते. अंधाला नोकरीवर ठेवणें हा एक फायदा वा ही उपयुक्त घटना आहे असें न वाटतां त्यामध्यें तोटा वा जबाबदारी वाटते. हा दृष्टिकोन बदलण्याचे प्रयत्न आतांच होणें आवश्यक आहे. आपल्या राष्ट्रीय मानवी संपत्तीपैकीं एक मोठा हिस्सा जर अशा तऱ्हेनें निरुपयोगी ठरविण्यांत आला तर त्यांना भीक मागण्याखेरीज गत्यंतर नाहीं. कारण आज समाजाच्या दृष्टीनें तोच उद्योग त्यांना योग्य समजला जातो.

आंधळ्या मुलाला त्याचें सुखदुःख, खेद आणि समाधान व्यक्त करण्याला वाणीचें तरी सामर्थ्य असतें. पण बहिऱ्या आणि मुक्या मुलांची परिस्थिति याहूनहि चमत्कारिक असते. खेळण्याच्या दुकानामध्यें कांचेच्या कपाटांत बाहुली ठेवलेली असते. ती एकटक नजरेनें रस्त्यावरची धावती वाहतूक पाहत असते. रंगीबेरंगी कपडे घालून लोक येत जात असतात. कधीं वाजत गाजत वरातीच्या मिरवणुकी जातात, तर कधीं शोकभरित स्मशान-यात्रा जाते. कधीं अपघात होतात, लोक किंचाळतात, गर्दी जमते आणि पुन्हा विरते. पण जीवनाचें हें चालतें बोलतें नाटक ती बाहुली ज्याप्रमाणें बघते त्याच शून्य नजरेनें मुके आणि बहिरे लोक बघतात. कारण त्यांना काय वाटतें, आणि जीवनांत घडणाऱ्या प्रत्येक घटनेबद्दल त्यांच्या मनांत किती क्रिया व प्रतिक्रिया निर्माण होतात हें सांगायला त्यांना वाचाच नसते. सांगणार तरी काय आणि कसें ? कसल्या तरी भीतीनें एखादें मुकें मूल किंचाळतें. त्या वेळची किंकाळी तुम्हीं कधीं ऐकली आहे का ? ती एकदां तुम्ही ऐकलीत तर त्याची तुम्हांला जन्मभर आठवण राहील. तुम्हांला कायम असें वाटत राहील कीं त्या मुक्या मुलानें कांहीं तरी पाहिलें होतें, कशाची तरी त्याला खूप भीति वाटली होती; तें काय होतें तें मात्र त्या मुलाला सांगतां येत नाहीं, कदाचित्

पुढेंहि सांगतां येणार नाहीं. त्या मुक्या मनाच्या वेदना त्या किंकाळीमध्यें स्पष्ट दिसतील. समाजांत जगण्याकरितां दृष्टीप्रमाणें वाणी व श्रवणशक्ति यांची अत्यंत आवश्यकता आहे. पण अडीच लाखांपेक्षां जास्त लोक ह्या देशांत मुके व बहिरे आहेत. त्यांच्या वेदनांचा, त्यांच्या यातनांचा कोणी तरी विचार करायला हवा व त्यांच्या दुःखाला वाचा फोडायला हवी. वाणी नसेल तर मुलाचा आंत कोंडमारा होतो. श्रवणाची शक्ति गेली असेल तर सामाजिक जीवनच जातें. ज्याच्या श्रवणानें जीवन धन्य झालें असें वाटावें असें मधुर संगीत, पावसाळ्याच्या आगमनाची द्वाही फिरविणारे ढग, गंभीर गर्जना करूं लागले म्हणजे मनांत येणाऱ्या ऊर्मि, दाट झाडामध्यें पांखरूं तर दिसत नाहीं पण गोड चिवचिवाट तर ऐकूं येतो, अशा वेळीं होणारा आल्हाद, आकाशाच्या घुमटाला साद घालणारी मशिदीमधून येणारी बांग, पहाटेच्या वेळची भूपाळी, अर्धजागृत मनामध्यें पावित्र्याचीं वर्तुळें काढणारे मंदिराच्या घंटेचे आवाज, ह्या साऱ्या साऱ्यांची गोडी त्या श्रवणशक्ति नसलेल्यांना कशी कळायची !

न शिकलेला अंध, बहिरा, मुका मुलगा हें समाजावरचें आर्थिक ओझें व देशाचें सामाजिक नुकसान आहे. जर मुक्या व बहिऱ्यांना ओठांच्या हालचालीच्या द्वारें अक्षरें समजूं लागलीं, अगदीं ढोबळ स्वरूपाचें कां होईना पण उच्चार करतां येऊं लागलें, स्पर्शज्ञानाच्या आधारावर बहिऱ्यांना संगीताची गोडी चाखतां आली, आंधळ्याला स्वतःची लिपि लिहितांवाचतां आली तर ते समाजाचे उपयुक्त घटक खास होतील. ह्या अपंग मुलांना आपलें कुटुंब व आप्तेष्ट ह्यांवर बोजा टाकण्यांत आनंद वाटतो अशी कोणाची कल्पना असेल तर ती साफ चुकीची आहे. वस्तुतः जन्मभर बांडगुळ म्हणून दुसऱ्याच्या दयेवर लाचारीनें जगावें लागणें ह्यासारखी वाईट गोष्ट नाहीं व ह्या लाचारीच्या, न्यूनतेच्या भावनेचा भार त्यांच्या मनावर इतका असतो कीं त्यांच्या मनाला मोकळेपणाच वाटत नाहीं. चारचौघांत वागायची चोरी, पंगूपणाची लाज त्यामुळेंच कदाचित् हीं माणसें अंधशाळेंत किंवा बहिऱ्यामुक्यांच्या शाळेंत अधिक समाधानी असतात. पण हें समाधान खोटें आहे, समदुःखावर आधारलेलें आहे. ज्या वेळीं त्यांच्या पंगूपणानें निर्माण होणारी न्यूनता घालवणारें शिक्षण त्यांना मिळेल तेव्हांच हा प्रश्न सुटेल. ह्या अपंग मुलांचा प्रश्न

इतका कठिण झाला आहे ह्याचें एकच कारण आहे आणि तें म्हणजे त्या दुर्दैवी मुलांना ज्ञानाचे दरवाजे अजून उघडून दिलेले नाहींत. हाताच्या बोटांमध्यें केवढें कौशल्य सांठवलेलें आहे ह्याची कल्पना दिलेली नाहीं. निसर्गाचें सौंदर्य, जीवनाची भव्यता व जगण्याची गोडी त्यांना पटवून दिलेली नाहीं. ह्याकरितां अंध व मुक्याबहिऱ्यांच्या अधिक शाळा, अधिक संस्था व अधिक औद्योगिक केंद्रें ( शिक्षणकेंद्रें ) ह्यांची गरज आहे. ही गरज समाज व सरकार ह्यांनीं भागवली पाहिजे. कारण अपंगांना मिळणाऱ्या वागणुकीवरच समाजाची संस्कृति मोजली जाते. धडधाकट माणसांना चांगली वागणूक मिळते. कारण ती न मिळाल्यास तीं प्रतिकार करूं शकतात. पण जे रंजलेले आहेत, जे गांजलेले आहेत त्यांना आपलेपणानें वागवणाराजवळच धर्म राहूं शकतो, देव राहूं शकतो.

ही सर्व व्यवस्था पश्चादुपचारासारखी आहे, चूक करून निस्तरण्यासारखी आहे. मुलें अपंग न होतील ह्याकरितांच काळजी घेतली गेली पाहिजे. प्रसूतिपूर्व काळजी, अर्भकांची स्वच्छता, आरोग्य व संसर्गजन्य रोगांचा प्रतिकार त्वरित व्हायला हवा. नेत्रोपचार केंद्रासारखीं केन्द्रें उघडायला हवींत. परंतु हे सर्व प्रतिकारात्मक प्रयत्न करूनसुद्धां अपघात किंवा निसर्गकोप ह्यामुळें येणारी अपंगता राहीलच. ह्या सर्व अपंगांच्या समोर कु. हेलेन केलेर, डॉ. सुबोधचंद्र रॉय ह्यांचीं उदाहरणें ध्येयदर्शी ताऱ्याप्रमाणें आहेत. अपंगांना शिक्षण देऊन त्यांना समाजाचे उपयुक्त घटक बनविणें ही एक अटळ सामाजिक जबाबदारी आहे व ती स्वीकारलीच पाहिजे. ह्या प्रश्नाचा अभ्यास 'टाटा इन्स्टिटयूट'मध्यें करीत असतांना डॉ.सुबोधचंद्र रॉय आम्हांला शारीरिक दृष्ट्या अपंग मुलांची पुनःस्थापना शिकवीत असत. त्या वेळचे शब्द मला अजूनहि आठवतात. ' भारताला समाजसेवेची परंपरा आहे व म्हणूनच ह्या प्रश्नांची सोडवणूक भारतामध्यें लौकरच होईल असा मला विश्वास वाटतो. ' डॉ. सुबोधचंद्र रॉय हे अगदीं अल्पवयामध्यें अंध झाले व त्यानंतर त्यांनीं आपलें सर्व शिक्षण पूर्ण केलें. पीएच्. डी. झाले व तीनचार विश्वविद्यालयांत शिक्षणदान केलें. हल्लीं ते अमेरिकेंत कार्य करीत आहेत. त्यांच्या काळोख्या आयुष्यांत ज्ञानाचा प्रकाश आला, म्हणूनच ते यशस्वी झाले. भारतांत असतांना त्यांनीं ' अंधांचें दीपगृह ' नांवाची संस्था स्थापन केली

होती. कु. हेलेन केलेर यांची गोष्ट तर फारच स्फूर्तिदायक आहे. जून १९५३ मध्यें त्यांना ७३ वें वर्ष लागलें. पण त्यांच्या उत्साहाला वयाची मर्यादा कधींच जाणवलेली नाहीं. त्या मुक्या, अंध व बहिऱ्या आहेत. वयाच्या सहाव्या वर्षीच त्यांना अक्षरें व ब्रेल लिपि शिकविण्यांत आली, व तीन महिन्यांतच त्या मुलीनें मोडकेंतोडकें पत्र लिहिण्यापर्यंत मजल मारली. ज्या घरांत त्या राहात तें घर अतिशय गजबजलेलें होतें. मुलेंबाळें, पाहुण्यांची वर्दळ, पाळलेले प्राणी व भोंवतालचीं शेतेंभातें यामुळें त्यांचें मन जागृत होण्याला खूपच वाव मिळाला. काय पाहूं आणि काय शिकूं असें त्यांना होई. वयाच्या दहाव्या वर्षी त्यांनीं बोलायला शिकायचा निश्चय केला. त्यांच्या मनांत एकच इच्छा होती कीं घरीं जाऊन धाकट्या बहिणीला सांगावें कीं, “ मी आतां मुकी नाहीं. ” पुष्कळ वर्षांच्या प्रयत्नानंतर त्या जाहीर व्याख्यान देण्याइतपत बोलूं लागल्या. १९०४ सालीं त्या इंग्लिश ऑनर्स घेऊन बी. ए. झाल्या. त्यांनीं आजपर्यंत पुष्कळ पुस्तकें लिहिलीं आहेत. त्यांना संगीत, शिल्प, चित्रकला, ह्यांची फार आवड आहे.

स्वराच्या उच्चारानें होणारे कंप त्या स्पर्शज्ञानानें समजतात. शिल्पकृतीवर हात फिरवून त्यांतील प्रमाणबद्धता जाणतात. मार्क ट्वेनच्या सुंदर कोट्या त्या स्पर्शज्ञानानेंच समजल्या. ‘ एन्रीको कारुसो ’ या सुप्रसिद्ध गायकाचें संगीत त्याच्या गळ्यावर हात ठेवूनच त्यांना समजलें. पियानो व व्हायोलिनवर बोटें टेकवून त्यांना संगीतामधले बारकावेसुद्धां समजतात. एरवीं भावहीन वाटणाऱ्या हाताच्या ओंजळींतून त्यांनीं संगीताचे सोनेरी आलाप मन मानेल तसे लुटले.ह्यापरतें आश्चर्य कोणतें ! ‘माझ्या आयुष्याची कहाणी’ ( Story of my life ) ह्या सुंदर आत्मचरित्रांत त्यांनीं म्हटलें आहे, “ मी इतर लोकांच्यापासून वेगळी आहे हें मला केव्हां कळलें तें माझ्या नक्की लक्षांत नाहीं. पण मला हें माहीत होतें कीं माझी आई व तिच्या मैत्रिणी एकमेकींशीं बोलतांना माझ्यासारख्या खुणा करीत नाहींत. त्या तोंडानें बोलतात. कधीं कधीं बोलणाऱ्या दोन माणसांच्यामध्यें मी उभी राही व त्यांच्या ओठांना हात लावून पाही कीं हे लोक बोलतात तरी कसें ! तें पाहून मीं माझे ओठ हालविले, आवाज काढण्याचा यत्न केला, आक्रस्ताळेपणानें हातपाय हालविले पण कांहीं उपयोग झाला नाहीं. मीं लाथा झाडल्या,

रागावलें आणि थकवा येईपर्यंत किंचाळलें. खूप धुकें आल्यावर तुम्ही बोटीवर कधीं होतां काय ? असें वाटतें कीं कसल्या तरी पांढऱ्या अंधारांत तुम्हांला गुरफटून टाकलें आहे. शिक्षणापूर्वी माझी अवस्था तशीच होती. आयुष्याला दिशा नव्हती, आवाजाची चाहूलहि नव्हती आणि आसरा कुठें आहे, किती लांब आहे ह्याची जाणीवहि नव्हती. ' प्रकाश, प्रकाश दिसूं दे ' ही माझ्या हृदयाची शब्दहीन हांकाटी होती. आणि चित्ताच्या तळमळीच्या हाकेमध्येंच माझ्या जीवनाचा प्रकाश होता. ' खरंच हें गरम आहे ' हें वाक्य मी प्रथम म्हणालें. त्या वेळीं मला वाटलेलें आश्चर्य, गंमत, आनंद हें अविस्मरणीय आहे. हें तर खरेंच कीं हीं सर्व अक्षरें तुटक तुटक व अडखळत उच्चारलीं गेलीं. पण कसें झालें तरी तो शब्दोच्चार होता. माझ्या मनाला उच्चाराच्या नव्या शक्तीची जाणीव झाली. माझा आत्मा बंधमुक्त झाला व त्या तुटक्या अक्षरांतून कां होईना पण सर्व शिक्षण, सर्व शास्त्रें, सर्व संस्कृति ह्यांच्यापर्यंत पोहोंचण्याचा मार्ग मोकळा झाला. प्रत्येक बहिऱ्या मुलाच्या मनामध्येंच एक शांततेचा तुरुंग असतो. त्यांत प्रेमाची लयकार नसते. पक्ष्यांची किलबिल नसते. संगीताचासुद्धां आलाप त्या स्तब्ध शांततेचें वातावरण भेदूं शकत नाहीं. पण प्रथम उच्चार केल्यावर होणारा आश्चर्याचा उन्माद, नवीन कांहीं तरी मिळविल्याचा आनंद हें कोणतें बहिरें मूल विसरूं शकेल ? केवळ त्या मुलालाच, मी ज्या आतुरतेनें माझ्या बाहुल्यांच्याशीं बोललें, झाडें, दगड, पक्षी, कुत्री सर्वां-सर्वांच्याशीं बोललें त्यांतील आनंद उमजेल. माझी हांक ऐकून माझी बहीण येई, माझा हुकूम ऐकून माझें कुत्रें धांवे, त्या वेळीं माझ्या शक्तीची जाणीव मला होई. उच्चारशक्ति हें एक वर्णनातीत वरदान आहे. त्यामुळें माझ्या शब्दांना पंख फुटले. माझें बोलणें खाणाखुणांनीं सांगायचें कारण उरलें नाहीं. "

डॉ. रॉय, कु. केलेर ह्यांच्यासारखीं अनेक उदाहरणें आहेत. इंग्लंडच्या पार्लमेंटमध्यें ' इंडिया मेंबर ' म्हणून प्रसिद्ध असलेले अंध श्री. हेन्री फॉसेट हे कित्येक वर्षें इंग्लंडचे पोस्ट मास्तर जनरल होते. ज्यानें ब्रेल लिपि शोधून काढली त्या लुई ब्रेल या फ्रेंच गृहस्थाचें उदाहरणहि प्रसिद्धच आहे. पण अशीं उदाहरणें भारतांत थोडीं आहेत. वस्तुतः अपंग लोकांची संख्या भारतामध्यें पुष्कळ आहे. फार कशाला केवळ मुंबई प्रांतांतच पन्नास हजारांच्या वर

अंध लोकसंख्या आहे. त्यांतील तीस टक्क्यांच्या वर लोक एकवीस वर्षांच्या आंतील आहेत. त्यांना यापुढच्चीं कित्येक वर्षें अंधारांत काढायचीं आहेत. त्यांना मदत म्हणून आपण कांहीं निश्चय करायला हवेत.भीक न घालतां तीच मदत अंधशाळेला किंवा अपंगगृहाला द्यावी, प्रतिकारात्मक उपाय योजून ज्ञानेंद्रियाचें संरक्षण करावें, सरकार आणि समाजानें अधिक शाळा, संस्था, व औद्योगिक शिक्षण-केंद्रें काढावीं. ह्या अपंगांना पुढील धंद्यांमध्यें प्रगति करतां येते. ( १ ) संरक्षित जागेमधील वेतकाम, फर्निचर करणें, विणकाम, सतरंज्या, ब्रश करणें, चांभारकाम, तारेचें काम, पुस्तक—बांधणी, खेळणीं करणें. ( २ ) स्वतंत्र धंदे—प्राध्यापक, वकील, लेखक, पत्रकार, संगीतकार, विक्रेते, टेलिफोन-ऑपरेटर्स वगैरे. पण ह्या सर्व व्यवसायांना लागणारें शिक्षण व पुढील व्यवसायाची व्यवस्था ह्याकरितां अधिक संघटित प्रयत्न होणे अगत्याचें झालें आहे.

मुंबई प्रांतांत फिरतांना सर्वत्र अशीं अपंग मुलें आढळतात. पण मना-सारखी त्यांची व्यवस्था फारशी कोठें आढळत नाहीं. एक मात्र खरें कीं इतर प्रांतांच्या तुलनेनें येथील काम बऱ्याच उत्साहानें चाललेलें आहे. अंधांना शिकवितांना स्पर्शाचा व ध्वनीचा खूपच उपयोग होतो. एखाद्या कागदावर वेगवेगळे रंग असले तर ते त्यांना दिसूं शकत नाहींत. पण वेगवेगळे आकार, चढउतार, कमीजास्त जाडी, हें त्यांना स्पर्शानें चटकन समजतें. त्या स्पर्शपद्धतीवरच ब्रेल लिपि बसविलेली आहे. ही लिपि सहा उठावाच्या टिंबांवर बसवलेली आहे. ह्या लिपींत लिहावयाचें असल्यास एका जाड कागदावर एक लोखंडी पट्टी ठेवतात. ह्या पट्टीचा हेतु अक्षरें सरळ व योग्य जागीं यावींत हा असतो. नंतर एका अणकुचीदार सळईनें प्रत्येक अक्षराचीं टिंबें टोचतात. लिहून झालें कीं कागद उलटतात. उलट्या काग-दावर उठावाचीं टिंबें उठलेलीं असतात. त्यावर हात फिरवितांच अक्षर कोणतें हें कळतें. कागद उलटा करायचा असल्यानें आंधळे उजवीकडून डावीकडे लिहितात. ही ब्रेल पद्धत इंग्रजी अक्षरावर बसवलेली आहे. ह्या लिपीच्या बाबतींत व अंधांच्या कल्याणाच्या बाबतींत कै. श्री. नीलकंठराव छत्रपति ह्या गृहस्थांनीं फार प्रशंसनीय कार्य केलें आहे. निरनिराळ्या शाळांत निरनिराळ्या पद्धती चालू आहेत. पण सर्वमान्य होण्यासारखी, मराठी व

गुजराथी ब्रेल लिपि त्यांनीं शोधून काढली. त्यांचे बंधु हरिप्रसाद छत्रपति यांनीं ह्याविषयीं अनेक पुस्तिका प्रसिद्ध करून फार उपयुक्त कार्य केलें आहे. ह्या स्पर्शपद्धतीवर आधारूनच अंधाचें शिक्षण–साहित्य केलेलें असतें. त्यांचे नकाशे उठावाचे असतात, त्यांचे खेळायचे पत्ते कोपऱ्यांत उठावानें अक्षरें उमटवून केलेले असतात. त्यांचीं घड्याळें खास बनवलेलीं असून काट्यांवर हात ठेवून किती वाजले हें ते सांगूं शकतात. कोणतीहि गोष्ट शिकतांना मनाची एकाग्रता व्हावी लागते. लक्ष ढळतें कशामुळें तर आसपास कांहीं घडल्यानें, नवीन वस्तु दिसल्यानें, मनांत वेगळे विचार आल्यामुळें; पण ज्यामुळें लक्ष ढळतें, तें बघण्याकरितां डोळेच नसल्यानें अंधांचें मन एकाग्र लौकर होत असावें असा अंदाज आहे. शिवाय डोळे नसल्यानें ऐकण्याकडे सर्व लक्ष लागतें व श्रवणशक्ति तिखट भासते. म्हणून अंधांना शिकविण्याचें मुख्य कार्य श्रवणशक्ति व स्पर्शज्ञान यांवर अवलंबून असतें. पण आज आपल्याकडे हवें तेवढें शिक्षण–साहित्य नाहीं. ब्रेल लिहायला व वाचायला शिकलेल्या लोकांच्याकरितां पुरेशीं पुस्तकें नाहींत. संगीत शिकण्याकरितां पुष्कळ भर प्रत्यक्ष ऐकण्यावर द्यावा लागतो.संगीतासाठीं लागणारी 'नोटेशन्स' किंवा आलेखनपद्धति शिकविण्यांत यावी व त्याकरितां उठावाचीं पुस्तकें करण्यांत यावीं. या पुस्तकाप्रमाणेंच ज्यांना शिकणें अशक्य आहे अगर ज्यांचें स्पर्श-ज्ञान गेलें आहे त्यांच्याकरितां 'बोलकीं पुस्तकें' करायला हवीं. बोलकीं पुस्तकें म्हणजे सुमारें अर्धा तास चालणाऱ्या ग्रामोफोन रेकॉर्ड्स्. ह्यावर एखाद्या माणसाचें वाचन आलेखित केलेलें असतें. हीं बोलकीं पुस्तकें इतरहि लोक जे संधिवात किंवा इतर रोगांनीं अंथरुणावर असतात, ज्यांचें स्पर्शज्ञान गेलेलें असतें, त्या लोकांकरितांहि फार उपयुक्त असतात.

मुके आणि बहिरे ह्यांच्या शिक्षणांत एक मोठी सोय असते. ती म्हणजे दृष्टीची. त्यामुळें त्यांना प्रत्यक्ष वस्तु दाखवून तिच्या नांवाचा उच्चार करून किंवा तें लिहून वस्तूची ओळख लौकर पटवितां येते. त्यामुळें मुलांची समज लौकर वाढते. पण बहिऱ्या मुलांच्या बाबतींत मोठी अडचण म्हणजे ध्वनीची समज. आपण क्षणभर लहान आहोंत अशी कल्पना केली आणि आपण उच्चार कसे शिकलों ह्याची आठवण केली तर ह्याची स्पष्ट उमज येईल. लहान असतांना मुलांना येवढेंच कळतें कीं घशांतून कमीजास्त हवा जाते व

तऱ्हेतऱ्हेचे आवाज निघतात. प्रत्येक ध्वनीला आपण जो विशिष्ट अर्थ दिला आहे त्याची जाणीव मुलांना नसते. हा अर्थ कसा कळतो ? लहान मूल कुत्रा बघतें. कुत्रा भू: भू: करून भुंकतो. मुलाला तो आवाज नवा वाटतो. पुन्हा कुत्रा दिसला कीं त्याला त्या आवाजाची आठवण येते. कारण अर्धसुप्त मनामध्यें तो आवाज व कुत्रा यांची सांगड बसलेली असते. समजा रात्रीं निजल्यावर त्यानें भुंकण्याचा आवाज ऐकला तर त्या मुलाच्या अंतश्चक्षूपुढें तो पाहिलेला कुत्रा प्रगट होतो. ही ध्वनि आणि अर्थांची सांगड व्युत्पत्ति शास्त्राचा अभ्यास करतांना ठळकपणें दिसते. भुंकणें हें क्रियापद तरी कसें आलें असेल ? मूल आवाज ऐकतें आणि त्याची नक्कल करते व अर्थ कळला असेल तर विशिष्ट वेळींच तो शब्द वापरतें. बाबा म्हटल्यावर जर वडील ही मुलाची कल्पना असेल तर वाडिलांना पाहून तो बाबा म्हणेल. बाबा म्हणून कोणी हांक मारली तर स्वतः इकडे तिकडे पाहील कीं खरोखरच वडील आले आहेत कीं काय ? पण तिसराच कोणी गृहस्थ घरीं आला व त्याचेंहि नांव बाबाच निघालें तर मुलाच्या मनाचा गोंधळ होईल. पण विचारांतीं त्याच्या लक्षांत येईल कीं एक बाबा म्हणजे आपले वडील व एक बाबा म्हणजे आलेले नवे पाहुणे. मुलाच्या मनांत ही सर्व क्रियाप्रतिक्रिया होते ह्याचें कारण त्याला ऐकूं येते. आवाजाची तीक्ष्णता, कमीजास्त मंजुळपणा, आवाजाची जाडी ही लक्षांत येते. जे आवाज अपरिचित असतात, गोड असले तरी मोठे असतात, ते ऐकले तर मूल दचकतें. म्हणून बहिऱ्या मुलाला उच्चार शिकविणें अतिशय जड जातें. त्याला उच्चारणशक्ति असते, पण उच्चाराचें स्वरूपच आकलन होत नाहीं. म्हणून उच्चार व त्याचे अर्थ ह्यांची सांगड त्याच्या मनांत घालण्याकरितां वेगळ्या पद्धति वापरण्यांत येतात. त्या म्हणजे ओष्ठवाचन ( Lip-Reading ) व कंपमान (Vibrations) पद्धती.

ज्या लोकांना ह्या पद्धती साधत नाहींत त्यांच्याकरितां कांहीं शाळांतून तिसरी पद्धत शिकविलेली मीं पाहिली. ती म्हणजे खुणांची ( Signs ) पद्धत. एका विशिष्ट वस्तूच्या स्वरूपावरून एखादी खूण ठरवायची व त्यावर कारभार चालवायचा. उदाहरणार्थ घड्याळ मनगटावर बांधतां, म्हणून मनगटावर बोट ठेवून मग प्रश्नार्थक अंगुली करायची, पण ही पद्धत बरोबर

नाहीं ह्याचें कारण या सर्व खुणा सर्वत्र एकच असतात असें नाहीं. शिवाय तें दिसायलाहि थोडेसें विचित्र दिसतें.व त्यामुळें एखादा गृहस्थ बाहेर हास्यास्पद होण्याचा संभव असतो. ओष्ठवाचन–पद्धति ही दृष्टीवर आधारलेली पण खोल निरीक्षणांतून निर्माण झालेली आहे. 'आ' चा उच्चार करतांना दोन्ही ओठ विलग होतात तर 'प' चा उच्चार करतांना दोन्ही ओठ एकत्र येऊन, चटकन् विलग होतात व कोंडलेली हवा ओठांतून बाहेर येते. अशा तऱ्हेनें प्रत्येक उच्चार कसा होतो हें पाहून त्यावरून त्या माणसानें काय उच्चार केला असेल हें ठरवलें जातें. पण ह्या पद्धतीचा मोठा दोष म्हणजे तिचा मर्यादितपणा. भाषा व उच्चारशास्त्र हें प्रगत झालेलें असल्यानें प, फ, ब ह्यांतील सूक्ष्म भेद कानांना कळत असले तरी ओठाची हालचाल जवळजवळ सारखीच होते. शिवाय जन्मजात श्रवणहीनाला त्याचा थोडाच फायदा होतो. ह्याच्या उलट कंपपद्धति ही स्वरांच्या होणाऱ्या कंपावर अवलंबून आहे, ओठांच्या हालचालीवर नाहीं. समजा, मी बोलतांना एखादा फुगा समोर ठेवला तर माझ्या उच्चारांच्या कमी अधिक आघातानें तो कमीजास्त प्रमाणांत थरथरतांना आढळेल. रेडिओवरून ऐकतांना जर आवाजांत फरक झाला तर त्या प्रमाणांत रेडिओपुढचा कापडी पडदा थरथरतांना दिसतो व ह्यामुळें ओष्ठ्य, तालव्य वगैरे उच्चारांतले भेद स्पष्ट होतात. पुष्कळदां बहिरीं मुलें बोलणाराच्या गळ्यावर हात ठेवतात व त्यामुळें त्यांना ह्या कंपांतला भेद कळतो. सुप्रसिद्ध कार्यकर्त्या कु. हेलेन केलेर ह्यांना संगीताची गोडी ह्या पद्धतीनेंच कळली. ह्या पद्धतीचा अवलंब आपल्या देशांत फारसा केला जात नाहीं. सूक्ष्म ध्वनि ग्रहण करणारे व त्याचे बरोबर कंपांत रूपांतर करणारें शिक्षण–साहित्य निर्माण व्हायला पाहिजे. म्हणजे हें साध्य होईल. ह्या पद्धतीमध्यें अजून खूप संशोधन व्हायचें आहे. ओष्ठ्य व तालव्य व त्यांतील अति सूक्ष्म भेद कंपनामध्यें कितपत प्रगट होतात हेंहि स्पष्टपणानें अजून कळलेलें नाहीं. पण आज अस्तित्वांत असलेल्या पद्धतींत, ही पद्धत अधिक प्रगत वाटते. आपल्या भारतीय संगीत शास्त्रामध्यें स्वरकंपनाचा पुष्कळच खोल विचार करण्यांत आला आहे. स्वरांच्या विशिष्ट रचनेमुळें कोणता भाव निर्माण होतो हें रागरचनेमध्यें स्पष्ट दिसतें. हास्य, खेद वगैरे भावांना सुसंगत अशीं स्वरमिश्रणें केलीं गेलीं आहेत व त्यावर रागाचें

स्वरूप बांधलेलें आहे. त्याचप्रमाणें कोमल व तीव्राचा विचार करतांना स्वरोच्चाराच्या तीक्ष्ण व मृदु आघाताच्या परिणामाची दखल घेतली गेली आहे. जर विशिष्ट रागिणी गायली तर मन शोकानें भरून गेलें असें वाटतें, तर एखादी रागिणी ऐकतांना आनंदानें मन डुलायला लागतें. शिवाय त्यावर रागवेळ ठरविण्यापर्यंत आपल्या संगीत शास्त्रानें मजल मारलेली आहे. ही सर्व सुधारणा ज्या ध्वनिशास्त्रावर आधारलेली आहे, त्याचा उपयोग ह्या पद्धतींत खूपच करण्यासारखा आहे. नृत्यशास्त्रांतहि मुद्रा ठरविण्यांत आलेल्या आहेत. पण नृत्य व संगीत यांचा अपंगांच्या नव्हे तर कोणत्याहि शिक्षणासाठीं व्हावा तसा उपयोग करण्यांत आलेला नाहीं.

ह्या शारीरिक पंगूपणाच्या संदर्भांतच, जन्मजात रोगानें किंवा अपघातानें ज्यांना अवयवांचा पांगळेपणा आलेला आहे त्यांचा विचार व्हायला हवा. आतांपर्यंत इंद्रियजन्य पंगूपणा किंवा बहिरे, मुके, आंधळे व तत्सम पंगु मुलें ह्यांच्या प्रश्नांचा विचार करण्यांत आला. आतां ज्यांचे अवयव निकामी झाले आहेत त्यांचे प्रश्न काय आहेत हें पाहायला हवें. अर्थातच ह्या मुलांची संख्या पुष्कळच मर्यादित आहे. पण त्यांच्या पुनःस्थापनेचे व मानसिक दुर्बलतेचे प्रश्न सारखेच असल्यानें त्यांचाहि विचार येथें अभिप्रेत आहे. अशा मुलांचा कुटुंब व आप्तेष्ट यांच्यावर भार पडतो हें तर खरेंच, परंतु आपण पंगु आहोंत या भावनेचा त्या मुलांवर इतका वाईट परिणाम होतो कीं त्या मुलांच्या मनांत न्यूनतेची अगर तत्सम विकृति निर्माण होते व तें मूल समाजामध्यें नीट मिसळूं शकत नाहीं. एखाद्या मोठ्या माणसाला अपघात झाला तर त्याला धक्का बसतो, परंतु हळू हळू तो मनुष्य आपली शक्ति पूर्ववत् मिळविण्याचा प्रयत्न करतो. परंतु मुलाला जर जन्मजात पंगूपणा असेल अगर समजूत येण्यापूर्वीच जर मूल पंगु झालें असेल तर कोणती शक्ति मिळवायची आहे, कोणत्या अडचणी येणार आहेत ह्याची त्याला कल्पना नसते व त्यामुळें त्याला शिकविणें जड जातें. ह्या मुलांच्याकडे समाज एक दुर्लक्ष तरी करतो किंवा त्यांच्या दयाबुद्धीनें दानधर्माचा वर्षाव करतो. आपण कोणाच्या तरी दयेवर जगतों आहों ही भावना जर एखाद्या मुलांत दृढ झाली तर ती पुढें फार विकृत स्वरूप धारण करते व त्यांतून निर्लज्जपणा, समाजाबद्दल तिरस्कार, समाजावर सूड घेण्याची बुद्धि वगैरे अनेक भावना प्रकट होतात.

वस्तुतः त्या मुलांना पोसणें ही जबाबदारी आहे ही भावना सर्वांत चांगली. त्यायोगें मदत करणें हें जसें समाज व सरकार यांचें कर्तव्य आहे, तसेंच मदतीचा योग्य उपयोग करणें ही मुलांची जबाबदारी ठरते. ह्या मुलांच्या शिक्षणाचा व पुनःस्थापनेचा प्रश्न म्हणजे वैद्यक शास्त्रज्ञ व समाजसेवक यांना एक प्रकारचें आव्हानच आहे. कारण असा पंगूपणा न येईल अशी खबरदारी कशी घ्यावी? जर तो टाळणें अशक्य असेल तर निदान त्यांच्या परिणामाच्या स्वरूपाची तीव्रता कमी कशी करावी ? त्याचे वाईट परिणाम कसे टाळावे ? त्या मुलाला समाजांत व घरांत इतर मुलांच्या सारखें स्थान कसें मिळवून द्यावें ? त्याच्या उरलेल्या शक्तींचा संपूर्ण विकास कसा करावा ? त्या मुलाकडे पाहण्याची समाजाची दृष्टि कशी बदलावी व त्या मुलाला समाजांत उत्पादक घटक म्हणून काय जागा असावी ? ह्या सर्व प्रश्नांना समाजसेवकांना तोंड द्यावें लागतें.

अशा मुलांचें लक्ष बहुधा आपल्या पंगूपणाकडे केंद्रित झालेलें असल्यानें तीं एक तर मागासलेलीं असतात किंवा त्यांना आपल्या सुप्त शक्तींच्या-विषयीं अविश्वास वाटत असतो. तो नष्ट करून त्यांना इतर चार मुलांसारखें स्थान मिळवून देणें म्हणजेच त्यांची खरीखुरी पुनःस्थापना. अंध माणसांच्या-बाबत एका लेखकानें असें म्हटलें आहे कीं, “आंधळे न होणें हा त्यांचा पहिला हक्क आहे.” त्याचप्रमाणें “पंगु न होणें हा पंगु मुलांचा पहिला हक्क आहे.” पुष्कळदा जीवनसत्त्वें नसलेला आहार, सुप्तावस्थेंत असलेले शारीरिक दोष वेळच्या वेळीं न दिसणें, संसर्गजन्य रोग, अपघात यामुळें पंगूपणा, येतो. तो टाळण्यासाठीं प्रसूतिपूर्व अवस्थेंत व मुलाच्या जन्माच्या वेळीं काळजी घेतली जाणें इष्ट आहे. त्याकरितां चांगली प्रसूतिगृहें व भावी मातांच्याकरितां साह्य देणारीं वैद्यकीय केन्द्रें निघालीं पाहिजेत. मुलांना शक्य तितका पौष्टिक आहार मिळाला पाहिजे, मुलांच्यामध्यें असणारे सुप्त शारीरिक दोष शोधण्या-करितां ‘क्लिनिक्स’ व संसर्गजन्य रोग वा अपघात टाळण्याकरितां लोकांना शिक्षण दिलें पाहिजे. रुग्णालयांत अशा मुलांना औषधोपचार किंवा शस्त्र-क्रियेची सोय उपलब्ध करून देण्यांत येते. परंतु अशा मुलांच्या शरीरावर व मनावर जे परिणाम होतात ते टाळण्याकरितां एखादें अनुचिंतन (After Care Dept.) खातें लागतें. मुंबईच्या कांहीं रुग्णालयांतून अशा तऱ्हेची सोय केलेली आढळते. परंतु ही सोय सर्वत्र करणें जरूर आहे. ह्या खात्यांत

तज्ज्ञ डॉक्टर्स शरीरोपचार तज्ज्ञ ( Physicotherapist ) वैद्यकीय समाजसेवक ( Medical Social Workers) व्यवसायोपचार तज्ज्ञ ( Occupational Therapist ) मनोव्यथा शास्त्रज्ञ ( Psychiatrist ) वगैरे लोक असतात. डॉ. हॅरोल्ड बाव्रम म्हणतात, "ज्या रुग्णालयांत रोग्यांना खूप दिवस ठेवायचें असतें त्या ठिकाणीं या मुलांच्या शिक्षणाची व करमणुकीचीहि व्यवस्था करायला हवी. एखाद्या मुलाच्या पायाच्या हाडांत कांहीं कठीण स्वरूपाचा दोष असेल तर त्यावरचे औषधोपचार व शस्त्रक्रिया संपल्यानंतर त्याच्या पायाला आवश्यक असणारे कृत्रिम तऱ्हेचे बूट, कृत्रिम अवयव द्यावे लागतात. नंतर त्याला चालण्याची, उभे राहण्याची शक्ति येण्याकरितां निरनिराळीं कृत्रिम साधनें, खेळणीं देण्यांत येतात. त्यायोगानें तो उभा राहतो असें वाटल्यास त्याला पायाला सर्व तऱ्हेच्या हालचालींचें वळण यावें म्हणून तशा तऱ्हेच्या तिपाया, स्टॅंड्स, वगैरे देऊन त्याची व्यवस्था करण्यांत येते." मुंबईचें मुलांचें रुग्णालय ह्या बाबतींत पुष्कळच समृद्ध आहे.

मुलाच्या शरीरांतला पंगूपणा नाहींसा करतांनाच, त्यामुळें आलेला मानसिक व सामाजिक पंगूपणा नाहींसा करण्याकरितां प्रयत्न करावे लागतात. पण पुष्कळदां ह्या मुलांच्या दोषाकडेच लक्ष दिलें जातें. मूल म्हणून, व्यक्ति म्हणून त्याकडे पाहिलें जात नाहीं. मुलाचा पांगळा पाय अगर दुर्बळ हृदय दुरुस्त करण्याकडे लक्ष देतांनाच त्या मुलाचें पुढें काय होणार, तो मनानें दुर्बल झाला आहे काय वगैरेंबाबत विचार करावा लागतो. "मुलाचा पाय ही स्वतंत्र वस्तु नसते. तर हात, पाय, मन, बुद्धि ह्या सर्वांनीं मिळून मुलाचें व्यक्तिमत्त्व बनत असतें. त्या मुलाला इच्छा असतात, भावना असतात, विचार असतात, म्हणून मुलाचें शारीरिक व मानसिक असे दोन तुकडे पाडतांच येणार नाहींत." ( डॉ. कु. गौरीरानी बानर्जी ) शारीरिक पंगूपणाचा त्याच्या मनावर, व्यक्तिमत्त्वावर व वागणुकीवर फार खोल परिणाम होत असतो. बहुतेक लोक ह्या पंगु मुलांच्यांत मिसळणें शक्यतोंवर टाळतात. ह्याचें कारण त्यांना त्यांच्या पंगु शरीराची किळस वाटते अगर आपण त्याच्या संगतींत असणें त्यांना कमीपणाचें वाटतें. कित्येकांची—विशेषतः खेड्यांतून— अशी समजूत असतें कीं पंगूपणा हें त्याच्या पूर्वजन्मांतील कर्माचें फल असल्यानें त्याला त्या पंगूपणांतून मुक्त करणें चुकीचें आहे. फार झालें तर त्या पंगू मुलांना

दया दाखवावी, भीक घालावी, पण या पलीकडे जाऊं नये. केवळ लोकच नव्हे तर आईबापांचीहि हीच वृत्ति दिसून येते. कांहीं आईबाप अशा मुलांना जिवापाड जतन करून त्यांना मनानेंहि पंगु करतात, तर कांहीं आईबाप मुलांना टाकून द्यायला निघावें इतक्या तुसडेपणानें वागवतात. एक उदाहरण असें मला आढळलें कीं एका आईनें मूल नको म्हणून गर्भपात करण्याचा प्रयत्न केला. पण तो यशस्वी न होतां तिला पंगु मूल झालें. त्या आईच्या मनामध्यें ह्या पंगूपणाला अप्रत्यक्षपणें आपण जबाबदार आहों ही भावना असल्यामुळें ती त्या मुलाची इतकी काळजी करीत असे कीं त्यामुळेंच त्या मुलाचें नुकसान झालें. याच्या उलट एका उदाहरणांत मला असें आढळलें कीं एका सुदृढ प्रकृतीच्या कुटुंबांत एकच मूल पंगु असल्यानें त्या मुलाकडे कुटुंबावरील कलंक म्हणून पाहिलें जात होतें.त्याच्या वडिलांना आपली इतर गुटगुटीत मुलें पाहून समाधान वाटे. पण तितक्याच प्रमाणांत या मुलाबद्दल तुच्छता वाटे. ह्याचा परिणाम म्हणून त्या मुलाची बुद्धि अशी वाहे कीं या इतर माणसांनाहि पंगु करून टाकावें. त्याकरितां त्यानें एकदां एका भावाचा पाय सुरीनें कापण्याचा प्रयत्न केला. त्याचें मन कोणालाच कळलें नाहीं आणि पंगूपणाच्या बरोबर गुन्हेगार हें विशेषण त्याला मिळालें व बापानें त्याला ‘ रिमांड होममधें ’ पाठवून दिला. कांहीं श्रीमंत आईबापांना तर असें वाटतें कीं, ह्या पंगु मुलांना जगांत कधींहि काम करत' येणार नाहीं, करावें लागणार नाहीं. तो आपल्या मिळकतीवरच जगणार आहे, मग त्याच्या शिक्षणाची यातायात कां करावी ! पण ह्या कल्पनेमुळेंच त्या मुलाच्या मनाची वाढ होत नाहीं. त्याला व्यवसाय उरत नाहीं व तीं मुलें जास्तच बहकतात. अपस्मार झालेल्या मुलांना ‘फिट्स’ येतात व त्यासाठीं कायम कोणीतरी त्यांच्या संरक्षणासाठीं बरोबर तरी असतें किंवा त्याच्या हालचालींबाबत पालक फार जागरूक असतात. अपस्मारामध्यें हात गेलेला नसतो, कीं पाय पांगळा झालेला नसतो. त्यामुळें आपण अगदीं इतर मुलांसारखेच आहोंत असें त्या मुलाला वाटतें व तें मूल हें संरक्षण व आईबापांची जागती नजर पाहिली कीं त्यांचा तिरस्कार करूं लागतात. याकरितां आपल्याला संरक्षण हवें आहे हें त्या मुलालाच पटवून द्यायला लागतें.

ह्या मुलांना आपल्या भोंवतालचा समाज, जग याविषयीं पुष्कळदां

अत्यंत चीड असते, राग असतो. ह्याचें कारण त्यांना समाजांत मिळणारी वागणूक हेंच होय. पंगूपणा हा ज्या मुलीचा अपराध नसतो त्या मुलीला कुब्जा, अष्टवक्रा अशीं नांवें ठेवून नातलग हसूं लागले कीं तिला त्यांचा संताप येतो. ती त्यांना मनांतल्या मनांत शिव्या देते व त्यांचेंहि जें उणें असेल तें शोधण्याचा प्रयत्न करूं लागतें. आईबापांना आपल्या प्रेमाचें प्रदर्शन करायचें असलें म्हणजे ते या मुलांना घरीं बसवून ठेवतात, त्यांना जपतात, त्यांना हलूं देत नाहींत, खेळूं देत नाहींत, त्यांना जन्मभर ' बाळ ' म्हणूनच वागवतात. त्या मुलांना आपल्या आईबापांच्या स्वभावांतला हा दोष लक्षांत आला तर तीं मुलें आपल्या पंगूपणाचा आपल्या लहरीचें समर्थन म्हणून उपयोग करूं लागतात. कसेंहि वागावें, व आईबाप रागावतील असें वाटलें तर स्वतःला निंदावें, हातपाय आपटावे, " मी पंगु आहें म्हणून मला असें वागवतां काय " ? असें म्हणावें, म्हणजे आईबाप विरघळतात. ह्या मुलांचे प्रश्न समजावून घेऊन त्यांना योग्य अशी उपाययोजना करतांना ' केसवर्क ' पद्धतीचा फार उपयोग होतो. ' केसवर्क ' याचा अर्थच असा कीं ज्या व्यक्तींच्या स्वभावांत, मनांत, व्यक्तिमत्त्वांत, व वातावरणांत कांहीं दोष निर्माण झाला असून कोणाचीहि मदत मिळाल्याशिवाय त्यांना त्या परिस्थितीशीं जुळतें घेतां येणार नाहीं; त्यांना प्रत्येकाला वेगळी स्वतःच्या पायावर उभें राहण्याला मदत करणें म्हणजेच ' केसवर्क. ' कित्येक वेळां आईबापांची परिस्थितीच अशी असते कीं त्यांच्या मनावरचें ओझें त्यांना असह्य होतें. एका लेखामध्यें जॉर्जिया बॉल ह्या लेखिकेनें हें चित्र उत्तम काढलेलें आहे. " ज्या आईला खूप मुलें आहेत, खूप काळज्या आहेत त्या आईला या पंगु मुलाचा असा कंटाळा येतो कीं हें मूल जन्माला आलें नसतें, अगर त्याचें आयुष्य संपलें तर बरें असें वाटूं लागतें. रात्र रात्र जागावें लागतें, औषधाचे कप माडीवर नेणें व 'बेड पॅन ' खालीं आणणें यांतच दिवसाचा सगळा वेळ जातो. इतर मुलांच्याकडे दुर्लक्ष होतें. वेळेवर जेवण होत नाहीं, नवरा कंटाळलेला असतो, तो ऑफिसांतच जास्त वेळ राहतो व डॉक्टर तर सांगतात कीं या मुलाकडे जास्त वेळ लक्ष द्या, त्याला आनंदी ठेवा; अशा परिस्थितीत आईला त्या मुलाचा कंटाळा आला तर ती चूक आहे का ? " म्हणूनच अशा परिस्थितींत तिच्या मदतीला समाजसेवकांची

आवश्यकता आहे. परदेशांत कुटुंब कल्याण केंद्रें असतात. ( Family welfare agency ) ह्यांच्या वतीनें ही व्यवस्था करण्यांत येतें. पण भारतांत अशी व्यवस्था फारशी नाहीं. मुंबईमध्यें ' पारशी पंचायत ' व ' फॅमिली वेलफेअर केंद्र ' या संस्थातर्फे असें कार्य करण्यांत येतें, पण त्याचेंहि स्वरूप मर्यादित आहे.

पंगु मुलामध्यें सेवा करणाऱ्या समाजसेवकाचें पाहिलें कर्तव्य असें असतें कीं त्या मुलाच्या मनांत विश्वास निर्माण करून त्याच्या अडचणी काय आहेत हें समजून घेणें. त्याला पुष्कळदां एकलेपणा, असुरक्षितपणा, न्यूनता वाटत असते, ती काढून टाकणें. त्या मुलाचे घरीं, शाळेंत व बाहेर समाजांत जमवून देणें व सर्वांत महत्त्वाची गोष्ट म्हणजे आपण अपंग आहोंत त्यावर आतां दुःख मनस्ताप करण्यांत अर्थ नाहीं, त्यांतून निर्माण होणाऱ्या अडचणी दूर करून समाजाचा एक उपयुक्त घटक, इतर चारचौघांसारखा माणूस बनणें हें कर्तव्य आहे ही जाणीव त्या मुलाच्या मनांत रुजवावी लागते. अर्थातच हें कार्य अत्यंत अवघड आहे. ह्या क्षेत्रांत, मुंबईमध्यें सौ. फातमा इस्माइल व डॉ. सौ. निमकर ( व्यवसायोपचार-तज्ज्ञ ) ह्यांनीं केलेलें कार्य फार प्रशंसनीय आहे.

केवळ पंगूच नव्हे तर अंध, मुके, बहिरे या सर्व मुलांमध्यें ज्याला ज्याला शारीरिक दुर्बलता प्राप्त झाली आहे त्या सर्व मुलांमध्यें ही नवी जाणीव, नवा आत्मविश्वास निर्माण केला तरच त्यांच्या जीवनांत कांहींसा प्रकाश आणल्याचें श्रेय मिळेल. समाजांत कोणतेंहि मूल निरुपयोगी नसतें. त्यांच्या योग्य शिक्षणानें उपयोग करून घेणारे मात्र नसतात. त्यांच्या अभावीं त्यांचें जीवन म्हणजे एक दुःखभरी कहाणीच असते. मरण येत नाहीं म्हणून जगलेलें तें आयुष्य असतें. त्या जीवनांत संजीवनी कोण ओतणार ? हा प्रश्न हजारों अपंग, मुकीं, बहिरीं मुलें विचारत आहेत त्याचें उत्तर समाज व सरकार यांनींच द्यावयाचें आहे.

❀ ❀ ❀

: ३ :

# मनोदुर्बल व मनोविकृत मुलें

शारीरिक दुर्बलतेमुळें मुलांच्या मनांत विकृति निर्माण होण्याचा संभव असतो. ज्या विकृतीमुळें मुलाला त्याच्या घरांत ओझें मानलें जातें, समाजामध्यें उत्पादनक्षमता नसलेला एक घटक मानलें जातें, अशा प्रकारच्या विकृति इतर अनेक प्रकारांनीं दुर्बल असलेल्या मुलांच्यांत-सुद्धां दिसतात. कांहीं मुलें सामाजिक दृष्टया अपंग असतात तर कांहीं मुलें आर्थिक दृष्टया निराधार असतात. कांहीं मुलांचें भवितव्य चुरगळलें असतें तर कांहीं मुलांच्यामध्यें जन्मजात अगर अपघातानें येणारी मनोदुर्बलता त्यांच्या संपूर्ण आयुष्यावर निराशेची काळसर छाया पसरवते. मनोदुर्बलतेमध्यें अनेक भेद आहेत. अनुभवी शिक्षकाला किंवा पालकाला ते दोष सहज दृष्टोत्पत्तीस येतात. एखादा मुलगा मागासलेला असतो, तर एखादा बुद्धिमंद असतो. कांहीं मुलांना प्रखर बुद्धि लाभूनसुद्धां त्या बुद्धीचा योग्य उपयोग करायची शक्ति किंवा संवय नसते, तर कांहीं मुलांच्या मध्यें मानसिक दृष्टया दुर्बलता असल्यामुळें त्यांची संपूर्ण वाढ होऊं शकत नांहीं. या विकृतींपैकीं कांहीं विकृती जन्मतः आलेल्या असतात, कांहीं अपघातानें येतात तर कांहीं परिस्थितीनें निर्माण होतात. समजा केशव नांवाचा मुलगा आहे. ह्या मुलाला वर्गांत अगर घरीं अनेक वेळां सांगूनसुद्धां एखादी गोष्ट ध्यानांत येणें कठीण जातें. चार सामान्य प्रश्न जरी

विचारले तरी त्याचीं उत्तरें देतांना त्याला बराच विचार करावा लागतो. याचें कारण तो मंदबुद्धि असून त्याची आकलन—शक्तिच मर्यादित आहे. याच्या उलट नारायण नांवाचा एक मुलगा त्याच वर्गांत आहे. या मुलालाहि एखादा विषय सांगितल्यानंतर समजणें कठीण जातें. ह्याचें कारण त्या विषयाची पार्श्वभूमि त्याला माहीत नसते. त्यामुळें इतर मुलांच्या तुलनेनें तो मागासलेला वाटतो. वस्तुतः त्याची बुद्धि चांगली असल्यामुळें त्या वर्गाला नवा विषय शिकवला तर इतरांप्रमाणें त्यालाहि समजतो. परंतु सर्वसामान्य शिक्षणक्रमांत कांहीं कारणांनीं मागील अभ्यासक्रम कच्चा राहिल्यानें अगर योग्य तऱ्हेनें न समजल्यानें तो वर्गांत मागासलेला वाटतो. कांहीं मुलें परिस्थितीनें विकृत मनाचीं बनत जातात. उदाहरणार्थ गोविंद नांवाच्या मुलाला त्याच्या घरांतील भावंडें हीं प्रखर बुद्धीचीं असल्यानें नेहमींच तुच्छतेनें वागवण्यांत येतें. त्यामुळें आपल्या हातून कांहीं अभ्यास होईल काय, आपल्याला कांहीं कळेल काय, किंवा आपलें हंसेंच होईल या भीतीनें तो कायम गुरफटला गेला असल्यामुळें त्याच्या बुद्धीची हवी तशी वाढ होत नाहीं.

मुलांच्या बुद्धीमधील हे सूक्ष्म भेद अनुभवी शिक्षकाला कळत असले तरी त्याची प्रत्यक्ष मापन करण्याची कोणतीहि पद्धत आपल्याकडे उपयोगांत आणली जात नाहीं.ज्यावरून मुलाच्या बुद्धिमत्तेचें निदान करावयाचें असें एकच साधन आज अस्तित्वांत आहे आणि तें म्हणजे शाळेंतून होणाऱ्या परीक्षा. वस्तुतः मुलाच्या वाढीबरोबर त्याच्या व्यक्तिमत्त्वाची योग्य वाढ झाली किंवा नाहीं हें पाहण्याकरितां त्यांचा उपयोग केला जावा. परंतु आज तरी परीक्षा या मुलाचा एका विशिष्ट विषयांतील अभ्यासक्रम पुरा झाला किंवा नाहीं हें पाहण्याकरितां घेतल्या जातात. म्हणजेच परीक्षेचा भर विषयावर असतो; विद्यार्थ्यावर नसतो. त्याचप्रमाणें आजची परीक्षापद्धतीहि पुष्कळशी स्मरणशक्तीवर आधारली आहे असें आपणांस दिसून येतें. या सर्वांपेक्षांहि या पद्धतींत असणारा सर्वांत मोठा दोष म्हणजे तुलनात्मक विचाराचा. आपण एखाद्या शिक्षकाला हा मुलगा कसा काय आहे असें विचारलें तर तो उत्तर देतो कीं बरा आहे. वर्गांत त्याचा नंबर दहावा आहे. याचा अर्थच असा कीं त्या मुलाच्या बुद्धीचें स्वतंत्र मापन असें झालेलें नसून वर्गांतील इतर मुलांच्या तुलनेनें त्याची बुद्धि मोजली जात आहे. याच प्रश्नाचा विचार थोड्या

वेगळ्या दृष्टिकोनांतून करणें अगत्याचें आहे. एखादा मुलगा जेव्हां जन्माला येतो तेव्हां स्वभावतः बुद्धीच्या कांहीं कक्षा बरोबर घेऊन येतो. सरावामुळें व परिस्थितीमुळें या कक्षांचा थोडाफार विकास होत असला तरी मुलाच्या बुद्धिमत्तेचें मापन करतांना तो त्या कक्षेच्या किती जवळ आला आहे हें जर मापलें गेलें तरच त्याच्या बुद्धीचें खरें ग्रहण आपणास झालें असें म्हणतां येईल. केवळ चाळीस मुलांच्या तुलनेमध्यें तो पहिला राहतो म्हणून त्याची प्रगति झाली असें निरपवाद मानणें चुकीचें ठरेल. शिवाय ह्या तुलनात्मक क्रमांक-पद्धतीमुळें मुलाला अभ्यासाला लागणारी प्रेरणा पुरेशा प्रमाणांत मिळत नाहीं असें वाटतें. मागील उदाहरणच घ्यायचें झालें तर वर्गांत पंचवीसावा नंबर असणारा मुलगा जेव्हां खूप अभ्यास करेल तेव्हां चोविसावा नंबर मिळवील, फार झालें तर विसाव्या नंबरावर येऊन बसेल. परंतु त्याच्यापुढें जाणें त्याला अशक्य होतें. याचें कारण तेथें त्याच्या बुद्धीची शक्ति तोकडी पडते. वर्गांत, शाळेमध्यें किंवा सर्वत्र ही तुलनात्मक क्रमांक–पद्धति अंमलांत आणली गेल्याकारणानें त्या मुलाला असें वाटतें कीं आपला नंबर पंचविसाव्यावरून विसाव्यावर आला. पण कसेंहि झालें तरी आपण वर्गांत मंदबुद्धि मुलांतच गणले जाऊं. हा विचार एकदां मनांत ठाण मांडून बसला म्हणजे मुलाला अभ्यासाला पुरेशी प्रेरणा मिळत नाहीं.

हा दोष टाळण्याचा एकच मार्ग आणि तो म्हणजे प्रत्येक मुलाची तुलना त्याच्या स्वतःशीं केली गेली पाहिजे. समजा गोविंदाला गेल्या वर्षी गणित विषय शून्यापासून दहापर्यंत समजला तर या वर्षी तो दहाच्या पुढें किती गेला हें पाहिल्यास गोविंद आपल्या प्रगतीची तुलना गतवर्षीच्या प्रगतीशीं करूं शकेल व ती पुष्कळशा प्रमाणांत रास्तहि ठरेल. अर्थातच ह्या पद्धतीचा अवलंब करण्यापूर्वी लागणारें संशोधन अजून झालेलें आढळत नाहीं. शिवाय असा स्वतःच्या तुलनेचा आलेख काढण्यापूर्वी स्वतःच्या बुद्धीच्या कक्षा माहीत असणें आवश्यक असतें. परंतु त्या कक्षा कोणत्या रीतीनें निश्चित कराव्यात व कोणत्या रीतीनें त्यांचें संपूर्ण स्वरूप समजावून घ्यावें ह्याचा उलगडा व्हावा तसा झालेला नाहीं. या पद्धतीला आधार एकच सांपडतो आणि तो म्हणजे मूळच्या बुद्धीचा, व बुद्धिमापन–पद्धतीचा.

मूल किती वाढलें हें जन्मल्यापासून किती दिवस जगलें आहे या कालगणनेमुळें समजूं शकतें. मूल पांच वर्षांचें झालें याचा अर्थ मूल

जन्माला आल्याला पांच वर्षें झालीं. पांच वर्षाला आवश्यक असणारी जी नैसर्गिक वाढ आहे, ती त्या मुलाची झाली आहे किंवा नाहीं हें कांहीं त्या मुलाच्या वार्षिक किंवा कालगणनेच्या वयावरून कळून येत नाहीं. म्हणूनच मुलाचें बौद्धिक वय काढण्याचे प्रयत्न करण्यांत आले. मुलाची शारीरिक व बौद्धिक वाढ समांतर असतेच असें नाहीं. हें लक्षांत आल्यानंतर मुलाची शारीरिक वाढ वेगळी व बौद्धिक वाढ वेगळी असे मोजण्याचे प्रयोग सुरू झाले. उदाहरणार्थ एक मुलगा वयानें बारा वर्षांचा असला व त्याची मानसिक वाढ पुरेशी झालेली नसेल, तर तो मुलगा बुद्धीनें मागासलेला आहे, असेंच आजवर म्हणतां येत होतें, परंतु बुद्धि-मापनाच्या परीक्षा व साधनें निघाल्यापासून असें सांगतां येतें कीं मुलाचें शारीरिक वय बारा असलें तरी बौद्धिक वय सहाच आहे. हें बौद्धिक वय मोजण्याकरितां निरनिराळ्यां परीक्षा व पद्धति निरनिराळ्या मानसशास्त्रज्ञांनीं शोधून काढल्या आहेत. त्यावरून एका विशिष्ट समीकरणानें मुलाचा बुद्धिनिर्देशांक काढतां :येतो. त्या बुद्धिनिर्देशांकावरून मुलाची प्रगति पुष्कळ चांगल्या प्रमाणावर मोजतां येते.

या पार्श्वभूमीवर विकास झालेल्या बुद्धीचा विचार करणें येथें प्रस्तुत नाहीं. परंतु ज्यांना बुद्धिमंद समजलें जातें त्यांच्या विषयीं मात्र विचार करणें आवश्यक आहे. ह्या बुद्धिमंद किंवा मनोदुर्बल मुलांना समाजामध्यें योग्य असें स्थान कधींच मिळालेलें नाहीं. उलट इतिहासाचा असा पुरावा आहे कीं ह्या मुलांना कांहीं वेळां पछाडलेली किंवा समाजावर उगवलेलीं बांडगुळें असें समजून त्यांचा नायनाट करण्यांत आला आहे. कित्येक वेळां या मुलांची जन्मकुंडली पाहून तीं सुधारणार नाहींत असें कळलें तर त्यांना रांजणांत घालून निर्जन रस्त्यांत टाकावें किंवा डोंगरावरून लोटावें अगर वन्य श्वापदांच्या तोंडीं जाण्याकरितां रानावनांत सोडावें अशी पद्धत ग्रीस, रोम वगैरे ठिकाणीं अस्तित्वांत असलेली दिसते. भारतांतहि ह्या लोकांना कांहीं खास उपचार किंवा कांहीं खास व्यवस्था करून देण्यांत आली होती असें नाहीं. ह्या मुलांच्या मनोविकृतीचा अभ्यास करतांना त्याचे अनेक भाग पाडले गेले आहेत असें आपल्या लक्षांत येतें. वेडाच्या प्रकारांच्या कायदेशीर व्याख्या देशोदेशीं वेगळ्या आहेत. शास्त्रीय रीतीनें केलेल्या त्यांच्या व्याख्या मात्र वेगळ्या केलेल्या आहेत.

ह्या मनोदुर्बल मुलांचे प्रश्न त्यांच्या मनोदुर्बलतेमधून निर्माण होण्यापेक्षां त्यांना समाजामध्यें जी वागणूक मिळते त्यांतून पुष्कळदां निर्माण होतात. त्यांच्या बुद्धीची शक्ति मर्यादित असली तरी त्यामुळें होणाऱ्या अडचणींपेक्षां समाजाच्या रोजच्या जीवनामध्यें त्यांना संपूर्णपणें मिसळणें अशक्य असल्यामुळें अधिक अडचणी निर्माण होतात. सामान्य मुलांकडून ज्या सुसंगत व सुबुद्ध वागणुकीची अपेक्षा आपण करतों त्याच वागणुकीची अपेक्षा ह्या मनोदुर्बल मुलांच्यापासून केल्यामुळें हा घोटाळा निर्माण होतो. शरीरानें दुर्बल अगर अपंग असलेल्या मुलांना कांहीं रचनात्मक खेळ अगर काम देऊन त्यांच्यामधील सुप्त शक्तींना वाव देणें शक्य आहे. परंतु माणसाच्या शरीरावर ज्यायोगें ताबा ठेवला जातो त्या मनामध्यें अगर बुद्धीमध्यें कांहीं विकृति निर्माण झाल्यास त्या मुलाला समाजामध्यें उत्पादनक्षम नागरिक म्हणून जागा नसते व त्याचें आयुष्य व्यर्थ व परावलंबी बनतें. अशा बुद्धिमंद, मागासलेल्या व मनोविकृत मुलांना घरामध्यें ओझें समजून वागवलें जातें, समाजामध्यें टाकावू म्हणून उपेक्षिलें जातें व मित्रमंडळींत मनोदुर्बल म्हणून हेटाळलें जातें. मनानें मागासलेल्या, बुद्धीनें मंद असलेल्या विकृत मुलांचा प्रश्न अगदीं वेगळ्या स्वरूपाचा आहे. शरीरानें अपंग असलेल्या मुलांची पुनःस्थापना कोणत्याना कोणत्या उपायानें होऊं शकते. परंतु आपण कोणालाहि नको आहोंत ही न्यूनगंडाची छाया ह्या मतिमंद मुलांच्या जीवनावर सदोदित पडलेली असते. ह्या विकृति शोधून काढणें अनुभवी पालक अगर शिक्षक ह्यांना फारसें जड नसतें. एखादा मुलगा जात्याच बुद्धिमंद असतो, तर एखाद्या मुलाला लाभलेल्या बुद्धीचा उपयोग करण्याची शक्ति नसते. एखाद्या मुलाच्या वागणुकींत निर्माण झालेली विकृति असते, तर एखादा मुलगा मानसिक दृष्ट्या दुर्बल असतो.

ह्या मुलांचा प्रश्न समजावून घेण्यापूर्वी अगर त्यांच्या उपचाराबाबत चर्चा करण्यापूर्वी त्यांचें वर्गीकरण करणें आवश्यक आहे. मनोविकृतींचें वर्गीकरण मुख्यतः तीन तऱ्हेनें करतां येतें. ( १ ) बुद्धीमध्यें व स्वभावामध्यें असणारी विकृति. ( २ ) जन्मजात असलेले दोष व मागून निर्माण होणारे दोष. ( ३ ) सामान्य स्वरूपाचे मनोदोष व मनाच्या विशिष्ट भागापुरते मर्यादित असणारे दोष. हे फरक बुद्धि व मन ह्यांच्या वेगवेगळ्या कार्यक्षेत्रावर

आधारलेले आहेत. बुद्धि म्हणजे काय व मन कशाला म्हणावें ह्याची शास्त्रीय परिभाषा न पाहतां इतकेंच ढोबळपणानें लक्षांत घ्यावें कीं "ज्या क्रियेमध्यें जाणणें, समजणें व त्यावर अवलंबून असणाऱ्या क्रिया करणें, समजावणें हे घटक येतात, त्या सर्व गोष्टी बुद्धीच्या कार्यक्षेत्रांत येतात व भावना, इच्छा, वासना, आकांक्षा वगैरे मनाच्या कार्यक्षेत्रांत येतात" परंतु हा फरक लक्षांत न घेतल्यानें पुष्कळदां ज्यांच्या वागणुकीमध्यें कांहीं दोष आहे त्या सर्वच मुलांना मनोदुर्बल समजलें जातें. बुद्धीमध्यें असणारा दोष बहुधा मुलाची बौद्धिक प्रगति उशीरां होणें वा अजिबात थांबणें अशा तऱ्हेच्या लक्षणांवरून ओळखतां येते. सुरवातीला सांगितल्याप्रमाणें ज्यांच्या लक्षांतच येत नाहीं तीं मुलें बहुधा जन्मतः मागासलेलीं असतात, तर कांहीं मुलें परिस्थिति, मनोरचना, विषयाची नावड, शिक्षकाची अपात्रतता वगैरे अनेक कारणांनीं मागासलेलीं वाटतात. कांहीं मुलें सामान्यपणें कोणत्याहि क्षेत्रांत मागासलेलीं वाटतात तर कांहीं मुलें अवयवांच्यावर ताबा असणें, वास, चव, स्पर्श वगैरे इंद्रियांच्या कामामध्यें, अगर बोलणें, आठवण अशा एखाद्याच क्षेत्रांत मागासलेलीं असतात.

वस्तुतः सामान्य माणूस, बुद्धीनें असामान्य माणूस व बुद्धि मंद असणारा माणूस यांमध्यें केवळ तुलनात्मक फरक आहे. ज्या गृहस्थाला सामान्यपणें लागणारें व्यवहारज्ञान आहे, निर्दोष व्यक्तिमत्त्व व जुळवून घेणारा स्वभाव आहे, त्यांना आपण सामान्य माणसें समजतों. ज्या गृहस्थामध्यें हे गुण प्रकर्षानें असतात त्यांना असामान्य म्हणतों व ज्यांच्यामध्यें जाणवेल इतक्या प्रकर्षानें नसतात त्यांना बुद्धिमंद किंवा मागासलेले म्हणतों. खालील आलेखा-वरून समाजांतील माणसांची सामान्यतः विभागणी कशी असते हें कळेल.

| बुद्धिमंद, मागासलेले, वेडे | सीमेवरील लोक | सामान्य माणसें | सीमेवरील लोक | असामान्य बुद्धीचे |
|---|---|---|---|---|
| १० % | २० % | ४० % | २० % | १० % |

असामान्य बुद्धीचीं माणसें ज्या संख्येनें अगदीं कमी असतात त्याचप्रमाणें ज्यांना अगदीं ठार वेडे म्हणतां येईल अशींहि माणसें संख्येनें कमी असतात.

बुद्धिहीन, बुद्धिमंद किंवा मागासलेल्या लोकांना बहुधा परिमित किंवा थोडीच बौद्धिक शक्ति असते, त्यांच्या भावनांना स्थिरता नसते, व्यक्तिमत्त्व अर्धवट वा मोडकळलेलें वाटतें आणि वर्तनामध्यें दोष असतात. हीं सर्व माणसें आपलें आयुष्य रडत कढत व इतरांवर अवलंबून राहून काढतात. अशा लोकांची संख्या समाजांत शेंकडा १०% पेक्षां जास्त नसते. त्या अर्धवट किंवा वेडसर लोकांमध्यें मुख्यतः खालील प्रकार दिसतात. "(१) कांहीं माणसें अवघड प्रसंग आला किंवा संकट आलें म्हणजे इतकीं घाबरतात कीं जणूं कांहीं त्यांच्या मनाचे शतशः तुकडे होतात, तीं बावचळतात व पुढें कित्येक दिवस त्या विकृतीचीं कांहीं शारीरिक व मानसिक लक्षणें दिसत राहतात." त्यांपैकीं कांहीं प्रमुख लक्षणें म्हणजे काळजी, अस्वस्थपणा, स्मृतिभ्रंश, एकाग्रता न होणें, खोटी भीति, भ्रम वगैरे. याशिवाय कांहीं शारीरिक लक्षणेंहि दिसतात. परंतु हीं माणसें समजुतीनें चांगलीं असतात. बऱ्यावाईटांतला फरक त्यांना कळतो आणि स्वतःच्या वागणुकीला जबाबदार असतात. त्यांचें वागणें पुष्कळदां कटकटीचें वाटलें तरी त्रासदायक किंवा हिंसक नसतें. ह्या मनोदोषाला 'सायकोन्यूरॉसिस' म्हणतात. क्वचित् प्रसंगीं भावनांचा ताण असह्य झाला म्हणजे सामान्य माणसांच्यामध्येंहि असलीं लक्षणें दिसतात. पण तीं तात्पुरतीं असतात. अपयश आलें तर सर्वसामान्य माणसाला काळजी, निराशा अगर न्यूनगंड वाटेल पण तो परिणाम कांहीं काळच टिकेल. ह्याच्या उलट ह्या मनोदोषानें व्यथित झालेल्या माणसांवर हे परिणाम फार काळ व कांहीं प्रमाणांत जन्मभरहि राहतात. उदाहरणार्थ, टायफॉईडच्या आजारानंतर सौ. 'क' यांना जंतूंची फार भीति वाटूं लागली. संसर्गजन्य रोग होतील म्हणून खाण्यापिण्याचे सर्व पदार्थ त्या उकळून घेऊं लागल्या. रोजचें टपालांत आलेलें पत्र सुद्धां त्या घेईनात. कारण न जाणो त्या पत्राला किती लोकांचा हात लागला असेल व किती रोगजंतु त्यांतून येत असतील. शेवटीं शेवटीं तर त्या आपल्या पतिराजांना आग्रह करूं लागल्या कीं बादलीभर पाण्यांत डीटॉल घालून आंघोळ करा व मगच घरांत या.

(२) दुसऱ्या प्रकारच्या मनोदोषाला 'सायकोसीस' असें म्हणतात. या दोषांमुळें माणसाचें व्यक्तिमत्त्व जवळ जवळ नष्ट होतें व त्याची इतरांशीं होणारी वागणूक आणि संबंध तर्करहित बनतात. या लोकांच्या वागण्याला

कोणतेंहि तर्कशास्त्र किंवा कोणतीहि कसोटी लावतां येत नाहीं, किंवा या लोकांचें वागणें असें कां होत नाहीं ह्याची कल्पनाहि सामान्य माणसाला येत नाहीं. ह्या लोकांना एखाद्या हॉस्पिटलमध्यें अगर एखाद्या संस्थेमध्यें ठेवणें आवश्यक असतें. ह्याचें कारण त्यांना स्वतःची काळजी घेतां येत नाहीं. ते स्वतःच्या वागण्याबद्दल जबाबदार नसतात अगर ते समाजाला केव्हां उपद्रव करतील याचा कांहींहि अंदाज नसतो. ह्या लोकांच्या लहरी व तर्कशून्य वागण्याला कसल्याहि व्यवहाराचें, व सामाजिक मान्यतेचें बंधन नसतें. इच्छा हीच त्यांच्या विचारांची व आचारांची जननी असते. ह्या लोकांनीं इच्छा करावयाचा अवकाश कीं त्यांना त्यांच्या कल्पनासाम्राज्यांत ती गोष्ट मिळते. आपण कोट्यधीश आहोंत किंवा एखाद्या स्वरूपसुंदर नटीचे प्रियकर आहोंत, या कल्पना अशा रोग्यांना खऱ्या वाटत असतात. एखाद्याला वाटलें कीं आपण मरावें कीं त्याच्या कल्पनेप्रमाणें तो लगेच मरतोहि. तो खातपीत, बोलत चालत असतो, पण त्याच्या कल्पनेप्रमाणें तो भास असून खराखुरा मेलेलाच असतो. खोटे भास या रोग्यांना सत्यसृष्टींत वास्तव वाटत असतात. चांगल्या बातमीला ते लोक रडतील, तर एखाद्या वेळेला एखादी वाईट बातमी ऐकून हसतील. कारण तर्कशास्त्रांचें आणि ह्यांचें जन्माचें वाकडें असतें. हे लोक स्वतःच्या स्वप्नसाम्राजांत वावरत असतात. सामान्य लोकांना आपल्याला स्वप्नांत दिसलेल्या गोष्टी खोट्या आहेत हें कळतें. जागे झाल्यानंतर स्वप्नाचें जग व आपलें खरें जग यांतील मर्यादा त्यांना दिसत असते; परंतु ह्या रोग्यांना हा फरक कळत नाहीं. त्यामुळें सर्व तऱ्हेच्या गोष्टी ह्यांना खऱ्या वाटतात.उदाहरणार्थ एका गृहस्थाला आपण ईश्वर व कोट्यधीश आहोंत असें वाटत असतें व त्याप्रमाणें येणाऱ्या जाणाऱ्या कित्येक लोकांना तो कित्येक रुपयांचे चेक देत असतो. एका कुरूप बाईला लोक आपल्या सारखे मागें लागले आहेत असा एक सारखा भास होत असे व भिंतींतून, कपाटांतून सगळीकडून लोक आपल्यामागें धांवत आहेत असे वाटे.

( ३ ) मनोदुर्बलता हा एक सामान्य प्रकार असून त्यामध्यें ज्या मुलांना सामान्य शिक्षणक्रमांतून कांहींहि फायदा होणार नाहीं अशीं मुलें, व ज्यांना स्वतःचा सांभाळ नीट करतां येत नाहीं व स्वतःची जबाबदारी कळत नाहीं अशीं माणसें, अशांचा समावेश होतो.या लोकांना आपण काय करतों आहोंत

व त्याचे परिणाम काय होतील याची जाणीव नसते ह्यामुळें तीं मुलें बहुधा लहानमोठ्या चुका व बारीकसारीक गुन्हे करतांना दिसतात. या मुलांना हॉस्पिटलमध्यें ठेवणें आवश्यक आहे.कारण तीं मुलें केव्हां स्वतःचा नाश करून घेतील तें कळणारच नाहीं. (४) समाजविरोधी व्यक्तिः–ह्यामध्यें नेहमीं गुन्हे करणारे व 'सायकोपॅथिक' लोक यांचा समावेश होतो.ह्या गटामधल्या लोकांना सामाजिक बंधनें नको असतात. हीं माणसें भावनावश, स्वार्थी असतात व आपली इच्छा तावडतोब पुरी व्हावी असें त्यांना वाटत असतें. नैतिक व सामाजिक बंधनें यांना नको असल्यामुळें भोंवतालच्या वातावरणाशीं ह्यांचा कायम विरोध असतो. यांना बऱ्यावाईटांतला फरक कळतो, परंतु तो वळत मात्र नाहीं. परंतु ह्या व्यक्तीच्या स्वभावाबाबत अधिक संशोधन घेण्याची जरूरी आहे. ( ॲबनॉर्मल सायकॉलॉजी–डॉ. जेम्स )

कांहीं शतकांपूर्वी ह्या मनोदुर्बल व्यक्तीच्या उपचाराची सर्व व्यवस्था धर्मगुरु व धर्ममंदिरें ह्यांच्याकडे होती. आपल्या देशांत अजूनहि मांत्रिक पंचाक्षरी, जोशी हेच ह्या विषयांतले तज्ज्ञ समजले जातात. एखाद्या गृहस्थाच्या मनांत बिघाड झाल्यास त्याला कोणीतरी झपाटलेलें आहे असें समजून त्याला खरपूस मार देण्यांत येत असे. ह्यायोगें त्याच्या अंगांतील समंध शांत होऊन ' झाडाला ' सोडून देई असें म्हणतात. जारण, मारण, उच्चाटण ह्याचे अनेक प्रकार आपल्या देशांत अजून अस्तित्वांत आहेत. गुलाल लावलेलें लिंबू चिरून टाकणें, उंबऱ्यावर व दारावर बिब्ब्याच्या बाहुल्या काढणें, मंत्र घातलेले उडीद शेजारच्या घरावर टाकणें, मृत सुवासिनीच्या मंगलसूत्राच्या मण्यांनीं जादू करणें, वगैरे अनेक थोतांडें अजूनहि चालू आहेत.कांहीं ठिकाणीं तर ह्या देवऋषी लोकांचें राज्य खेड्यावर चाललेलें असतें. आजहि एखाद्या ' सायकोटिक ' माणसाला होणारे भास हे वास्तव आहेत असें मानलें जाऊन त्याची पूजा केली जाते. कांहीं वेड्यांना दूरदृष्टि असते म्हणतात तें याचमुळें. पाश्चात्य देशांतहि ही मारण्याठोकण्याची चाल कित्येक शतकें चालू होती. मनोव्यथित माणसाला दगडांनीं मारणें, रानांत सोडणें, जन्मभर कैदखान्यांत हाल करीत ठेवणें वगैरे प्रकार चालू असत. परंतु अलीकडे हा दृष्टिकोन बदलत चाललेला आहे. मनोव्यथा असणें हा माणसाचा अपराध नव्हे हें दिवसेंदिवस लोकांना पटत चाललें आहे. ज्याप्रमाणें शरीराचे

रोग असतात त्याचप्रमाणें मनाचेहि रोग असतात. एखाद्या माणसाला 'टायफॉईड' झाला म्हणून तो कांहीं हेटाळणीचा विषय होत नाहीं. त्याचप्रमाणें एखाद्या मनुष्याला तात्पुरता मनोदोष उत्पन्न झाला म्हणजे कांहीं लज्जास्पद झालें असें नाहीं. कांहीं माणसें जन्मतः आंधळीं किंवा लुळीं असतात. त्याप्रमाणें कांहीं माणसें जन्मतः मनोदोषयुक्त असतात. त्यांना संरक्षण देणें त्यांची काळजी घेणें व कांहीं बाबतींत त्यांना समाजापासून दूर ठेवून सामाजिक स्वास्थ्य कायम ठेवणें हें आपलें कर्तव्य आहे. त्यांच्या उपचाराची आपण सोय करायला हवी. त्यांची अवहेलना आणि हेटाळणी करून त्यांची सुधारणा होत नाहीं. उत्तम उपाय म्हणजे मानसिक आरोग्याची जास्तींत जास्त काळजी घेणें व जन्मजात येणारी मनोदुर्बलता टाळणें हा होय.

ह्या मनोव्यथांच्या उपचाराकरितां कांहीं शास्त्रज्ञांची फार आवश्यकता आहे. मानसशास्त्र हे मनाचे व्यापार व माणसांच्या स्वभावाचा व वागणुकीचा अभ्यास करतें. कांहीं लोक केवळ मानसशास्त्राच्या तत्त्वज्ञानांत व विद्यालयीन भागामध्यें गुंतलेले असतात, तर कांहीं लोक मानसशास्त्राच्या प्रयोगात्मक व व्यवहारात्मक भागामध्यें गुंतलेले असतात. मानसशास्त्र हें सर्वसाधारण निरोगी मनाच्या अभ्यासाकडे लक्ष देतें. पण 'विकृतांचे' ( Abnormal ) मानसशास्त्र रोगी मनाकडे लक्ष पुरवतें. मानसशास्त्राच्या व्यवहारात्मक पद्धतीचा अभ्यास करणाऱ्या शाखेला उपचारात्मक किंवा क्लिनिकल ( Clinical ) मानसशास्त्र म्हणतात. ह्या शाखेशीं समांतर असणाऱ्या वैद्यकीय शास्त्रांतील तत्सम शाखेला मनोव्यथा शास्त्र असें म्हणतात. तीव्र स्वरूपाच्या मनोव्यथा ज्यामध्यें बहुधा शारीरिक दोष निर्माण होतात ( अपवाद सोडून ) व ज्यामध्यें औषधें, शस्त्रक्रिया किंवा रुग्णालयीन उपचार वगैरे वैद्यकीय भाग येतो तें खरें मनोव्यथाशास्त्राचें क्षेत्र होय. ज्या शाखेंत मेंदू, मज्जा व 'नर्व्हस सिस्टिम' यांचा विशेष अभ्यास केला जातो त्याला न्यूरालॉजी असें म्हणतात. मनोविश्लेषण हा मनोव्यथाशास्त्राचाच एक भाग आहे व त्यायोगें मनोव्यथेची चिकित्सा केली जाते व उपचार केला जातो. एखाद्या मनोदोषानें आजारी असणाऱ्या व्यक्तीला वर उल्लेखिलेल्या तज्ज्ञांपैकीं लोक उपचार करूं शकतील. पण ती व्यक्ति समाजांत पुन्हा कितपत व कशी मिसळते ह्यावर त्या व्यक्तीचें भवितव्य अवलंबून असतें व हें काम करणें

डॉक्टरांना कांहीं शक्य नसतें, तेव्हां ह्याकरितां मनोव्यथाशास्त्रप्रवीण समाज-सेवकांची गरज असते. हे कार्यकर्ते समाज व मनोव्यथापीडीत व्यक्ति ह्यांच्यामध्यें चांगले संबंध निर्माण करण्याचा प्रयत्न करतात. शिवाय मनोदोषाच्या विश्लेषणाकरितां त्या रोग्याची सामाजिक पार्श्वभूमि, त्याचे विचार, स्वभाव वगैरे समजून घेणें आवश्यक असतें, व तें काम हे कार्यकर्ते उत्तम तऱ्हेनें करूं शकतात.

समाजशास्त्र, दंडशास्त्र, गुन्हाशास्त्र व कायदा ह्यांचा मनोव्यथेच्या प्रश्नांशीं फार जवळचा संबंध आहे. कारण आज समाजांत वावरणाऱ्या निरनिराळ्या व्यक्तींचें वर्गीकरण कांहीं करणें शक्य नाहीं व मानसिक व बौद्धिक शक्ति तपासण्याचें अचल असें प्रमाण कांहीं अजून शोधण्यांत आलेलें नाहीं. एका संस्कृतीप्रमाणें कालमानानें व देशपरिस्थितीमध्यें जी वागणूक सामान्य व निरोगी समजली जाते ती दुसऱ्या ठिकाणीं 'विलक्षण बेकायदेशीर व असामान्य' मानली जाते. एखाद्याला ठार मारणारा खुनी व अनेकांना मारणारा सैनिक यांना आपण वेगळे समजत नाहीं का? अर्थात् दोन कृतींमागील हेतूमध्यें फरक आहे. पण हा हेतु चांगला व हा वाईट हें तरी आपण कसें व कां ठरवलें? आज शहरांत ज्याला असा भास होतो कीं आपण परमेश्वराशीं संभाषण करतों, त्याला आपण मनो-व्यथापीडितांच्या रुग्णालयांत पाठवतों, पण त्यालाच एखाद्या मागासलेल्या जागीं ठेवला तर कदाचित् लोक त्याला ईश्वरी अवतार समजून त्याची पूजाअर्चा करूं लागतील. परंतु त्या ठिकाणीं त्याला रोगी ठरवलें नाहीं म्हणून त्याच्यांतला रोग थोडाच कमी होणार आहे? हॉस्पिटलमध्यें ज्या प्रमाणांत तो स्वतःची काळजी घ्यायला असमर्थ आहे, तितक्याच प्रमाणांत तो मागासलेल्या भागांतहि असमर्थ असेल. फरक आहे तो रोगांत नव्हे तर सामाजिक संबंधांत. आज वेडा कोण व शहाणा कोण हें डॉक्टर किंवा तज्ज्ञांचें मंडळ ठरवीत नाहीं, तर कायदा ठरवितो. आपल्याकडे कायद्याचा सल्ला देणाऱ्या संस्थांच्याकडे ज्या अनेक चौकशा येतात त्यांपैकीं कित्येक मनोदोषानें पीडित असलेल्या लोकां-कडून येतात. कांहीं माणसें मनोदोषामुळें विकृत झालेलीं असतात व तीं विशिष्ट तऱ्हेचा गुन्हा पुन्हा पुन्हा करीत असतात. कारण गुन्हा व त्याचे परिणाम ह्याचें संपूर्ण आकलन त्यांना झालेलें नसतें. अशा तऱ्हेच्या गुन्हे-

गारांना वेगळे उपचार केले पाहिजेत. त्यांना केवळ तुरुंगांत ठेवून भागणार नाहीं.

ज्या वेळीं मुलांच्या हातून मनोविकृतीमुळें एका विशिष्ट तऱ्हेचे गुन्हे वारंवार घडत असतात त्या वेळेस मुलांच्या मानसिक आरोग्याचा विचार करणें अपरिहार्य होऊन बसतें. मानसिक आरोग्याचें शास्त्र हें मानसिक आरोग्य कसें असावें हें सांगणारें शास्त्र आहे. मानसिक आरोग्य म्हणजे काय ? ह्या प्रश्नावर उत्तर देणें, किंवा मानसिक आरोग्याची व्याख्या करणें हें मानसिक रोगावर अवलंबून राहणार नाहीं. कांहीं माणसें मानसिक आरोग्याची व्याख्या निष्काळजीपणा अशी करतात. परंतु ही व्याख्या अकरणात्मक आहे. मानसिक आरोग्याची व्याख्या व्यक्तिमत्त्वांचें सुसंगत व संपूर्ण कार्य चालणें म्हणजेच मानसिक आरोग्य असणें अशी करतां येईल. उदाहरणार्थ शारीरिक आरोग्याचा विचार करतांना आपण अशी व्याख्या करतों कीं माणसाचे सर्व अवयव संपूर्णपणें व एकमेकांशीं सहकार्यानें काम करीत असणें म्हणजे शारीरिक आरोग्य असणें, त्याचप्रमाणें मानसिक आरोग्याचें आहे. मूल जन्माला येतांना कांहीं वृत्ति आपल्या बरोबर घेऊन येतें व कांहीं प्रवृत्ति तें ह्या जगामध्यें शिकत असतें. ह्या सर्व वृत्तींना व प्रवृत्तींना संपूर्ण वाव मिळाला नाहीं अगर ह्या सर्व मनोवृत्तींच्या मागें एकच हेतु नसेल तर व्यक्तिमत्त्व विकृत होईल. या सर्वांचा विचार करतांना व माणसांच्या मनोवृत्तींचें गतिशील स्वरूप लक्षांत घेतांना असें म्हणावेंसें वाटतें कीं माणसाच्या जन्मजात व संपादित प्रवृत्तींना संपूर्ण वाव देणें, त्याच्या व्यवहारामध्यें सहकार्य असणें व त्या एकाच हेतूनें व्यक्तिमत्त्वाच्या विकासाकरितां संघटित करणें म्हणजे मानसिक आरोग्य. 'इंडियन कॉन्सिल फॉर मेन्टल हायजिन' या संस्थेनें नेमलेल्या, उन्मार्गी मुलांच्या प्रश्नांचा विचार करणाऱ्या उपसमितीनें दिलेल्या वृत्तान्तांत असें म्हटलें आहे कीं 'उन्मार्गीपणाचीं कारणें प्रत्येक मुलामागें वेगवेगळीं असलीं तरी त्यांतील महत्त्वाच्या कारणांत मनोव्यथेचा भाग येतो.जी उघड उघड मनोविकृति आहे ती, म्हणजे वेडेपणा,विकृतव्यक्तिमत्त्व, बौद्धिक मागासलेलेपणा,अगर मानसिक दुर्बलता, याशिवाय अनेक मानसिक कारणें मुलाला उन्मार्गीपणाला प्रवृत्त करतात. मुलाची वाढ अयोग्य रीतीनें झाल्यानें मुलाच्या भावनात्मक गरजा अगर त्याची उसळत असणारी कार्यप्रवृत्ति ह्यांना योग्य वाव मिळत नाहीं.

मुलाचीं वडील भांवडें, आईबाप, शिक्षक वगैरे जवळच्या माणसांचा दृष्टिकोन चुकीचा असेल अगर आईबापांच्या वागण्यांत विसंगति असेल किंवा मुलाच्या विभूति-पूजेच्या प्रवृत्तीला योग्य असे पालक नसतील तर मुलें उन्मार्गी होतात. याशिवाय आपण एकटे व घरांत नकोसे आहोंत अशी भावना, न्यूनगंड, मनांतील लैंगिक द्वंद्व कांहींतरी विशेष करण्याची धाडसी प्रवृत्ति, घरच्या वातावरणाला कंटाळून पळण्याची प्रवृत्ति, शाळेंत न जुळणें अशा कारणांनींहि मुलें विचलित होतात.' प्रत्येक मुलाच्या प्रेम-संरक्षण, स्वास्थ्य ह्या मूलभूत गरजा असतात आणि ह्या जर भागल्या नाहींत तर मुलांच्या मनामध्यें विकृति उत्पन्न होते.

ह्या मनोविकृत किंवा मनोदुर्बल मुलांच्या मध्यें सर्वसाधारणपणें खालील तऱ्हेच्या विकृति असूं शकतात. ( १ ) स्वभावः-त्रासदायक, ज्यापासून स्वतःला धोका होईल असा किंवा ज्यापासून लोकांना धोका आहे असा. ( २ ) भावनाः-मंदपणा, त्रासिकपणा, विसंगति, संशयीपणा, आत्मघातक प्रवृत्ति, नाशक प्रवृत्ति, उपेक्षावृत्ति, अनैतिकपणा. ( ३ ) विचारः-गोंधळ, अतिरेकीपणा, स्वप्न, भास, विचित्र कल्पनांचा मनावर परिणाम. ( ४ ) भाषाः-मुकें, विसंगत बोलणें, व तत्सम उच्चार-दोष. ( ५ ) स्मृतिः-विसंगति, विस्मृति, स्मृतीचा भास. ( ६ ) इंद्रियः-इंद्रियांची अनैसर्गिक जलद हालचाल, एकाच तऱ्हेच्या हालचाली सौम्यपणें करीत राहणें, मंद हालचाल. या मुलांच्या मापनाकरितां बुद्धिनिर्देशांकाचा ( Intelligence quotient ) चांगला उपयोग होतो. बुद्धीची समाधानकारक व्याख्या अजून करतां आली नसली तरी सर्वसाधारणपणें बुद्धीचे व्यवहार म्हणजे उपयोगी माहिती घेण्याची, कसब शिकण्याची शक्ति, जीवनांतल्या परिस्थितीला व नव्या नव्या येणाऱ्या प्रश्नांना तोंड देण्याची धमक, जुन्या अनुभवांतून शिकण्याची शक्ति, नवीन विचार करण्याची शक्ति, बरेंवाईट ठरविण्याची टीकाशक्ति, चुका टाळण्याची दूरदृष्टि व अडचणींतून पार होण्याची हिंमत, वगैरे होत. जीं मनोदुर्बल मुलें आहेत तीं वरील सर्व व्यवहारांत मागासलेलीं दिसून येतात. त्यांची शिकण्याची शक्ति विशेषतः वैचारिक शक्ति, वाचणें, गणित करणें, वगैरे बाबतींत अतिशय मर्यादित असते. त्यांच्यांतील अत्यंत मागासलेल्या मुलांना शिक्षण घेणें अशक्य असतें. त्यांच्यांतील उत्तम मुलांना

खास शिक्षण दिलें तरच ती शिकण्याची शक्यता असते. ह्या मुलांना शिकविणें ही एक त्रासाची व कंटाळवाणी गोष्ट आहे. त्यांचें शिक्षण हें समजशक्तीपेक्षां स्मृतीवर पुष्कळदां अवलंबून असतें. मनोदुर्बल मुलांतील केवळ वरच्या योग्यतेच्या मुलांना लिहिणें, वाचणें व सोपीं गणितें करणें एवढें येऊं शकतें. आणि शिवाय ही कला त्यांनीं कांहीं काळ उपयोगांत आणली नाहीं तर लौकरच तीं मुलें लिहिणें, वाचणें विसरून जातात. याचा अर्थ असा नव्हे कीं तीं बुद्धिहीन असतात. कारण त्यांच्यांतहि बुद्धीचा अंश थोड्याफार प्रमाणांत असतो. बुद्धिनिर्देशांकाच्या भाषेंत म्हणायचें तर त्यांचं—

| बुद्धिनिर्देशांक | बौद्धिक गट |
|---|---|
| १३० व अधिक | अत्युत्तम |
| ११० ते १३० | उत्तम |
| ९० ते ११० | हुशार |
| ८० ते ९० | मंदबुद्धि |
| ७० ते ८० | सीमेवरील |
| ६० ते ७० | मनोदोषयुक्त |
| ४८ ते ७० | अतिमंद ( Morone ) |
| २८ ते ४८ | खुळें |
| २८ खालीं | वेडें |

अशा तऱ्हेचें वर्गीकरण करतां येईल. सर्व तऱ्हेचीं मनोदुर्बल मुलें आपल्या समाजांत जागोजाग सांपडतात. परंतु पुष्कळदां त्यांची मनोदुर्बलता फार उशीरां लक्षांत येते किंवा लक्षांत आली तरी पालक कबूल करीत नाहींत. आईबाप पुष्कळदां असें म्हणतात कीं आमचें मूल एरव्हीं फार चांगलें आहे. परंतु त्याच्या लक्षांतच राहात नाहीं किंवा तें वागण्यांत थोडासा गोंधळ करतें. असल्या कल्पनेच्या पंखाखालीं तें आपल्या मुलाचा मागासलेपणा झाकूं पाहतात. या मुलांना सर्वसामान्य शाळेंत घातलें जातें. तेथला अभ्यासक्रम त्यांना झेपत नाहीं. त्यामुळें त्यांची तेथें हेटाळणी व थट्टा होते. त्यांच्या मनांत न्यूनगंड निर्माण होतो व तीं शाळेंतून पळून जाऊं लागतात. पालकांनीं ह्या मुलांना नेहमींच्या शाळेंत घालण्याचा हट्ट सोडला पाहिजे. सर्वसामान्यपणें पाहिलें तर मुलांच्या वाढीला अनुसरून चालणें,

बोलणें, मलमूत्रविसर्जन वगैरे गोष्टी मुलें आपोआप शिकतात. सामान्यतः १।। वर्षाचें मूल चालायला सुरुवात करते. १।। ते २ वर्षापर्यंत मलमूत्र-विसर्जनावर त्यांचा योग्य ताबा निर्माण होतो. आणि २।। ते ३ वर्षापर्यंत तीं बोलायला सुरुवात करतात. परंतु मनोदुर्बल मुलामध्यें ही शक्ति येण्याला बरींच वर्षें लागतात. हीं मुलें सामान्यतः आपल्यापेक्षां लहान मुलांत खेळणें अधिक पसंत करतात. तीं रागावल्यानंतर मोडतोड करतात. पुष्कळशा मागासलेल्या मुलांना साप, अंधार, ढगांचा गडगडाट, सांवल्या, बागुलबुवा, भिकारी वगैरेंच्यासंबंधीं कारण नसतांना तीव्र भीति वाटत असते. शिवाय ह्या मुलांच्यामध्यें अंगठा चोखणें, नखें खाणें, हस्तमैथुन वगैरे वागणुकींतील दोषहि येतात. मुंबईच्या चेंबुर येथील मागासलेल्या मुलांच्या शाळेचा अभ्यास करून श्रीयुत दामले यांनीं असें निदर्शनास आणलें आहे कीं शेंकडा ८३ मुलांना वर दर्शविलेली भीति व शेंकडा ८० मुलांना वर दर्शविलेल्या वाईट खोड्या होत्या. ह्या मुलांना पालकांच्याकडून मिळणारी वागणूक पुष्कळदां चमत्कारिक असते. त्यांच्यावर मंत्रतंत्र करून किंवा त्यांना मारून हीं मुलें सुधारणें शक्य नसतें, परंतु त्या मुलांना योग्य उपचार फार क्वचित् केला जातो.

मुंबई राज्यामध्यें अशा मुलांच्याकरितां चेंबूर येथें एक शाळा असून तशाच तऱ्हेचा दुसरा एक प्रयत्न सौ. वकील यांनीं केलेला आहे. वैयक्तिक लक्ष देणें व मागासलेल्या विद्यार्थ्यांना विशेष पद्धतीनें शिकविणें ही या शाळेची पद्धति आहे. शाळेंतील मुलांचें बौद्धिक वयाप्रमाणें वर्गीकरण करण्यांत येतें. ह्याशिवाय शारीरिक शिक्षण, नृत्य, संगीत, कलाकौशल्य वगैरेंचाहि उपयोग केला जातो. या शाळांतील शिक्षणक्रमानंतर त्यांच्या भावना व मनोरचना यांमध्यें खूपच सुधारणा होते. परंतु ह्या मुलांना कुठेंतरी घरांत ठेवून किंवा शाळेंतच दत्तक घराची सोय करून ( Foster-Homes ) शिकविलें पाहिजे. तरच हा प्रश्न लवकर सुटेल.

ह्याशिवाय ह्या मुलांचा मनोदोष लवकर शोधण्यांत यावा म्हणून जागोजाग बालमार्गदर्शन-केंद्रें स्थापन व्हावयास पाहिजेत. अशीं केंद्रें आज खालील ठिकाणींच आहेत. १) जे. जे. हॉस्पिटल मुंबई, ( २ ) बालमार्ग-दर्शन केंद्र ( टाटा हॉस्पिटल मुंबई), ( ३ ) बालमार्ग-दर्शन केंद्र रिमांड-होम पुणें (४) बडोदा ह्या मार्गदर्शन केंद्रांत कोणत्याहिमुलामधील दोष घालवून त्याला पुन्हा समाजांत योग्य स्थान देण्याच्या दृष्टीनें उपचार केले जातात.

मूल केंद्रांत आल्यानंतर प्रथम त्याची संपूर्ण शारीरिक तपासणी करून त्याच्या मनोदोषाला एखादें शारीरिक कारण आहे कीं काय हें तपासलें जातें. मनोव्यथा शास्त्रज्ञ ह्या मुलाच्या व त्याच्या आईबापांच्या वेगवेगळ्या व पुन्हा पुन्हा मुलाखती घेऊन मनोदोषाचें कारण शोधण्याचा प्रयत्न करतात. ज्या मुलांना बोलतां येत नाहीं त्यांना चित्राच्या व खेळाच्या द्वारें तपासलें जातें व ज्या मुलांना बोलतां येतें त्यांनाहि खेळायला लावून त्यांचें निरीक्षण केलें जातें. वाळूंत खेळणें, चित्रें काढणें, नाटक करणें वगैरे खेळांतून मुलांचें मन पुष्कळदां व्यक्त होतें. मनोव्यथाशास्त्रज्ञ पालकांशीं मुलाखत करतांना त्यांचा स्वभाव कसा आहे, मुलावर त्यांचा कितपत परिणाम होतो, वगैरेंचा अभ्यास करतात. केंद्रांतील सामाजिक कार्यकर्ते मुलाचा पूर्व इतिहास शोधून काढतात व मुलाच्या मनोविकृतीचें मूळ कशांत आहे हें शोधायला मदत करतात. त्याचप्रमाणें मुलावर उपचार सुरू झाल्यावर तो उपचार यशस्वी करण्याच्या दृष्टीनें मुलाचे पालक, शिक्षक ह्यांना मदत करतात. बालमार्गदर्शन केंद्रांतील मुलांचें बौद्धिक मापन करून बुद्धिनिर्देशांक काढतात व मुलाचें बौद्धिक वय ठरवितात. वरील सर्व माहिती जमा केल्यानंतर त्या पार्श्वभूमीवर मुलावर कोणत्या तऱ्हेचे उपचार करावे, कोणत्या तऱ्हेचे विषय शिकवावे, त्याला कोणत्या शाळेंत पाठवावें वगैरे ठरविण्यांत येतें.

बाल–मार्गदर्शन केंद्राचा उपयोग मनोदोषाची चिकित्सा व उपचार असा द्विविध आहे. पुण्याच्या बाल–मार्गदर्शन केंद्रांकडे आलेल्या मुलांची पाहणी केली तर असें दिसतें कीं कांहीं मुलें ( १ ) त्रासलेलीं, ( २ ) व्यक्तिमत्त्वांत दोष असणारीं, ( ३ ) मानसिक कारणामुळें शारीरिक दोष निर्माण झालेलीं, ( ४ ) वाईट संवयी असणारीं, ( ५ ) वागणुकींत बिघाड असणारीं अशीं होतीं. बाल–मार्गदर्शनाची चळवळ अतिशय महत्त्वाची असून या चळवळीनें अजून म्हणावें तसें मूळ धरलेलें नाहीं. अर्थातच ह्याला अनेक कारणें आहेत व त्यांपैकीं महत्त्वाचें कारण म्हणजे ह्या विषयांतले तज्ज्ञ लोक आपणाकडे नाहींत. तरीहि शक्य तितक्या लवकर व शक्य तेथें अशीं बाल–मार्गदर्शन केंद्रें स्थापन करणें, मनोदुर्बल मुलांच्याकरितां अधिक शाळा उघडणें व मानसिक आरोग्याबाबत आईबापांचा दृष्टिकोन सुधारणें हीच आजची गरज आहे व जोंपर्यंत ह्या सोयी उपलब्ध करण्यांत आलेल्या नाहींत, तोंपर्यंत मनोदुर्बल मुलांचा अवघड व महत्त्वाचा प्रश्न सुटणें कठीण झालेलें आहे.

❀ ❀ ❀

: ४ :

# बालगुन्हेगारीची सामाजिक चौकट

कांहीं दिवसांपूर्वीं एका तेरा वर्षांच्या मुलीची हकीकत पोलिसांना कळविण्यांत आली व त्या मुलीला कोर्टापुढें आणण्यांत आलें. सदर मुलीवर दहा दिवसांत दोन खून केल्याचा गंभीर आरोप ठेवण्यांत आलेला होता. चौकशीनंतर असें कळलें कीं ही मुलगी लहान मुलांना फिरायला घेऊन जाई व तेथें त्यांच्या अंगावरचे दागिने काढून घेऊन त्यांना विहिरींत ढकलून देई. पहिल्या खेपेला हा अपघात म्हणून त्याची उपेक्षा झाली. लोकांना वाटलें कीं चुकून मूल विहिरींत पडलें असावें. दुसऱ्या खेपेला तिनें ऐन दुपारच्या वेळीं कोणी नाहीं असें बघून एक मूल उचललें व त्याच्या हातांतील सलकडीं काढून घेऊन त्या मुलाला विहिरींत टाकून दिलें. ह्या दुसऱ्या अपघातानंतर मात्र लोकांना या मुलीचा संशय येऊं लागला व तिसऱ्या खेपेला त्या मुलीला मूल उचलीत असतांनाच पकडण्यांत आलें. ही मुलगी मुलांच्या कोर्टापुढें आल्यानंतर तिच्या सर्व वागणुकीचें व गुन्ह्यांचें विश्लेषण करण्यांत आलें. चौकशीअंतीं असें कळलें कीं ह्या मुलीला सलकडी, बांगड्या, वगैरे दागिने घालण्याची अत्यंत हौस होती. ह्या मुलीचा बाप दारूच्या गुन्ह्याकरितां तुरुंगांत होता व आई वेडी होती. त्यामुळें ह्या मुलीला स्वतःचें घर नसल्यासारखेंच होतें. साऱ्या लोकांच्या हेटाळणीचा व तुच्छतेचा ती एक विषय बनली होती. कदाचित्

त्या मुलीमध्यें थोड्याफार प्रमाणांत मनोदोषहि असण्याचा संभव होता. ह्या मुलीनें आपली हौस एकदोन ओळखीच्या लोकांच्या जवळ प्रगट केली. पण त्यांनीं तिला झिडकारलें. पहिलें मूल फिरायला नेलें त्या वेळीं मुलाच्या बांगड्या तिनें काढून घेतल्या व लपवून ठेवल्या. मूल मारावें अशी वृत्ति तिच्यांत नव्हती. परंतु मूल बांगड्यांशिवाय घरीं गेल्यास आरडाओरड होईल म्हणून तिनें मूल व बांगड्या या दोन्हींचा प्रश्न एकदम मिटविण्याचें ठरविलें. दोन अपघातांनंतर तिच्या लक्षांत आलें कीं अशा रीतीनें मिळविलेल्या चोरीच्या बांगड्या वापरतांहि येत नाहींत. कारण त्याला चोरीचा डाग लागलेला असतो. बरें न वापराव्या तर त्याकरितां घेतलेल्या दोन मुलांचे बळी फुकट गेले असा अर्थ निघतो. या परस्पर विरुद्ध विचारांचें द्वंद्व तिच्या मनांत उत्पन्न झालें व ती हिंसक बनूं लागली व मनांतील द्वंद्वाचा परिणाम म्हणून कोणत्या ना कोणत्या मार्गानें या साऱ्या जगावर अत्याचार करावा, सूड घ्यावा अशा विचारामध्यें असतांना ती मुलगी कोर्टापुढें आली.

अशा तऱ्हेचीं अनेक मुलें व मुली प्रतिवर्षीं मुलांच्या कोर्टापुढें येत आहेत. विशेषतः औद्योगिक शहरांमधून बालगुन्हेगारीचा आंकडा वाढीला लागला आहे. गेल्या एका वर्षीं सुमारें बारा हजार गरजू व गुन्ह्यांत गुंतलेल्या मुलांचा विचार या कोर्टांतून करण्यांत आला. ह्यावरून हा प्रश्न किती महत्त्वाचा आहे याची कल्पना येईल. बालगुन्हेगारी किंवा उन्मार्गी मुलांचा प्रश्न हा कोसळलेल्या कुटुंबसंस्था व वाढतें यंत्रयुग ह्याबरोबर अधिकच बिकट होत चालला आहे. मुलांच्या मनामध्यें ह्या वृत्तीचें मूळ कोठून आणि कसें रुजलें जातें, ह्याचा विचार वेळच्या वेळींच व्हावयास पाहिजे. परंतु मुलाच्या मनाइतकेंच महत्त्वाचें व त्याच्या मनाची विकृत घडण घडविणारे असे कांहीं सामाजिक घटक असतात व त्यांचीहि दखल घेणें अगत्याचें ठरतें. मूल जन्माला येतांना आपल्याबरोबर कांहीं मूलभूत प्रवृत्ति घेऊन येते व कांहीं वृत्ति तें ह्या जगामध्यें संपादन करतें. संपादित वृत्ति, ( Traits ) जन्मजात प्रवृत्ति ( Instincts ) व मूल ज्या वातावरणांत वाढतें ती सामाजिक चौकट यामध्यें जर विरोध निर्माण झाला तर मुलांच्या वृत्ति उन्मार्गी होतात. अर्थातच मुलें ज्या सामाजिक चौकटीमध्यें वाढत असतात तेथील त्यांचे

आईबाप, भावंडें, घर, शिक्षक, सोबती वगैरे घटक त्या मुलांच्या वाढीला महत्त्वाचा हातभार लॉवीत असतात. ह्याशिवाय मुलें जीं गाणीं ऐकतात, चित्रपट पाहतात, गोष्टी अगर वर्तमानपत्रें वाचतात त्या सर्वांचा मुलांच्या मनोरचनेवर अप्रत्यक्ष परिणाम होत असतो. मुलांच्या विकृत अगर आरोग्य-पूर्ण वाढीला हे सर्व घटक थोड्याफार प्रमाणांत जबाबदार असतात. आपल्या संस्कृतीचे वारसदार म्हणून जे पुढें मिरवणार, आपल्या सुधारणांतील जास्तींत जास्त चांगलें लेणें आपण ज्यांना द्यावयाचें व उद्यांच्या जगाचे नेते व मानवजातीच्या भविष्याचे शिल्पकार म्हणून ज्यांचा गौरव करावयाचा त्या मुलांच्या वाढीबाबत जास्तींत जास्त लक्ष देणें हें वरील सर्व घटकांचे आद्य कर्तव्य आहे.

मुलांवर व त्यांच्या मनोरचनेवर ज्यांचा प्रत्यक्ष परिणाम होतो अशांतील सर्वांत महत्त्वाचा घटक म्हणजे त्यांचें घर व कुटुंब. जरी शास्त्रशुद्ध पुरावा आज दाखवितां येत नसला तरी असें मानण्यास जागा आहे कीं पाश्चात्य देशांतील बालगुन्हेगारीचें एक महत्त्वाचें कारण म्हणजे तेथील कोसळलेली कुटुंबव्यवस्था होय. एकत्र–कुटुंबपद्धतीमध्यें दोष अनेक असले तरी मुलांच्या वाढीला लागणारे अनेक गुण त्यांत आहेत. परंतु एकत्र-कुटुंबपद्धति शक्य नसेल तरी मुलांना निदान घरामध्यें ठेवणें, घरामध्यें वाढविणें घरांतील सुसंस्कार त्यांच्यावर करणें अतिशय जरूर आहे. अत्यंत उत्तम अशा छात्रा-लयांत किंवा पब्लिक स्कूलमध्यें वाढलेल्या मुलांच्यांत ह्या संस्काराचा अभाव तीव्रपणें दिसून येतो. तीं मुलें शिष्टाचार, सभ्यता, अदबशीर बोलणें, खेळ, अभ्यास ह्यांत प्रावीण्य मिळवितात. परंतु घरच्या सांस्कृतिक वातावरणाला मुकतात. म्हणून आज इंग्लंडमध्यें व इतरत्र शाळांना घराचें स्वरूप देण्याचा प्रयत्न केला जात आहे. एके काळीं चारपांचशें मुलांची शाळा चालविणें ही वैभवाची व सुधारणेची गोष्ट समजली जात असे. परंतु आज शाळेंतील मुलांची संख्या शक्य तितकी कमी करून जास्तींत जास्त वैयक्तिक लक्ष द्यावें अशा योजना मांडल्या जात आहेत. तेथें ' फॅमिली होम्स ' नांवाच्या संस्था वाढीला लागल्या आहेत. ह्या संस्थांत नवराबायको व त्यांनीं मानलेलीं वा सरकारनें ठेवलेलीं सात आठ मुलें एकत्र राहतात. आपल्या देशांतहि दिवसेंदिवस थोडीं मुलें घेणाऱ्या व जास्त लक्ष

देणाऱ्या शाळा काढण्याकडे व चालविण्याकडे प्रवृत्ति दिसून येत आहे. ह्या योगानें मुलाची अनैसर्गिक वाढ न होतां त्याचें परिवर्तन करतां येईल व त्यांना घरांतील सुसंस्कार देतां येतील अशी कल्पना आहे. मुलाच्या मनावर त्याचें घर, तो राहतो तेथील वस्ती, त्या वस्तीचें स्वरूप ह्या सर्वांचा जरी परिणाम होत असला,तरी प्रत्यक्ष परिणाम मुलाच्या आईबापांच्या वागणुकीचा होतो. मुंबई प्रांतांतील ह्या कार्यक्षेत्रांतील कार्यकर्त्यांचा नम्र अनुभव जमेला धरला तर असें म्हणावेसें वाटतें कीं मुलांच्या गुन्हेगारीला, उन्मार्गी वर्तनाला व ती बिघडण्याला पुष्कळ अंशीं त्यांचे आईबापच कारणीभूत असतात.

मूल व आईबाप यांचे संबंध प्रेमाचे व सलोख्याचे असावे लागतात. त्यांत कुठें द्वंद्व निर्माण झालें कीं मुलाच्या विकृतीला आरंभ होतो. इतकेंच नव्हे तर मुलाच्या मनावर आईबाप व भांवडें हीं सामूहिक परिणाम करीत असल्यामुळें त्याहि कुटुंबियांचे संबंध प्रेमाचे असावे लागतात. बालमानसशास्त्रासंबंधीं कांहीं लोकांनीं अशी कल्पना करून घेतली आहे कीं बालमानसशास्त्र म्हणजे मुलांचे लाड करण्याचें शास्त्र, किंवा फुलदाणींतील फुलाप्रमाणें शिक्षा न करतां मुलांना प्रेक्षणीय बनविण्याचें शास्त्र, परंतु ही समजूत सर्वस्वीं निराधार आहे.बालमानसशास्त्रामध्यें शिस्तीला अत्यंत महत्त्वाचें स्थान आहे. परंतु ती शिस्त कशी लावावी ह्यासंबंधीं कांहीं पालकांना न आवडणाऱ्या सूचना, त्यांत आहेत. मुलाला शिस्त लावण्यासंबंधीं कांहीं पालकांच्या व शिक्षकांच्या जुन्या कल्पना आहेत. मुलाचें गणित चुकलें, त्यानें हट्ट केला, तो घरीं उशीरां आला, तो नापास झाला, त्यानें चोरी केली यांसारखे अनेक प्रश्न मुलांच्या आयुष्यांत उद्भवतात. या प्रश्नांची सोडवणूक करण्याचें काम अतिशय कौशल्यानें व हळुवार हातानें करावयाचें असतें. परंतु वर उल्लेखिलेल्या लोकांच्या तत्त्वज्ञानाप्रमाणें मुलांच्या बहुविध प्रश्नांना एकच उत्तर असतें, आणि तें म्हणजे छडी. वस्तुतः केवळ शारीरिक शिक्षेनें जर मुलें अगर माणसें सुधारत असतीं तर कित्येक युगांपूर्वींच गुन्हेगारीचा अंत झाला असता. ह्याचा अर्थ असा नव्हे कीं शारीरिक शिक्षा ही कोणत्याहि प्रसंगीं उपयोगी पडणें शक्य नाहीं. सुचवावयाचें इतकेंच आहे कीं त्याचा वापर क्वचित् आणि कौशल्यानें व्हायला हवा. शिक्षेपेक्षां आपली चूक झाली हें मुलाला पटविणें हें अधिक महत्त्वाचें आहे. आपले वडील व आजोबा अहोरात्र धूम्रपान करीत असतांना आपण एखादें

थोडूक घेऊन ओढलें तर काय अपराध झाला ? नको असलेला पाव्हणा द्वाराशीं आला असतांना, बाबा घरांत असूनसुद्धां आई " बाबा घरांत नाहींत " असें सांगते. मग आपण एखादे वेळेस शाळेंत न जातां गेलों म्हणून सांगितलें तर काय चुकलें ? आपल्या सावत्र भावंडांना आपल्यावर अन्याय करून आपली सावत्र आई गुपचुप खाऊ देते, तर तो खाऊ आपण हिसकावून घेण्यास काय हरकत ? अशा तऱ्हेची विचारसरणी मुलांच्यामध्यें असते. "मुलांनीं केलेली चूक पाहतांना व त्याबद्दल शिक्षा करतांना मुलांची ही विचारसरणी लक्षांत घ्यायला हवी. थोडक्यांत म्हणजे मुलांनीं केलेल्या चुका सुधारण्याच्या असतील तर ती चूक करण्याच्या पाठीमागें मुलांच्या मनांत कोणता विचार आहे ह्याचा अभ्यास करायला हवा. " ( श्री. गो. ना. हर्षे : व्याख्यान, पुणें )

मुलांच्या मनोवृत्तींची घडण ही पुष्कळ अंशीं आईबाप व मुलें ह्यांच्या प्रेमाच्या संबंधावर अवलंबून असते. पुष्कळदां आईबापांच्या लहानसहान वागणुकीचा मुलांच्या मनावर गैर परिणाम होत असतो. मागें एकदां आमच्या एका शाळेमध्यें चित्रें काढायला सांगितलें असतांना एका मुलानें एक टिंब व दोन रेषा ह्यांच्या साहाय्यानें प्रेतयात्रेचें चित्र काढलें. चित्रकला शिक्षकाला हा प्रकार नवीन वाटल्यानें त्यानें तें चित्र व मुलगा शाळा-प्रमुखाकडे पाठविलें. चौकशी करितां, मुलानें असें सांगितलें कीं ही प्रेतयात्रा त्याच्या काकाची असून पुढें मडकें धरलेला मनुष्य म्हणजे तो मुलगाच होय. ह्या उदाहरणांत ज्यांनीं त्या मुलाचा प्रतिपाळ केला, त्या काकांच्या विषयीं इतका वैरभाव त्या मुलाच्यामध्यें कां निर्माण झाला ह्याचा अभ्यास होणें जरूर आहे. घरांतील आईबापाच्या भांडणानें विटलेली एक मुलगी आमच्या एका शाळेंत होती. तिला बाहुलाबाहुली खेळण्याकरितां दिली असतांनासुद्धां ती त्याचीं डोकीं एकमेकांवर आदळून भांडण लावीत असे. ह्या बारीक-सारीक गोष्टी त्या मुलीच्या मनातील विकृत मनोव्यापाराचें उत्तम निदर्शन करीत असलें तरी त्यावरून आईबाप व पालक ह्यांच्या वागणुकीवरहि प्रकाश पडतो. वाढत्या वयाच्या ह्या मुलांच्या मनामध्यें ज्या प्रवृत्ति असतात त्यांचा योग्य तो विकास होईल अशी काळजी घ्यावी लागते. उदाहरणार्थ बालमनाच्या विकासामध्यें जिज्ञासेला अतिशय महत्त्वाचें स्थान आहे. आईबापांना ही जिज्ञासापूर्ति सदासर्वदा करतां येईलच असें सांगतां येत नाहीं. परंतु निदानपक्षीं

त्या जिज्ञासेचें रोपटें उपेक्षेनें मरणार नाहीं एवढी तरी काळजी त्यांनीं घेतली पाहिजे. मुलांचीं मनें अतिशय संवेदनाक्षम असल्यामुळें त्यांच्या मनांत निर्माण झालेल्या जिज्ञासांना त्यांना ताबडतोब उत्तर हवें असतें. बाहेर विमानाचा आवाज ऐकल्यानंतर हें विमान कसें चालतें ह्याविषयीं उत्सुकता वाटून तीं आईबापांकडे येतात. त्याच क्षणीं या शंकेचें निरसन करणें शक्य नसलें तरी सुद्धां मुलाला बरें वाटेल अशा रीतीनें "पुन्हा सांगेन" किंवा अशा तऱ्हेचीं कांहीं उत्तरें देऊन जिज्ञासा जगविली पाहिजे. "भलत्या वेळेला कसल्या शंका विचारतोस, अक्कल नाहीं का?" अशा तऱ्हेचीं उत्तरें दिल्यानें जिज्ञासा मरते, किंवा ती जिज्ञासा पूर्ण करून घेण्याकरितां मुलें गैरमार्गाचा अवलंब करतात.

मुलांच्या वाढत्या वयाबरोबर घरामध्यें आपल्याला मानलें जावें, आपल्यालाहि एक स्वतंत्र व्यक्तिमत्त्व आहे, स्वतंत्र स्थान आहे, ह्याची जाणीव कुटुंबियांकडून मानली जावी अशी भावना असते. ह्या प्रवृत्ती-नुसार जर मुलाला वाटलें कीं घरामध्यें आपणाकडे पुरेसें लक्ष दिलें जात नाहीं, तर नाना उपाय करून तीं मुलें आपल्या कुटुंबियांचें लक्ष आपणाकडे ओढून घेतात. चांगल्या मुलासारखें वागून आई-बापांचें लक्ष आपणाकडे वेधलें जात नाहीं अशी जर शंका त्या मुलाला आली तर कांहींतरी वेडेवांकडें वागून किंवा दंगा करून तीं मुलें आईबापांचें मन आपल्याकडे वेधून घेण्याचा प्रयत्न करतात. मुलानें असा दंगा केला कीं साहजिकच तो एक बोलण्याचा विषय होतो. आईबाप त्या विषयाची चर्चा मुलाच्या देखत करतात, व आपण चर्चेचा विषय झालों आहोंत ह्यामध्येंच मुलाला एक प्रकारचें सुप्त समाधान लाभतें. अशा तऱ्हेच्या वृत्तीचा एक मुलगा कोर्टापुढें आलेला होता. रिमांड-होममध्यें आल्यानंतर त्याला आपणाकडे कोणी लक्ष देत नाहीं असें वाटलें. म्हणून त्यानें एके दिवशीं आपल्या अंगावरचे सर्व कपडे काढून टाकले. हें पाहतांच त्याच्या भोंवतीं सर्व मुलें व शिक्षक जमले व त्यांत त्याला मनस्वी समाधान वाटलें. अशा प्रवृत्तीच्या मुलांना नेहमीं आपण लोकांच्या कौतुकाचें केन्द्रस्थान असावें असें वाटतें. इंग्रजींत म्हण आहे त्याप्रमाणें त्यांना "बारशाला गेलों असतां आपण मूल असावें व प्रेतयात्रेला गेलों असतां आपण प्रेत असावें असें वाटतें

म्हणजे तरी आपले सर्व लोक कौतुक करतील." वर उल्लेखिलेल्या मुलानें असें चारपांच वेळां कपडे काढल्यानंतर त्याकडे लोक लक्ष देईनासे झाले. तेव्हां ह्या मुलानें एक नवीन उपाय शोधून काढला. तो खिडकीमध्यें उभा राहून म्हणे कीं मी उडी टाकून जीव देईन, किंवा विजेच्या प्लगजवळ उभा राहून म्हणे कीं मी आत्महत्या करीन. ह्या सर्व उद्योगांच्या मागें लोकांनीं आपल्याकडे सारखें लक्ष द्यावें ही त्या मुलाची भावना होती. अर्थातच ह्या मुलाला पुढें एका गटाचें नेतृत्व दिल्यानंतर त्याची हौस थोड्याफार प्रमाणांत तरी भागली.

मुलें ज्या वेळीं भाषा शिकत असतात, त्या वेळीं त्यांच्याशीं व त्यांच्या देखत आपण काय बोलावें ह्याचा विचार व्हायला हवा. एखादें नवें खेळणें मिळावें त्याचप्रमाणें एखादा नवा शब्द सांपडला म्हणजे त्यांना आनंद होतो व त्याचा ते जास्तींत जास्त उपयोग करण्याचा प्रयत्न करतात. अर्थातच एखादा मनुष्य भराभरा शिव्या देतांना आढळतो, त्या वेळीं ते ऐकण्यांत त्यांना गंमत वाटते. ती शिवी पुन्हा उच्चारण्यांत, त्या शिवीचा अर्थ त्यांना कळतो असें नव्हे. परंतु आपण कांहीं तोंडभरून बोललों, कांहीं महत्कृत्य केलें अशी त्यांची कल्पना होते. वस्तुतः शिव्या देणें हें माणसाच्या संतापाचें व चिडीचें एक प्रतीक आहे. ज्या लोकांच्या संतापाला किंमत असते, ते लोक रागावलेले दिसतांच भोंवतालचे लोक आपोआपच समजुतीनें आपलें वागणें सुधारतात. ज्यांच्या चिडीला विशेष अर्थ नसतो अशीं माणसें चिडीची तीव्रता दाखविण्याकरितां, व जी गोष्ट आपल्या रागानें होत नाहीं, त्याबद्दलचा संताप व्यक्त करण्याकरितां शिव्या देतात. ह्यामुळें त्यांच्या मनावरील ताण हलका होतो. मुलें रागावल्यानंतर किंवा चिडल्यानंतर शिव्या देतात तीं शिव्यामागचा अर्थ समजून नव्हे तर संतापाचें प्रतीक म्हणून. एका आईनें आपल्या शाळेंत मागासलेल्या मुलाला वारंवार असें म्हणावें कीं तूं दगड आहेस, देवानें तुझ्या डोक्यांत धोंडे भरलेले आहेत. ह्याचा परिणाम इतकाच झाला कीं देवाबद्दल त्या मुलाला अत्यंत तिरस्कार वाटूं लागला. तो म्हणे ज्या देवानें सर्व मुलांना बुद्धि दिली, आणि मला धोंडे दिले तो देवच मला नको. अशा तऱ्हेनें आईबापांच्या सहजी बोलण्यांतून मुलें नवीन प्रयोग शिकत असतात, नवे विचार ग्रहण करीत असतात. म्हणून मुलांच्या देखत काय बोलावें, कसें बोलावें ह्याचा विवेक करायला हवा.

कित्येक आईबापांना आपल्या मुलांमध्यें गैर तुलना करण्याची संवय असते. एखादा हुशार असतो, एखादा देखणा असतो, तर एखादा सामान्य असतो. मुलांच्या देखत त्यांची तुलना केल्यामुळें त्याच्या मनांत अप्रत्यक्ष रीतीनें राग निर्माण होतो, त्याला आपल्या भावंडाबद्दल द्वेष वाटूं लागतो, असूया निर्माण होते व स्वतःसंबंधीं न्यूनगंड निर्माण होतो व न्यूनगंड निर्माण होतांच तो मुलगा आपल्या भावंडांमधील उणें काढूं लागतो. त्यांचे दोष शोधूं लागतो, व त्यांच्यांत उणेपणा सांपडला नाहीं तर नसलेले दोष त्यांच्यावर लादण्याचा किंवा नसत्या कुरापती काढण्याचा तो प्रयत्न करतो. आपल्या भावंडांवर हरतऱ्हेचे आळ घेतो. त्यांच्या संबंधीं खोटें सांगतो. नंतर त्यांच्या वह्यांवर शाई सांडणें, त्यांचे चांगले कपडे फाडणें, वगैरे प्रयोग मुलें करूं लागतात. ह्याचा अर्थ असा नव्हे कीं चांगली तुलना करूं नये. तुलना जरूर करावी, पण ती अतिरेकी व अतिरंजित नसावी. तुलना शक्यतों नकारात्मक नसावी. उदा० 'अ' उत्तम धावतो. 'बला' धावतांच येत नाहीं. असें म्हणण्यापेक्षां 'अ' उत्तम धावतो व 'ब' उत्तम सायकल चालवतो, असें म्हणावें. एकाचा गुण व एकाचा दोष दाखविण्यापेक्षां दोघांचे गुण दाखवावे. पुष्कळदां आईबाप व मुलें ह्यांचे संबंध बिघडलेले असतात व ते आपल्या सहजासहजीं लक्षांत येत नाहींत. परंतु त्यांच्या मनांतील ह्या दबलेल्या वृत्ति सुप्तावस्थेत प्रगट होतात. त्यांच्या स्वप्नांत स्पष्ट दिसून येतात, म्हणून लहान मुलें जर नित्य नियमानें झोपेंत दचकूं लागलीं, स्वप्नांत भिऊं लागलीं अगर दररोज गादी भिजवूं लागलीं तर त्यांची वेळींच काळजी घ्यावी लागते. मुलांच्या आरोग्याकरितां त्याच्या मनांत स्वास्थ्याची वा संरक्षणाची भावना असणें आवश्यक असतें. आपल्याला आधार म्हणून व आपलें संरक्षण करणारे कोणी तरी घरांत आहेत, ह्या कल्पनेनें त्यांना स्वास्थ्य लाभत असतें. आणि आई-वडील आपणाकडे पुरेसें लक्ष देत आहेत, आपल्या अडचणींचा परिहार ते करूं शकतात, ह्या कल्पनेनें तीं सुखी असतात. परंतु आईवडिलांपैकीं कोणी वारले, विभक्त झाले, अगर घरामध्येंच भांडूं लागले तर मुलांच्या मनांतील ही स्वास्थ्याची कल्पना निखळून जाते. आपण पोरके आहोंत, अशी भीति व आपलें संरक्षण व सुख आपणच पाहिलें पाहिजे, अशी जबाब-दारी त्यांच्या कोवळ्या मनाला वाटूं लागतें व त्यामुळें त्याची वाढ मोकळ्या

मनानें होत नाहीं. आईबाप व भांवडें ह्यांच्याशीं मुलें मोकळेपणानें वागत असलीं म्हणजे त्यांच्या मनांत कसलीहि घाण सांचत नाहीं. कसलेंहि किल्मिष नांदत नाहीं व कोणताहि चोरटेपणा राहात नाहीं. मुलाला जें वाटेल तें मोकळेपणानें तो आईवडिलांजवळ बोलूं शकतो. परंतु आईबापांनींच एखाद्या विषयाच्या बाबतींत चोरटेपणा, अगर अयोग्य गुप्तता राखली तर मुलांच्या मनांत शंका निर्माण होते. ही अवस्था वाढत्या वयांतील मुलांच्या बाबतींत व विशेषतः लैंगिक विषयाबाबत येते. शारीरिक आरोग्याची व शरीरांत होणाऱ्या बदलाची जाणीव आईनें मुलीला व बापानें जर मुलाला दिली नाहीं तर मुलें आपल्या शंका बाहेरून तृप्त करून घेतात. त्या अर्धवट माहितीवर विचार करीत बसतात व त्याचें पुष्कळदां विकृतींत रूपांतर होतें. ज्या विषयाची गुप्तता राखली जाते तो विषय चोरून बोलण्यांत त्यांना सुख वाटतें. ह्याचीं उदाहरणें शाळेंतील व छात्रालयांतील स्नानगृहांत अगर संडासांत मुलांनीं काढलेलीं चित्रें देतील. ज्या भावना अत्यंत आरोग्य-संपन्न रीतीनें वाढायला हव्या त्यांना पुरेसा मोकळेपणा व योग्य तें ज्ञान योग्य वेळीं न मिळाल्यामुळें असें विकृत स्वरूप प्राप्त होतें.

"मुलांच्या मनामध्यें व त्यांच्या वाढीमध्यें क्रीडाप्रवृत्तीला महत्त्वाचें स्थान आहे.मुलांच्या मनांची गुंतागुंत त्यांच्या खेळांतून पुष्कळदां प्रगट होते किंवा उकलते सुद्धां."(श्री.गो.ना.हर्षे ध्वनिक्षेपित भाषण) कांहीं आई–बापांची,खेळ हा अधर्म अशी कल्पना झालेली असते.मुलानें देवासारखें गप्प बसावें,तोंडांतून शब्द काढूं नये, मनमोकळेपणानें हसूं नये, पडल्या झडल्यास मनसोक्त रडूं नये अशा तऱ्हेच्या विचित्र कल्पना झालेल्या असतात. वेळ सांपडतांच मुलानें अभ्यास करावा व इतर वेळीं स्वस्थ बसावें असें त्यांना वाटतें. अर्थातच असे अरसिक आईबाप थोडेच, परंतु त्यांच्या घरांत, त्यांच्या मुलांची मात्र अत्यंत कुचंबणा होते. मुलींच्या बाबतींत घरकुल, बाहुलाबाहुली, भातुकली वगैरे खेळांना खूपच महत्त्व आहे. परंतु त्याकडे आजकाल द्यावें तितकें लक्ष दिलें जात नाहीं. मुलें व आईबाप ह्यांच्या संबंधामध्यें शिस्तीचाहि विचार करायला हवा. पुष्कळ घरांतून मुलांना अत्यंत लाडावलें जातें अगर शिस्तीच्या धारेवर धरलें जातें. चांगल्या हेतूनें कां होईना मुलांना शिस्त लावणें हें आपलें कर्तव्य आहे, असें घरांतील प्रत्येक माणसाला वाटतें व आपापल्या

दृष्टिकोनांतून जो तो शिस्त लावूं इच्छितो व यामध्यें मुलाची मात्र पंचाईत होते. बापानें मुलाला शिस्त लावण्याकरितां चार शब्द सांगतांच आजोबा मध्यें पडून बापालाच शिस्त लावतात. आणि सांगतात "तुझ्या लहानपणीं तूं काय दिवे लावले होतेस ते आम्हांलाहि माहीत आहेत." आईनें मुलीला शिक्षा केली तर बाप मध्यें पडतो व आईच्या माहेरावर व तेथील गुणावर प्रवचन करतो. वडील मंडळींच्या ह्या परस्पर संबंधांत मुलाला शिस्त तर लागत नाहींच पण हाल मात्र होतात. शिस्त केव्हां आणि कशी लावावी ह्या-संबधींचा विवेक आईबापांनीं अवश्यमेव करायला हवा. संध्याकाळीं मुलगा मैदानावर खेळून घरीं परत येतो. आपल्याला जेवायला उशीर झाला आहे, ह्यापेक्षांहि आपण सामना जिंकला ह्या आनंदांत तो असतो. त्याला साह-जिक असें वाटत असतें आपण सामना कसा कौशल्यानें जिंकला त्याचें रस-भरित वर्णन घरच्या लोकांना सांगावें, व त्यांच्याकडून आपलें कौतुक व्हावें. परंतु त्याचें न ऐकतां आईबापांनीं जर प्रथमच सरबत्ती सुरू केली व रागावले तर मुलगा हिरमुसला होतो. त्याचप्रमाणें जेवणाच्या वेळेला सर्व मंडळी एकत्र जमत असली तर त्या वेळीं मुलासंबंधीं चर्चा करणें, त्याला तेथें शिस्त लावणें किंवा त्याच्याबद्दलच्या तक्रारी वाडिलांना सांगणें हें बरोबर नव्हे. ह्यामुळें दररोज जेवणावर होणारा हा त्रास मुलाला असह्य वाटतो व जेवणाविषयींच घृणा उत्पन्न होते व शक्य झालें तर हा प्रसंगच टाळावा असें मुलाला वाटूं लागतें. मूल आपलें जरी झालें तरी आई व वडील ह्यांनीं एकमेकांवरील आपल्या प्रेमाचें प्रदर्शन मुलांच्या समोर करूं नये. त्यामुळें आईबापांविषयीं मुलाच्या मनांत निर्माण झालेली आदराची भावना नष्ट होत जाते. वाढत्या मुलांच्या मनासमोर एखादा आदर्श हवा असें त्यांना वाटत असतें व त्यामुळें घरगुती वातावरणांत व बाहेरील व्यवहाराबाबत आईवडिलांच्याकडे मुलें अनुकरणाच्या दृष्टीनें पाहतात. ही जाणीव आई-बापांनीं सदैव जागृत ठेविली पाहिजे.

आतांपर्यंत केलेल्या विवेचनावरून आईबापांचा असा ग्रह होण्याचा संभव आहे कीं मुलांच्याशीं इतक्या काळजीपूर्वक वागणें जवळ जवळ अशक्यच आहे. परंतु तें खरें नव्हे कारण मुलांच्याशीं जास्तींत जास्त नैसर्गिक रीतीनें वागणें म्हणजे चांगलें वागणें व तें अगदीं सोपें आहे.

पुष्कळदां असें आढळून येतें कीं आईबाप मुलांच्या बाबतींतील आपली जबाबदारी घेण्यास तयारच नसतात. कारण आपणाला मूल झालें हा केवळ अपघातच होय असें त्यांना वाटत असतें. मुलांच्या वाढीबाबत आपणावर कांहींहि जबाबदारी नाहीं, अशी त्यांची कल्पना झालेली असते. आजकाल कोणत्याहि शाळेंतील शिक्षकाला विचारलें तरी ते असेंच सांगतील कीं मुलाच्या अभ्यास व वाढीबाबत आईबाप अत्यंत उदासीन असतात. एखाद्या मुलाबाबत कांहीं अडचण असली, आणि तसें वारंवार कळवलें तरीहि ते लक्ष देत नाहींत. कदाचित् ह्या उदासीन वृत्तीमुळेंच आजकालच्या शाळांना मुलें ठेवण्याचे कोंडवाडे ह्यापलीकडे अर्थ उरत नाहीं. पुष्कळ आईबाप ह्या दृष्टीनेंच शाळेकडे बघतात व एकदां मुलाला शाळेंत घातलें कीं आपली जबाबदारी संपली असें ते मानतात. वस्तुतः मातृपद व पितृपद ह्यांची थोरवी पुरातन काळापासून गायिली जाते. आजवर आयुष्यांत जें जें कांहीं मिळविलें, जें समृद्ध आयुष्य घालविलें. त्या सर्वांच्या सुधारणेचा व संस्कृतीचा वारसा आपल्या मुलांच्या हातांत देऊन मानवतेची धुरा पुढें वाहावयाची ही कल्पना मुलांच्या वाढीमागें असायला हवी. परंतु यंत्रयुगामध्यें ज्या अनेक कल्पनांची कोंडी झाली त्यामध्यें कुटुंबसंस्थासुद्धां कोसळत चालली आहे व ज्या अर्थानें मुलाला घर वा कुटुंब असायला हवें त्या अर्थानें तें त्याला मिळत नाहीं. विशेषतः शहरी वातावरणांत आईबाप व मुलें ह्यांचा एकमेकांशीं पुरेसा संबंध येणें सुद्धां कठीण जातें व म्हणूनच तेथील उन्मार्गीपणाचें प्रमाण ग्रामीण प्रदेशापेक्षां वाढलेलें आहे. खरोखर आईबाप होण्याकरितां किंवा आईबापांचें कर्तव्य चांगल्या रीतीनें पार पाडण्याकरितां त्या विषयाची पूर्ण माहिती हवी. मनांत स्पष्ट कल्पना हव्यात, व आपण घेतलेल्या नव्या जबाबदारीची जाणीव हवी.परंतु यांतील कांहींहि नसल्यामुळें पुष्कळदां मुलें कुमार्गाला लागलेलीं दिसतात. बालगुन्हेगारीच्या क्षेत्रांतील सर्व तज्ज्ञांचें मत असें आहे कीं प्रमेयात्मक मुलांच्या पेक्षां, प्रमेयात्मक आईबापच जास्त आहेत. ज्या आईबापांना ह्या विषयाची कल्पना नाहीं त्यांनीं मुलांची केलेली उपेक्षा कदाचित् क्षम्य ठरेल. परंतु ज्या आईबापांना ह्याची जाणीव करून घेणें शक्य आहे त्यांनींच जर मुलांची उपेक्षा केली, आपल्या मुलांच्याकडे पुरेसें लक्ष दिलें नाहीं, आपल्या मुलांच्या पुढें चांगले आदर्श ठेवले नाहींत तर त्याला कोण जबाबदार ?

बालगुन्हेगारीची वाढ वेळच्या वेळीं थांबवावी असें जर आपणास वाटत असेल तर मुलांच्या मनामध्यें न्यायाविषयीं आदर व कायदे पाळण्याची वृत्ति वाढायला हवी. आज अनेक मुलांच्यामध्यें न्यायपद्धतीविषयीं अनादर दिसतो. मागें एका उदाहरणांत सांगितल्याप्रमाणें आईबापांच्या मनांत कायदे पाळण्याची वृत्ति, न्यायखात्याविषयीं आदर असेल तर ती वृत्तिच मुलांच्यामध्यें येऊं शकते. खोटें तिकीट काढणें, रस्त्यावर चुकीच्या बाजूनें चालणें, सायकलला दिवा नसतांना केवळ ह्या भागांत पोलिस नाहींत म्हणून सायकल दामटणें वगैरे लहानसहान व्यवहारांतून मुलांची वृत्ति बनत असते. या सर्व उदाहरणांतून एक गोष्ट निदर्शनास येते कीं पुष्कळ लोकांची वृत्ति पोलिस आहेत म्हणून आपण कायदे पाळावेत, पोलिस नसतील तर कायदे पाळण्याचें कांहीं एक कारण नाहीं अशा तऱ्हेची असते. दंडशास्त्राच्या दृष्टीनें ह्या वृत्तीलाच समाजानें घ्यावें लागतें. मुलांच्या मनांत हे पोलिस सर्व प्रकारें आमचें रक्षण करतील, हें न्यायखातें मला संपूर्ण न्याय मिळवून देईल. ह्या राज्यांत मला स्वास्थ्य लाभेल अशी वृत्ति बाणायला हवी. मुलांच्याच काय पण इतरहि घटकांच्या मनामध्यें असें वाटायला हवें कीं लोकसभेनें केलेले कायदे हे मींच केलेले कायदे आहेत व तें मोडणें पाप आहे. अर्थातच हें सर्व मानतांना लोकसभेच्या व न्यायसभेच्या पाठीमागें जनतेचा पाठिंबा आहे असें आपण गृहीत धरीत असतों. पण सदासर्वकाळ ती गोष्ट खरी असते असें नाहीं. शिवाय राजकीय गुन्ह्याचा विचार इथें अभिप्रेत नाहीं. गुन्हा करणारा व न्यायदानपद्धति ह्यांचा विचार करतांना त्या पद्धतीमध्यें असलेले दोष गृहीत धरूनसुद्धां असें म्हणावेसें वाटतें कीं न्यायाविषयीं अनादर व कायदे न पाळण्याची वृत्ति दिवसेंदिवस वाढत आहे. ह्या वृत्तीच्या जोपासनेकरितां केवळ आईबाप नव्हेत तर मुलांशीं संबंध असणारे अनेक घटक कारणीभूत आहेत. आईबाप व शिक्षक ह्यांची वागणूक जर गैर असेल तर आपण कायदे पाळावे असें मुलाला कधींहि वाटणार नाहीं. ह्याशिवाय मुलांच्याशीं संबंध असणारे जे अनेक घटक आहेत, मुलांना दाखविण्यांत येणारे चित्रपट, मुलें वाचतात तीं मासिकें व गोष्टी, मुलांच्याकडे येणारीं वर्तमानपत्रें ह्या सर्वांचा मुलांच्या मनावर परिणाम होत असतो. मुलें जे चित्रपट पाहतात त्या सर्व चित्रपटांमध्यें जर पोलिसांचा पराभव होऊन गुन्हेगारांचा जय होत असेल,

पोलिसांना गुन्हेगार सांपडत नसतील, तर मुलांचा पोलिसांवर विश्वास बसावा कसा ?'

ह्या बाबतींत अमेरिकेंतील ख्यातनाम बालनगराचे संस्थापक फादर फ्लॅनगन, व अमेरिकेंतील गुप्त पोलिसांच्या फेडरल ब्यूरोचे प्रमुख श्री. एडवर्ड हुवर ह्यांनीं मांडलेले विचार मननीय आहेत. " केवळ गुप्त पोलिसांचें चातुर्य वाढविण्यानें, त्यांना शस्त्रविद्येंत प्रवीण करण्यानें, किंवा गुन्हेगारांना जास्तींत जास्त शिक्षा करण्याची मागणी करणाऱ्या वकिलांचें कौशल्य वाढविल्यामुळें गुन्हे संपतील ही आशा व्यर्थ आहे. कायदे व त्यांची अंमलबजावणी ह्यामुळें वरवरचे कांटे आणि कुसळें काढलीं गेलीं तरी गुन्ह्याचें मूळ नाहींसें होणार नाहीं. गुन्हा हा केवळ दंडशास्त्रीय प्रश्न नसून सामाजिक, नैतिक व मानसशास्त्रीय प्रश्न आहे " ( प्रकरण १४ वें फ्लॅनगन ऑफ बॉइज् टाऊन—जॉर्ज, फल्टन ऑस्लर). ह्या दोघांच्याहि मतें सर्वसामान्य नागरिकाची गुन्ह्याविषयींची उपेक्षावृत्ति अत्यंत तिरस्करणीय आहे. आपणावर प्रसंग येईपर्यंत आपला गुन्ह्यांशीं कांहींएक संबंध नाहीं व त्याचा आपण विचार करण्याची जरूरी नाहीं असें प्रत्येक सामान्य नागरिकाला वाटत असतें. परंतु ही गोष्ट खरी नव्हे. आज न्यायदान व तुरुंगखातें ह्यांवर होणाऱ्या प्रचंड खर्चाचा वांटा आपणच करामधून देत असतों. म्हणून गुन्हेगारीचा नायनाट करण्याकरितां कायद्याच्या अंमलबजावणीला व न्यायाला आपला पाठिंबा हवा. कायदे केल्याबरोबर ते कसे मोडतां येतील ह्याचा विचार सुचायला नको. न्याय देणाऱ्या पंचांना गुन्ह्याकडे शास्त्रीय दृष्टिकोनांतून पाहण्याची वृत्ति शिकविली पाहिजे. "चित्रपट, रेडिओ, मासिकें आणि वृत्तपत्रें ह्यांच्या गैर विचारामुळें मुलांच्या व तरुणांच्या मनांत विकृति निर्माण होत असते. तुरुंगांत गजाआड असणाऱ्या कुठल्याहि मुलांना तुम्ही प्रश्न विचारा, म्हणजे आपल्याला गुन्हे करण्याची चलाख कल्पना कोठून सुचली, हें तीं मुलें सांगतील. चित्रपट आणि रेडिओ हे तर मार्गदर्शक आहेतच, पण वृत्तपत्रांच्या बाबतींत देखील बोलायला नको. देशांतल्या १० टक्के लोकांना यांची दिक्कत वाटत नाहीं. आणखी त्यांचाच सर्वांत जास्त उपद्रव होतो. मुलांच्यापुढें वीरांचे आदर्श ठेवण्याऐवजीं हीं वृत्तपत्रें दरोडेखोर खलनायकाचे आदर्श ठेवतात आणखी मुलें त्यांचें हुबेहूब अनुकरण करतात. " ( क्रित्ता ) फादरचें म्हणणें

पुष्कळसें खरें आहे. आपल्या मुलांच्या मनामध्यें गुन्हेगारांच्या विषयीं आदर-भाव निर्माण केला जातो. आणखी त्याचा परिणाम पुष्कळदां विभूति पूजेंत होतो. न्यूयॉर्कमधील एका थिएटरांत डिलिंजर नांवाच्या एका कुप्रसिद्ध दरोडेखोराचा चित्रपट चाललेला होता. चित्रपट चालू असतांना डिलिंजरचा पाठलाग करणाऱ्या पोलिसांना लोक हसतात व डिलिंजरच्या शूरपणाला टाळ्या वाजविल्या जातात, हें पाहून अमेरिकेंतील सर्वश्रेष्ठ वकील होमर क्यूमिंग्ज यांना तर धक्काच बसला. त्यांना वाटे कीं गुन्हेगारीच्या आकर्षणा-पासून आपलीं मुलें वांचविण्यांत आलीं पाहिजेत. याकरितां आपण त्यांना एक आदर्श नायक दिला पाहिजे. इंग्लंडमधील मुलें व मुली तेथील पोलिसांची स्तुति करीत, त्यांना स्कॉटलंड यार्डचा अभिमान वाटे. कॅनेडियन मुलें व मुली उत्साहानें घोडदळी पोलिसांचें कौतुक करीत, आणखी त्या पोलिसांना हवा असलेला गुन्हेगार प्रत्येक वेळीं सांपडे. पण अमेरिकन मुलें खेळतांना सुद्धां डिलिंजरचा खेळ खेळत. हें कसें बदलावें ! या प्रश्नावर सारें अमेरिकन पोलिस खातें खळबळून गेलें. विचार करून त्यांनीं अमेरिकन मुलांना एक नवा वीरपुरुष देण्याचें ठरविलें. त्यांचें नांव ' जी मॅन '. लवकरच हॉलिवुड-मधून चोर-गुन्हेगारीच्या चित्रपटांची निर्मिति थांबली. नट-नटी लुटारूंचें काम करीनासे झाले. हा सारा फरक ' जी मॅन 'नें घडवून आणला. आणि ९० टक्के वृत्तपत्रांनीं याला पाठिंबा दिला. पण ज्या १० टक्के वृत्तपत्रांनीं या परिवर्तनाला पाठिंबा दिला नाहीं त्यामुळेंच सारा घोटाळा झाला. एखाद्या गुन्हेगाराचें किंवा फौजदारी वकिलाचें खरेंखुरें चित्रण करण्याऐवजीं जर त्याचें भडक विशेषणांनीं वर्णन करण्यांत आलें, तर नेमका नको त्याच विशेषणांचा परिणाम लोकांच्या मनावर राहतो. ज्यांनीं आपलें कायद्याचें ज्ञान अट्टल गुन्हेगारांना तुरुंगाबाहेर ठेवण्याकरितांच वापरलें त्यांचा उदो उदो वृत्तपत्रें करतात. एखाद्या बारीकशा गुन्हेगारानें पोलिसांच्या कोठडींतून पलायन केलें तर त्याचे चटकदार वृत्तान्त छापले जातात आणि ते आवडीनें वाचले जातात. पण वृत्तपत्रकारांनींहि आपल्या जबाबदारीची जाणीव ठेवा-वयास हवी असें फादरला वाटे. याकरितां त्यानें तळमळीनें चळवळ केली आणि तिचें फळ लवकरच दिसूं लागलें. छापल्या जाणाऱ्या प्रत्येक शब्दाची किंमत काय आहे हें फादरनें वृत्तपत्रकारांना शिकविलें. मथळ्यामध्यें छापल्या

जाणाऱ्या प्रत्येक शब्दाचा जनमनावर विलक्षण परिणाम होत असतो. गुन्हेगारांची एखादी छोटी टोळी एकदोन नागरिकांना ठार मारते. आणखी पैशाची लूट घेऊन निसटून जाते. दुसरे दिवशीं सकाळीं वृत्तपत्रांचा पाहिला ठळक मथळा 'तीन मिनिटांत नशीब उघडलें ! तीस हजारांची चोरी ! ! पगारपेटीवर धाडसी दरोडा ! ! !' असा येतो. येथील 'धाडसी' या शब्दाला कोवळ्या मनाच्या दृष्टीनें एक विलक्षण किंमत आहे. धाडसप्रिय असलेल्या तरुण मनाला ह्याची विलक्षण मोहिनी पडते. एक अतिशय चांगला शब्द, उत्तम विशेषण आपण खुनी दरोडेखोराला लावतों. त्यामुळें स्वतःचें आयुष्य नव्यानें बनवूं पाहणाऱ्या कुमारावस्थेंतील मुलांना एक बंदुक घेऊन तीन मिनिटांचें धाडस करावयाचें व साऱ्या आयुष्याची तरतूद करून ठेवावयाची म्हणजे चांगलें वीरकृत्य आहे, असें वाटतें. मग तसेंच आपण स्वतः करावें असा मोह त्यांना कां होणार नाहीं ?

वृत्तपत्रांच्या अशा अविचारापासून मुलांचें रक्षण करण्याकरितां मुंबई राज्यांत मुलांच्या कायद्यांत सोय करण्यांत आलेली आहे. त्याअन्वयें मुलांच्या बाबतींतील गैर मजकूर छापणें, अगर त्या मुलांचे फोटो छापणें ह्याला शिक्षा आहे. परंतु कांहीं वेळां असें आढळतें कीं कांहीं वृत्तपत्रकारांना ह्या जबाबदारीची जाणीव नसते. मागें एकदां अनाथाश्रमांत एक गृहस्थ आले. हे गृहस्थ संस्कृतचे पंडित होते व त्यांना तशी नोकरी लावून देण्याचा संस्थाचालक प्रयत्नहि करीत होते. परंतु एके दिवशीं कांहीं निमित्तानें आलेल्या वृत्तपत्रकारांनीं त्यांची हकीकत ऐकली व ह्याची चमचमीत बातमी करितां येईल असें वाटून त्यांनीं त्या गृहस्थाचा फोटो देऊन 'संस्कृत पंडिताचें अनाथाश्रमांत आगमन' असें शीर्षक देऊन त्यांची हकीकत छापली. ह्याचा परिणाम इतकाच झाला कीं जेथें त्या गृहस्थांना नोकरी लावून देण्याचा संस्थाचालक प्रयत्न करीत होते त्यांनीं त्यांना नोकरी नाकारली. त्या हेडमास्तरांना असें वाटूं लागलें कीं ह्यांना आपण शिक्षक नेमल्यानंतर त्यांचा मुलांच्यावर वचक राहणार नाहीं. कारण ते एकदां भिकारगृहांत राहात होते.

वस्तुतः आजच्या लोकशाहीच्या काळांत वृत्तपत्रें ही अत्यंत प्रभावी शक्ति आहे. त्याचा अधिकाधिक चांगला उपयोग उद्यांच्या नागरिकांकरितां करण्यांत आलेला आपण पाहतों. ज्यांना ह्याची जाणीव नसते अशा वृत्तपत्रामुळेंच

सारा घोटाळा होत असतो. वर अमेरिकेंतील वृत्तपत्रांचें उदाहरण दिलेलें आहे तसेंच एक उदाहरण माझ्या पाहण्यांत आहे. मुंबईच्या एका दरोड्याचें आतिशय आकर्षक वर्णन वर्तमानपत्रानें दिल्यानंतर आमच्याकडील एका मुलाच्या मनांत असा विचार आला कीं मरमर अभ्यास करायचा व कुठेंतरी खर्डे-घाशी करीत असायचें, ह्यापेक्षां एखाद्या पिस्तुलाच्या अगर सुऱ्याच्या जोरा-वर एकदम जर नशिबाची कमाई करतां आली तर फार बरें होईल. हा मुलगा आतिशय धाडसी वृत्तीचा होता व त्याला माहीत होतें कीं महि-न्याच्या पहिल्या तारखेला शाळेंतील शिक्षक फी जमा करतात. त्यानें एक तारखेला हातांत काठी घेतली व मास्तरांजवळ जाऊन म्हणाला, ' हॅन्ड्स् अप." त्या होतकरू दरोडेखोरांच्या मनांत आतां आपलें नशीब उघडलें असें वाटत असावें.परंतु त्या शिक्षकाच्या हें लक्षांत येतांच त्यांनीं त्याला रिमांड-होममध्यें आणून सोडलें. केवळ वर्तमानपत्रेंच नव्हे तर चित्रपटांचामुद्धां मुलांच्या मनांवर फार खोल परिणाम होत असतो. ह्याचा अर्थ असा नव्हे कीं मुलांना दाखविल्या जाणाऱ्या प्रत्येक चित्रपटांत सत्त्ववृत्तींचा जय व्हावा. कारण ती वस्तुस्थिति नसते. परंतु हें मात्र तितकेंच खरें कीं जर सर्व चित्र-पटांमध्यें मुलाना अनैतिक व बेकायदेशीर गोष्टी दिसतील तर त्यांचा न्याया-वरचा विश्वास उडेल. तीच गोष्ट कथाकादंबऱ्यांची आहे. चांगल्या विचारां-तून चांगले आचार निर्माण होत असल्यानें मुलांच्यापुढें चांगले विचार ठेवणें ही सामाजिक घटकांची महत्त्वाची जबाबदारी आहे.

पुष्कळ लोकांची अजूनहि अशी कल्पना आहे कीं मुलांचीं मनें हीं रिकाम्या बाटल्यांसारखीं असून त्यांत आपण सद्विचार भरले कीं आई-बापांचें काम झालें. अत्यंत प्राचीन अवस्थेमध्यें ज्या वेळीं माणसाचें आयुष्य साधें आणि सरळ होतें त्या वेळीं कदाचित् हें खरेंहि असेल. कारण त्याच्या आयुष्यांत गर्दी, गोंधळ आणि गुन्हा ह्यांना जागाच नव्हती. आजच्या यंत्र-युगांत माणसाचें मन इतक्या तऱ्हेचे अनुभव घेत असतें. व इतक्या तऱ्हेच्या लोकांशीं त्याचा संबंध येतो कीं तें पुष्कळदां विकाराच्या आणि भावनेच्या तुफान वादळांत सांपडतें. ह्या आयुष्याला टक्कर देण्याइतकी शिक्षणाची किंवा अनुभवाची शिदोरी पुष्कळांच्या जवळ नसते. पुष्कळदां योग्य शिक्षण होऊन संधि मिळत नाहीं. अशा वेळीं निष्कांचन अवस्थेंत किंवा मनावर ताबा

नसलेल्या स्थितींत जगाच्या मोहांना तोंड देत आयुष्याची निसरडी वाट चालावी लागते व त्यावरून मुलाचा पाय गुन्ह्याकडे केव्हां घसरेल ह्याचाहि नेम सांगतां येत नाहीं. एक मात्र खरें कीं गुन्ह्याचें मूळ मागें मागें शोधीत गेल्यास तें बालपणांत सांपडतें. परंतु मुलांच्या बारीकसारीक अडचणींची विलक्षण उपेक्षा आज केली जात आहे.वेळच्या वेळीं उपाय व शिक्षणाकरितां सोय न झाल्यास अगर त्यांना सुधारणाऱ्या संस्थेला आज चार आणे न दिल्यास तीं मुलें गुन्हेगार म्हणून तुरुंगांत येतील व त्यावर समाजाला ४०० रु. खर्च करायला लागतील. हा केवळ मुलांच्या मनाचा प्रश्न नसून समाजाचा प्रश्न आहे. भोंवतालच्या परिस्थितीचा प्रश्न आहे. आजवर कुटुंबांच्या सावलीमध्यें मुलांच्या व युवकांच्या मनाला एक प्रकारचें स्वास्थ्य आणि संरक्षण असे,पण दिवसेंदिवस हें छत्र नाहींसें होत चाललें आहे.कुटुंबांतील प्रेमाची हानि ही मुलांच्या आयुष्यांत महत्त्वाची उणीव आहे. आणि ती भरून काढण्यावर अनेक गोष्टी अवलंबून आहेत.आईची मुलाबद्दलची काळजी, भावनाशीलता, ह्याला पुरुषाच्या ध्येयवादी धैर्याची जोड आवश्यक आहे. त्यायोगें मुलांमध्यें न ढळणारें शील व स्वभावाची कोमलता ह्याचा संगम होणें शक्य आहे. केवळ आई किंवा बाप नव्हे तर आईबापांचें प्रेम मुलांना हवें. ज्यांना दुर्दैवानें हें मिळत नसेल, त्यांना तें प्रेम देण्याची सोय समाजानें करायला हवी. जो समाजसेवक हें प्रेम देऊं शकेल त्याकडे कोणतींहि मुलें सहज आकर्षिलीं जातील. मुलांच्या मनांतील क्रीडाप्रवृत्तीला व गटप्रवृत्तीला चांगलें वळण लावण्याकरितां बालवीर संघटनेसारख्या चांगल्या संघटना निर्माण व्हायला हव्या. क्रीडांगणांची व सामन्यांची झपाट्यानें वाढ व्हायला हवी, व्यायाम व वननिवासाच्या सोयी उपलब्ध करून घ्याव्या. शक्य तेथें मुलांची शारीरिक व मानसिक तपासणी व्हावी. सांस्कृतिक कार्यक्रमांना महत्त्व द्यावें. संगीत, नृत्य, नाट्य आदि कलांना पोषक अशीं मंडळें, मुलांच्या छंदांना व आवडींना संघटित स्वरूप देणारीं छंद-मंडळें ( परदेशांतील हॉबी क्लब्ज, फोर एच् क्लब्ज, इन्व्हेंटर्स क्लब्ज प्रमाणें ) वगैरे स्थापन करावीं. शिक्षक व पालक ह्यांचा जास्तींत जास्त संबंध आणावा. ( पेरेंट टीचर्स असोसिएशनप्रमाणें ) मागासलेल्या, अनाथ व अपंग मुलांना संरक्षण देणारे कायदे व रिमांड होम्स् संमत शाळा वगैरेंसारख्या संस्था सर्व प्रांतांत काढाव्यात म्हणजे ह्या प्रश्नांचा प्रतिबंध थोड्याफार प्रमाणांत तरी करतां येईल.

आज अनेक कारणांमुळें मुलांचें आयुष्य उजाड होत चाललें आहे. त्यांच्याकडे लक्ष देण्याला खुद्द त्यांच्या आईबापांना वेळ नाहीं. विशेषत: शहरांतील भोंवतालच्या आयुष्याला, उद्वेग आणणारी यांत्रिकता आणि वेग प्राप्त झालेला आहे. शहरांत आढळून येणारे मोह, कुसंगति, मोडकळीस आलेली कुटुंब-संस्था, आईबापांत नांदणारा विरोध, मुलांच्या सुप्त शक्तींना वाव न देणारी कोंदट राहणी, खालावलेलें जीवनमान, योग्य शिस्तीचा अभाव, मुलांच्याकडे आईबाप व शिक्षक यांचें होणारे दुर्लक्ष या सर्व वातावरणांचा परिणाम म्हणून वाढत्या वयाच्या मुलांच्या मनाला अंधाऱ्या रात्रीं दिशा न कळतां समुद्रांत नाव वल्हवीत असावी तशा प्रकारची अंधारी आलेली आहे. त्यांचें मन क्षणभर उल्हासतें, डोळ्यांत चमकत्या ताऱ्याचें तेज येतें. पण क्षणांत पुन्हा मनांत काळोख होऊन सारें जीवन उदास आणि तुच्छ वाटूं लागतें. या द्वंद्वामध्यें प्रेमाचा आधार, घराचें छत्र नसेल तर प्रगतीऐवजीं विकृति निर्माण होते. म्हणून आईबाप, शिक्षक व सारे सामाजिक घटक ह्यांनीं मुलांच्याकडे सामाजिक जबाबदारी म्हणून पाहिलें पाहिजे. मुलांना त्यांनीं शिकवायला पाहिजे कीं जीवन हें जगण्याकरितां आहे. भेकडपणानें मरण्या-करितां नाहीं. आज जग स्वार्थी, ओंगळ, गुन्हेगारीनें बुजबुजलेलें असेल, पण तें जग मोडून नवें जग निर्माण करण्याची किमया मुलांच्या हातांत आहे आणि म्हणून आपण सर्वांनीं त्यांना ह्या कामांत शक्य तितका हातभार लावायला हवा. मुलांच्या प्रगतिशील कार्यशक्तीला आवाहन करायला हवें. त्यांच्यांतील सुप्त शक्ति जाग्या करायला हव्या, म्हणजेच शांततेचीं, समतेचीं व स्वातंत्र्याचीं युगानुयुगें उरांशीं बाळगलेलीं स्वप्नें उद्यां तरी साकार होतील.

❁ ❁ ❁

: ५ :

# उनाड, अवखळ आणि उन्मार्गी

उन्मार्गी मुलांचा प्रश्न हा आजच्या सामाजिक व गुन्हा-विषयक अभ्यासकांच्या दृष्टीनें अत्यंत महत्त्वाचा प्रश्न होऊन बसला आहे. कारण मुलें अवखळ आणि उन्मार्गी कां होतात ह्याच्या कारण-परंपरेमध्यें, आजच्या सामाजिक विघटनेचीं चिन्हें स्पष्ट दिसत आहेत. शिवाय ह्या मुलांना वेळच्या वेळींच जर सुधारलें नाहीं तर उद्यांच्या गुन्ह्यांच्या व गुन्हेगारीच्या संख्येवर तीव्र परिणाम दिसून येतो, ही गोष्ट या विषयाच्या सर्व अभ्यासकांनीं एक मतानें मानली आहे. म्हणून आजच्या गुन्हेगारीचा प्रश्न जर सोडवावयाचा असेल तर उद्यां गुन्हेगार होणाऱ्या ह्या मुलांना वांचविलेंच पाहिजे, त्यांना सुधारलेंच पाहिजे. मुंबई राज्यामध्यें गुन्हेगार म्हणून कोर्टापुढें आणल्या जाणाऱ्या मुलांची प्रचंड संख्या पाहतां ह्या प्रश्नानें केवढें उग्र स्वरूप धारण केलें आहे ह्याची कल्पना येईल. खिसे कापण्यापासून तें खून करण्यापर्यंत व विडी पिण्यापासून तें बलात्कारापर्यंत सर्व तऱ्हेच्या गुन्ह्यांची नोंद मुलांच्या बाबतींत सांपडते, व त्याच्या बरोबरच कांहीं बिकट प्रश्न मनांत उभे राहतात. ज्यांना आपण कोवळीं समजतों त्या अल्पवयीन मुलाबाळांच्यामध्यें ही गुन्हेगारीची उन्मार्गगामी प्रवृत्ति कशी निर्माण झाली ? ती त्यांच्यामध्यें जन्मतःच होती कीं कांहीं विशिष्ट परिस्थितीमुळें ती वाढीला लागली ? योग्य उपायानें ती सुधारणें शक्य आहे, का हट्टी रोगाप्रमाणें ती उन्मार्गी प्रवृत्ति मुलांच्या

मनांत घर करून राहणार आहे ? ह्या प्रश्नांचा विचार आजवर आलेल्या अनुभवाच्या आधारावर व शास्त्रीय ज्ञानाच्या प्रकाशांत करणें इष्ट आहे.

उन्मार्गी वर्तन हा एक वागणुकींतला आणि स्वभावरचनेमधला दोष असल्यानें त्याचा विचार तुलनात्मक पद्धतीनेंच केवळ करतां येईल. समाजाच्या जन्माबरोबरच माणसामाणसांनीं एकमेकांत वागण्याचे कांहीं सामाजिक संकेत ठरवले गेले आहेत. कांहीं निर्बंध घालण्यांत आलेले आहेत. ह्यांतील कांहीं संकेत व कांहीं सामाजिक वागणुकीच्या कल्पना लिखित असल्या म्हणजे आपण त्याला कायदा म्हणतों. उरलेले अलिखित संकेत, रूढि, परंपरा, सभ्यता व शिष्टाचार ह्या नांवाखालीं स्वैर—वर्तनाला आळा घालीत असतात. सामाजिक संकेतांचें उल्लंघन करणें हें समाजाला संमत नसल्यानें त्याला पाप, असभ्यता, अश्लीलता, गुन्हेगारी वगैरे नांवांनीं समाज त्यांचा निषेध करतो. कायदा हा केवळ गंभीर समाजविरोधी वागण्याचें नियमन करतो. अर्थातच कायद्याला प्रत्येक बारीकसारीक स्वैर वागण्याची दखल घेणें शक्य नाहीं. ह्यावरून केवळ कायद्याच्या विरुद्ध वर्तन म्हणजे उन्मार्गीपणा किंवा गुन्हेगारी अशी व्याख्या करणें किती चुकीचें आहे हें स्पष्ट कळेल. वस्तुतः उन्मार्गीपणा हा कायदा, नीति, व संकेत; ह्यांच्या तुलनेनेंच ठरवितां येतो. ह्या सर्व कल्पनांनीं चांगुलपणाचे जे संकेत ठरवून दिलेले असतात, त्यांच्या चाकोरीबाहेर वागणें म्हणजे उन्मार्गी प्रवृत्ति. उन्मार्गीपणा केवळ स्वभावांतील संकेत-विरोधी-वागणुकीचें निदर्शन करतो. उन्मार्गीपणाचा मनोव्यथेशीं प्रत्यक्ष संबंध लावतां येत नाहीं. कारण मनोव्यथेमध्यें वेडा माणूस सामाजिक संकेताच्या विरुद्ध वागतो. परंतु तसें वागतांना आपण काय करतों आहोंत व त्याचे परिणाम काय होणार आहेत, ह्याची जाणीव त्या माणसाला नसते. वेडा मनुष्य दगड मारतो. नग्नावस्थेंत फिरतो हें त्याचें वर्तन सामाजिक संकेतांना मान्य होण्यासारखें नसतें. परंतु नग्न फिरतांना कोणाच्या भावना दुखवाव्या किंवा दगड मारतांना कोणाचा खून करावा असा त्याचा हेतु नसतो. उलटपक्षीं आपण असें कां वागतों, व ह्याचे परिणाम काय होतील ह्याचें गूढ त्याला उलगडत नाहीं. कारण असें वेडसर वागणें हेंच त्याच्या दृष्टीनें स्वाभाविक आहे. ह्या तुलनेमध्यें दुसरीहि गोष्ट लक्षांत घ्यायला हवी आणि ती म्हणजे वेडा मनुष्य स्वतः-

विषयीं पुरेशी काळजी करीत नाहीं. धावत्या मोटारला थांबविणें, एक चुटकी वाजवून विमान पाडणें, वगैरे गोष्टी त्याला सहज शक्य वाटत असतात. आणि म्हणून उन्मनावस्थेंत असणारा कोणीहि गृहस्थ स्वत:संबंधीं बेफिकीर असतो. आपल्या वेड्या वागण्यानें स्वतःला दु:खी करूं शकतो. स्वतःला अपघातांत ढकलूं शकतो. कारण आपण असें कां वागतों व ह्याचे परिणाम काय होतील ह्या प्रश्नाचें महत्त्व त्याला फारसें कधींच वाटत नाहीं. अगदीं उलटपक्षीं, उन्मार्गी मुलें वा माणसें स्वत:संबंधीं अतिशय काळजी घेत असतात. आपण असें कां वागतों व ह्या वागणुकीचें फळ आपणांस काय मिळेल ह्याची थोड्याफार प्रमाणांत त्यांना जाणीव असते. दुसऱ्याला दुःख देऊन त्यांतून सुख मानण्याची त्यांची प्रवृत्ति असते. यावरून असें स्पष्ट होतें कीं उन्मनी व उन्मार्गी ह्यांच्यांत साक्षात् कांहीं संबंध नसतो.

वर सांगितल्याप्रमाणें एखादें वर्तन उन्मार्गी आहे किंवा नाहीं हें शोधून काढण्याकरितां त्या वर्तनाचा उगम जेथून झाला त्या हेतूकडे आपण लक्ष पुरविलें पाहिजे.माणसाच्या बाह्य वर्तनावरून उन्मार्गी प्रवृत्ति सिद्ध करणें बहुधा शक्य नसतें. कारण एकच वर्तन एका काळीं किंवा एका ठिकाणीं सामाजिक संकेताच्या चौकटींत बसत असलें तरी दुसऱ्या काळीं व दुसऱ्या ठिकाणीं तेंच वर्तन उन्मार्गी ठरण्याचा संभव आहे. श्रीकृष्ण ज्या ज्या गोष्टी करीत होता, त्या सर्व:गोष्टी आपण तशाच करूं गेल्यास कोणत्या तरी कायद्याच्या चौकटींत अडकणें असंभवीय नाहीं.सहस्र भोजनें घालणें,बहुपत्नीकत्व वगैरे गोष्टी समाजानें पूर्वी पचविल्या तरी आज समाजाला त्या मान्य होणें शक्य नाहीं. म्हणून कोणत्याहि उन्मार्गी वर्तनाचा व त्याच्या हेतूचा विचार कालपरिस्थिती-नुरूप करायला हवा. एका कालांतील व एका देशांतील संकेत जसेच्या तसे दुसरीकडे कधींच लागूं होत नाहींत. कारण माणूस एकसारखा प्रगत होत असतो व त्याचीं सामाजिक वर्तनाचीं मूल्यें बदलत जात असतात. ह्या मूल्य–पद्धतीचें व मुलाच्या वाढीचे घनिष्ठ संबंध असतात. कांहीं गोष्टी आपल्या इतक्या सरावाच्या झालेल्या असतात कीं ती संवय वाढविण्याकरितां कांहीं परिश्रम पडतात; ह्याची जाणीवहि आपल्या मनांतून नष्ट झालेली असते. परक्या गृहस्थाशीं ओळख झाल्यावर नमस्कार करणें, वडील माणसा-बद्दल आदर दाखविणें ह्या साध्या संकेतापासून तों खरें बोलावें, दुसऱ्याच्या

वस्तु घेऊं नये, दुसऱ्याच्या जीविताला धोका पोहचवूं नये, ह्या मूलभूत कल्पनापर्यंत हे सर्व संकेत आपल्यांत इतके रुजलेले असतात, कीं मुलाला हे संकेत पटवून घेण्याकरितां कांहीं श्रम पडतील हें खरेंच वाटत नाहीं. विस्तव पाहिल्यानंतर त्याला हात लावूं नये, ही आपल्या संवयीची गोष्ट असते. परंतु मुलांकरितां हें एक प्रकारचें शिक्षण असतें.

सामाजिक संकेताचा भंग करणें आणि शारीरिक व वास्तव संकेताचा भंग करणें यामध्यें महदंतर आहे. चकचकीत धारदार वस्तूला हात लावणें मुलांना नेहमीं आवडतें परंतु त्याला हात लावतांच हात कापतो हा परिणाम कळल्यानंतर मुलांच्या मनांत त्या वस्तूबद्दलचे संकेत कायम बसतात. हे शारीरिक व वास्तववादी संकेत मोडल्यास त्याचे परिणाम तावडतोब व आपोआप होतात. निखाऱ्याला हात लावतांच हात तावडतोब भाजतो. भिंतीवर धडक मारली तर लगेच डोक्याला खोक पडते. थोडक्यांत म्हणजे चाकूसारख्या आकर्षक वस्तूला हात लावण्याचें सुख व त्यांतून हात कापल्यानें निर्माण होणारें दुःख एकदमच अनुभवास येतें. ह्याच्या उलट सामाजिक संकेताचा भंग केल्यास त्याचे परिणाम तावडतोब होत नाहींत. वडिलांच्या संबंधीं आदर न दाखविल्यास त्याचा परिणाम तावडतोब होत नाहीं व त्यांतून आपोआप दुःख निर्माण होत नाहीं. म्हणून या संकेताचा भंग करण्याचा स्वभाव, प्रवृत्ति आणि विचार हें उन्मार्गीपणाचें पहिलें लक्षण आहे. उन्मार्गी आणि गुन्हेगार प्रवृत्तींच्या मुलांमध्यें या सामाजिक संकेतांना स्थान नसतें. सुख आणखी समाधान हाच त्यांच्या वागणुकीचा हेतु असतो. उन्मार्गीपणा हा जन्मभर असतोच असें नव्हे तर कांहीं लोकांच्या बाबतींत तो कधीं काळीं घडणारा प्रकार असतो.सामाजिक संकेत हे सुद्धां इतके असतां कामा नयेत कीं त्यांच्या वजनानेंच माणूस भारावून जावा. एखादा मनुष्य त्याच्यावर लादल्या गेलेल्या संकेतांनीं अत्यंत त्रासला गेला, तर त्याच्यांतील प्रतिकार-वृत्ति जागृत होते व तो ते सर्व संकेत झुगारून देऊं इच्छितो. आईबापांच्या शिस्तीच्या उलट्या कल्पनांमुळें उन्मार्गी झालेल्या मुलांची संख्या कांहीं थोडी नाहीं.

उन्मार्गीपणाचें दुसरें लक्षण म्हणजे त्या मुलामध्यें सामान्यपणें आढळणारी आघात प्रवृत्ति ( Agressive Tendency ) होय. ह्या प्रवृत्तीचा अभ्यास दिवसेंदिवस अधिक केला जात आहे. परंतु ह्या प्रवृत्तीची संपूर्ण कारणपरंपरा

व कार्यपद्धति ह्याचें ज्ञान मनोव्यथा–शास्त्रज्ञानांना झालेलें नाहीं. ह्या प्रवृत्तीची दिशा स्वतःकडे असते किंवा लोकांकडे असते. आघात लोकांवर केला जातो किंवा स्वतःवरहि केला जातो. ह्या आघाताचें स्वरूप म्हणजे अपमान करावा, मारावें, नुकसान करावें, मोडतोड करावी असें असतें. परंतु उन्मार्गी मुलांच्या बाबतींत आघात–प्रवृत्ति परकेंद्रित असते. हा आघात केवळ सुखाकरितां म्हणून किंवा आपणाभोंवतीं असणाऱ्या वास्तव परिस्थितीची चीड निर्माण झाल्याकारणानें होतो. आपणाला हवी असणारी परिस्थिति भोंवतालीं नाहीं असें कळतांच माणूस हताश होतो. ती सुधारण्याची ताकद आपल्यामध्यें नाहीं. असें वाटतांच त्याला न्यूनगंड वाटतो. व ह्या दोन्ही भावनांचा सामूहिक परिणाम म्हणून भोंवतालच्या प्रत्येक गोष्टीवर आघात करण्याची तीव्र इच्छा निर्माण होते. कांहीं वेळेला एकाच व्यक्तीबाबत प्रेम आणि आघात–प्रवृत्ति निर्माण होत असतात. परंतु हा विषय मनोव्यथा–शास्त्राचा आहे. पुष्कळदां ह्या आघात–प्रवृत्ति माणसाच्या मनांत उचंबळत असतात. परिस्थितीवर आघात करण्याची अत्यंत तीव्र इच्छा असते. परंतु आपल्या मनांत रुजलेल्या संकेतांमुळें अगर भोंवतालच्या परिस्थितीच्या दडपणामुळें तो मुलगा आघात करूं शकत नाहीं. अर्थातच त्याच्या अंगांत जमा झालेल्या ह्या आघात-शक्तीचा निचरा तर व्हायला हवा. मग साहजिकच तो निचरा डोकें-दुखी, भोंवळ येणें वगैरे लहानसहान व्याधींतून पुष्कळदां होतो. ह्याला अपवाद म्हणून कांहीं वेळेला स्वरक्षणाकरितां केलेल्या आघाताचें उदाहरण देतां येईल.तरीहि अनेक उदाहरणांमध्यें असें दिसतें कीं त्याहि आघात–प्रवृत्तीचा हेतु सुख हाच होता. माणसाच्या सुप्त मनामध्यें त्यानें अनुभविलेल्या अनेक गोष्टी राहिलेल्या असतात व अनेक सुखोपभोगाच्या प्रवृत्ति घर करून राहिलेल्या असतात. जागृत मनाला ह्या प्रवृत्तींना योग्य असा प्रसंग दिसतांच, पाण्याचा खोल डोह उचंबळतांच क्वचित् दिसणाऱ्या कासवानें एकदम वर यावें त्याप्रमाणें त्या प्रवृत्ति डोकें वर करतात, व त्याचा परिणाम म्हणून आघात केला जातो. “उन्मार्गीपणाचें लक्षण हेंच कीं आघात–प्रवृत्ति बहुधा स्वकेंद्रित असत नाहीं,ती नेहमीं परकेंद्रित असते.” (डॉ. के. आर. ऐस्लर)

ह्या उन्मार्गी प्रवृत्तींचा हेतु जर सुख असेल तर हें सुख तरी कोणत्या

प्रकारचें आहे, हा प्रश्न उद्भवतो. पुष्कळदां हें सुख अतिशय वरवरचें व कृत्रिम असतें. परंतु सुखाचें रूप कसेंहि असलें तरी त्याकरितां मुलें उन्मार्गी होतात हें विसरतां येणार नाहीं. उन्मार्गीपणाचें स्वरूप साधें असो अगर गंभीर असो, त्याच्या पाठीमागील प्रवृत्ति ध्यानांत घ्यायला हवी. उन्मार्गीपणा म्हणजे सामाजिक संकेत झुगारून देण्याची परकेंद्रित आघात-प्रवृत्ति असें म्हटल्यानंतर साहजिकपणें उन्मार्गीपणाच्या स्वरूपापेक्षां त्या प्रवृत्तीला व कारणपरंपरेला अधिक महत्त्व येतें. घरांतून पळून जाणें, भटकणें, भीक मागणें, सदैव खोटें बोलणें, बारीकसारीक चोऱ्या करणें, शाळा चुकविणें, बाजारांत फिरणें, वेश्या व गुंड ह्यांच्या संगतींत राहणें, जुगार खेळणें, मारामारी करणें, खून करणें, घरफोडी करणें वगैरे अनेक लहानमोठ्या घटनांतून उन्मार्गी प्रवृत्तीचें स्वरूप दिसत असतें. अशा अनेक घटनांकरितां कित्येक मुलें मुलांच्या कोर्टापुढें आणण्यांत येतात. याशिवाय कितीतरी मुलें अशीं असतील कीं ज्यांच्या प्रवृत्ति उन्मार्गी असूनहि त्यांना मुलांच्या कोर्टांत आणण्यांत आलेलें नाहीं. उन्मार्गी प्रवृत्ति ही जन्मजात नसल्याकारणानें उन्मार्गीपणाची कारणमीमांसा हा या क्षेत्रांतील वादाचा विषय होऊन बसला आहे. आर्थिक परिस्थितीवर भर देणारे विचारवंत असें सांगतात कीं सर्व उन्मार्गी प्रवृत्तींचें बीज खालावलेली आर्थिक परिस्थिति व मागासलेली राहणी ह्यांमध्यें आहे. परंतु येथें असें नम्रपणानें सुचवावेसें वाटतें कीं आज आलेला अनुभव तशी साक्ष देत नाहीं. केवळ आर्थिक परिस्थिति चांगली झाल्यानें उन्मार्गीपणाचें मूळ मनांतून नाहींसें होत असेल तर कारणहि सोपें व उपचारहि सोपा होतो. कारण चांगले ही एक सापेक्ष कल्पना आहे. शिवाय तसें असतें तर मध्यमवर्गांतील व उच्च वर्गांतील मुलें उन्मार्गी होतींच ना. त्यांतील सार इतकेंच कीं आर्थिक दृष्ट्या खालावलेल्या परिस्थितींत उन्मार्गी-पणाला क्षेत्र मोठें असतें.

आजपर्यंत असा एक विचार प्रचलित होता कीं मुलांच्या उन्मार्गी वागण्याला एक महत्त्वाचें कारण असतें. परंतु आतां संशोधनानें असें सिद्ध झालें आहे कीं अनेक कारणें एकमेकांवर परिणाम करीत उन्मार्गी स्वभावाची जोपासना करतात, व एक सामूहिक परिणाम एखाद्या व्यक्तीवर करून, उन्मार्गीपणाला वाव देतात. ह्या प्रश्नांचा अतिशय खोल अभ्यास

केलेल्या सीरील बर्ट ह्या संशोधकानें तर एक सामान्यपणें आढळणाऱ्या कारणांची यादी दिलेली आहे, ती अशी:–(१) घरांतील व शाळेंतील गैरशिस्त. (२) उनाड प्रवृत्ति. (३) भावनात्मक बेतालपणा. (४) मनांत निर्माण झालेल्या निरनिराळ्या गंडांमुळें भावनांची होणारी अनैसर्गिक वाढ व आशिष्ट प्रवृत्ति. (५) घरचा उन्मार्गीपणाबाबत पूर्वेतिहास. (६) बौद्धिक मागासलेलेपणा अगर मानसिक दुर्बलता. (७) वाईट छंद किंवा आवडी. (८) मुलाची अयोग्य वाढ. (९) घरांतील बौद्धिक मागसलेपणा..(१०) घरांतील माणसांचे परस्परांशीं असणारे अयोग्य संबंध. (११) मुलावर परिणाम करणारे घराबाहेरील घटक, वाईट संगत, मनोरंजनाच्या साधनांची मोठी विपुलता अगर अत्यंत अभाव. (१२) विचित्र स्वभाव-पद्धति किंवा वेडेपणाबाबत घराचा पूर्वेतिहास. (१३) शारीरिक रोगाबाबत आढळणारा घरचा पूर्वेतिहास. (१४) दारिद्र्य व तदनुषंगिक अडचणी. (१५) मुलांत असणारे शारीरिक दोष.

ह्या यादीमध्यें पुष्कळच फरक करतां येण्याजोगा आहे. शिवाय आपल्या देशांतील परिस्थिति पाहतां कोणतीं कारणें कोणत्या प्रमाणांत मुलावर परिणाम करतात हें खोलपणानें अभ्यासायला हवें. १९५० व ५१ सालीं जीं मुलें मुलांच्या कोर्टापुढें आणण्यांत आलीं त्या मुलांचें विश्लेषण केलें तर असें दिसतें.

| | मुलें | मुली |
|---|---|---|
| (१) उपेक्षित व न ऐकणारीं | २४३३ | ८१८ |
| (२) दुरुपयोग केलीं गेलेलीं | ३० | २०५ |
| (३) गुन्हेगार व उन्मार्गी | ४२३२ | ३०३ |

वरील आंकडेवारीवरून ह्या मुलांची संख्या किती मोठ्या प्रमाणावर आहे हें लक्षांत येईल. उन्मार्गीपणाचें स्वरूप समजावून घेण्याकरितां वरील गुन्हेगार मुलांची संख्या ही गुन्ह्यांच्या वर्गवारीनें विश्लेषित करायला हवी.

| | मुलें | मुली |
|---|---|---|
| (१) चोरी, घरफोडी व तत्सम गुन्हे | १६९९ | ११७ |
| (२) जुगार | २५९ | १ |
| (३) तिकिटाशिवाय प्रवास करणें | ४८५ | २१ |

| | | |
|---|---|---|
| ( ४ ) रेल्वेला उपद्रव | ८ | ० |
| ( ५ ) विनयभंग व असभ्य वर्तन | ६३ | १३ |
| ( ६ ) आत्महत्येचा प्रयत्न | ४ | ६ |
| ( ७ ) खून | १० | ३ |
| ( ८ ) बलात्कार | ५ | ० |
| ( ९ ) स्वसंभोग | २ | ० |
| (१०) देखरेखीच्या शर्तींचा भंग | ९ | १ |
| (११) पळून गेलेलीं | ९० | ० |
| (१२) इतर | १६६८ | २३१ |

( मुंबई राज्यांतील जुवेनाईल व बेगर्स खात्याच्या वृत्तान्तावरून )

वरील वर्गवारीवरून एक गोष्ट स्पष्टपणानें दिसते कीं अवखळपणाचें उनाडपणांत व उनाडपणाचें उन्मार्गीपणांत रूपांतर होतां होतां मुलें गुन्हेगारीच्या मार्गाकडे लागतात व गुन्हेगारीच्या वाटेवरून जर त्यांना लवकर परतवलें नाहीं तर तीं मुलें सराईत गुन्हेगार बनण्याचा संभव असतो. गुन्ह्याच्या स्वरूपावरून त्या मुलांच्या पुढील आयुष्याबद्दलचा अंदाज बांधणें चुकीचें ठरेल. महत्त्वाची गोष्ट गुन्ह्याचें स्वरूप नसून त्या गुन्ह्यामागची प्रवृत्ति आहे. असे मोहाचे कित्येक क्षण प्रत्येक माणसाच्या आयुष्यांत येतात कीं जर त्या वेळीं आपण नेमके बळी पडलों तर आपल्या हातून गुन्हा घडण्याचा संभव असतो. आपल्या मनावर ज्या ज्या प्रमाणात संस्कार झालेले असतील, त्या त्या प्रमाणांत आपण हा मोहाचा क्षण टाळूं शकतों. परंतु ज्या मुलांच्या मनावर चांगले संस्कार झालेले नसतात, किंवा चांगले संस्कार होऊनहि रुजलेले नसतात त्या मुलांना हा मोहाचा क्षण टाळणें अत्यंत कठीण जातें. हा मोह टाळण्याकरितां लागणारी मदत मुलांचे मित्र, शिक्षक, आप्त व आईबाप ह्यांच्याकडून मिळायची असते व त्यांतहि आई-बापांनीं केलेल्या संस्काराचा परिणाम अधिक असतो. बाहेरील कोणत्याहि घटकापेक्षां घराचा व तेथील कुटुंबियांचा परिणाम मुलांवर ज्यास्त होतो व म्हणून अशा मुलांच्या बाबतींत सर्वांत जास्त जबाबदारी आई-बापांच्यावर पडते. धाडसी कामें करावींत, दुसऱ्याची वस्तु आपल्याला मिळावी, जरा गंमत करावी, शाळेपेक्षां कांहीं तरी चांगला उद्योग बाहेर बघावा, अशासारख्या इच्छा व आकांक्षेनें प्रेरित होऊन एखादा मुलगा गुन्ह्या-

कडे वळत असतो. आणि चांगल्या इच्छेंतून वाढणाऱ्या या उन्मार्गी वृत्तीमागें कायद्याबाबत उपेक्षेची वृत्ति असते. ही वृत्ति मुलांच्यामध्यें जन्मजात नसून मुलें तीं आईबापांच्याकडून व भोंवतालच्या परिस्थितींतून शिकतात. जर आईबाप स्वतः, मुलाच्या मनांत कायद्याविषयीं, सामाजिक संकेताविषयीं योग्य आदर निर्माण करतील तर असा अनवस्था प्रसंग ओढवणारच नाहीं.

उन्मार्गी मुलांच्या मनोविश्लेषणापासून व त्यांच्या उपचार-पद्धतीमधून असें स्पष्ट दिसतें कीं त्यामध्यें संस्काराला व मुलांच्या श्रद्धेला अतिशय महत्त्वाचें स्थान आहे. मुलाच्या मनावर संस्कार करायला आवश्यक असणारी जीवनमूल्यासंबंधीं निष्ठा व श्रद्धा आईबापांना नसेल तर मुलांच्या वाढीमध्यें एक फार मोठी उणीव राहिली असें होईल. पुष्कळ आईबापांना आजकाल ईश्वराविषयीं श्रद्धा निर्माण करणें कमीपणाचें वाटतें. परंतु ईश्वर नको असेल तर तशाच पद्धतीची दुसरी कोणती तरी जीवन-निष्ठा आईबापांनीं मुलाला दिली पाहिजे. अशी कोणती तरी जीवनाचीं मूल्यें मुलांना द्यायला हवींत कीं ज्यांच्या आधारावर व श्रद्धेवर मुलांना जगतां येईल. पुष्कळदां असें आढळतें कीं ज्या आईबापांचा कशावरहि विश्वास नाहीं त्यांच्या मुलांच्या मनांत व जीं मुलें लहानपणापासून एखाद्या संस्थेमध्यें वाढलेलीं असतात त्या मुलांच्या मनात एक प्रकारची पोकळी निर्माण झालेली असते.एखादी वाईट गोष्ट करतांना ज्या मुलांच्या मनावर संस्कार झालेले नाहींत, किंवा ज्या मुलांना आईबापांनीं श्रद्धा दिलेली नाहीं, त्या मुलांना कचरायचें किंवा पुन्हा विचार करण्याचें कारणच उरत नाहीं. ह्याच्या उलट ज्या मुलांच्या मनावर सुसंस्कार झालेले आहेत तीं मुलें वाईट गोष्ट करतांना क्षणभर विचार केल्याशिवाय राहात नाहींत असें दिसतें.

मुलाचें मन हें अत्यंत संस्कारक्षम असल्याकारणानें त्याच्या मनावर पूर्वी उल्लेखिलेल्या अनेक घटनांचा परिणाम होऊन त्यांच्या उन्मार्गीपणाचा उद्रेक होतो. त्याच्या सुप्त मनामध्यें राहिलेल्या इच्छा व जागृत मनामध्यें असलेले संस्कार व सामाजिक बंधनें ह्यांच्या द्वंद्वामध्यें मुलगा हतबल होऊन एखादा गुन्हा करतो. तो मुलगा वेळींच वांचवावा म्हणून त्याला मुलांच्या कोर्टापुढें आणण्यांत येतें. मुलांच्या कोर्टामध्यें, कोर्ट मुलाकडे पालक या नात्यानें पाहून

मुलाची संपूर्ण चौकशी करिते. मुलांच्या कोर्टामध्यें सामान्य कोर्टाच्या वातावरणाचा लवलेशसुद्धां नसतो. त्यांतील मुख्य फरक खालीलप्रमाणें:—

| मोठ्या माणसांचें कोर्ट | मुलांचें कोर्ट |
|---|---|
| १ तक्रार ( गुन्हेगाराविरुद्ध ) | अर्ज ( गुन्हेगाराच्या वतीनें ) |
| २ पकड वारंट | समन्स ( बोलावणें ) |
| ३ खटला | चौकशी |
| ४ शिक्षा | शिक्षण |

वरील गोष्टीवरून ह्या दोन कोर्टामागील मूलभूत कल्पनांमध्यें केवढा फरक आहे हें लक्षांत येतें. 'प्रोबेशन ऑफिसर' च्या कुशल मदतीनें मुलाच्या अडचणीची पूर्ण छाननी करून मुलाचें घर चांगलें असेल व आईबाप सहकार्य करीत असतील तर मुलाला घरीं पाठविण्यांत येतें. मुलाला घरदार नसेल तर त्याला संमत शाळेमध्यें अगर तत्सम संस्थेंत पाठविण्यांत येतें.

आज आपल्या राज्यांत घडणाऱ्या गुन्ह्यांची संख्या पाहिली तर ती संख्या फार मोठ्या प्रमाणावर वाढलेली दिसते. ह्याला कारणें दोन असूं शकतात. ( १ ) गुन्हे सांपडण्याचें प्रमाण वाढलें असेल. ( २ ) कायद्याच्या दृष्टीनें गुन्ह्यांची संख्या वाढली असेल. म्हणजे नवीन होणाऱ्या कायद्याबरोबर नवीन नवीन गुन्हे मोजले जाऊं लागले. वस्तुतः एखादी वागणूक ही गुन्हेगारीची आहे किंवा नाहीं हें त्याच्या हेतूवरून ठरवावयाला पाहिजे. परंतु तसें न होतां आजकाल गुन्हा ही तांत्रिक गोष्ट होऊन बसली आहे. म्हणून वाढते गुन्हे व गुन्हा प्रतिबंध-कार्य ह्यांचे परस्पर संबंध प्रस्थापित करणें अवघड झालेलें आहे. परंतु एक सत्य मात्र सर्व कार्यकर्त्यांनीं ध्यानांत ठेवायला पाहिजे कीं, पुढें होणारे गुन्हेगार वांचवावयाचे असतील तर आज उन्मार्गी असणाऱ्या मुलांना वांचविलें पाहिजे.

❋ ❋ ❋

: ६ :

# मुलांचा कायदा ( इतिहास )

आपल्या घरांत वागतांना सुद्धां आपण एकमेकांच्या सोयीकरितां कांहीं संकेत मानीत असतों, वेळच्या वेळीं जेवणें, एकमेकांच्या सोयीनें वागणें-घरच्या वृद्धांची काळजी. इ. इ. आर्थिक जबाबदारीसारख्या गोष्टी सुरळीत चालाव्या म्हणून घरांत वागण्याचे हे संकेत सर्वांनीं मानावयाचे असतात. जी गोष्ट आपल्या घराची, कुटुंबाची, तीच गोष्ट समाजाची आहे. समाजाच्या प्राथमिक अवस्थेंत कायदे असण्याचें कारणच नव्हतें, कारण त्या वेळीं जीवनाला स्थैर्य नव्हतें. आज इथें, उद्यां तिथें, अशा अवस्थेंत माणसें होतीं. भूक लागली कीं खावें, झोंप आली कीं झोपावें, राग आला कीं मारावें, जो सशक्त आहे त्यानें मारावें, अशक्त आहे त्यानें मार खावा ही समाजाची व्यवस्था होती. पण डोंगर उताराला कोठें तरी पाण्याच्या आसपास कायम वस्ती केल्यानंतर कामाची वांटणी करण्यांत आली. पुरुषानें शिकार करावी, घर स्त्रीनें सांभाळावें. घराची अधिष्ठात्री स्त्री असावी. कामाची वांटणी व कुटुंबव्यवस्था निर्माण झाल्यावर माणसाला थोडेसें स्वास्थ्य मिळालें. तो अधिक सुखाकरितां विचार करूं लागला. खायची वस्तु दिसल्यावर आदिमानव त्याच्यावर स्वतःच झडप घालीत असेल. पण लौकरच त्याला कळलें कीं उंच फळ असेल तर तें

तोडण्याकरितां आपण वर चढण्याचें कारण नाहीं. आपण दगड मारला म्हणजे फळ पडतें. यांतून धनुष्य–बाण आले, भाला आला. दगड फरफटत नेला तर श्रम जास्त लागतात, वेळ जास्त लागतो. तो गडगडत गेला तर लौकर जातो. यावरून चाकाची कल्पना सुचली असेल; पण ज्या महाभागानें चाक शोधून काढलें, अग्नि शोधून काढला, फेकायची युक्ति शोधली त्यानें मानवी जीवनांत क्रांति केली. या महान् शोधामुळें माणसाचें सुखस्वास्थ्य व समृद्धि वाढली व बाहेरच्या व्यापांतून मानव मोकळा होऊन समाजाची रचना नीट करण्याकडे लक्ष घालूं लागला. कुटुंबसंस्था निर्माण होतांच, आपलेपणाची भावना आली, जबाबदारीची जाणीव जागृत झाली व समाजाच्या स्थैर्याकरितां व विकासाकरितां कांहीं संकेत निर्माण झाले. वर्णव्यवस्था, नीतिनियम, कुटुंबपद्धति, उत्पादनपद्धति, राजा, ह्या कल्पनांमधून समाज संघटित होऊं लागला.

सामाजिक व्यवस्थेचे जे महत्त्वाचे संकेत होते, निर्णय होते त्यांवर शास्त्ररचना करण्यांत आली. मनूनें ह्याचें तपशीलवार विवेचन केलें आहे. लिखित संकेतांना लवकरच कायद्याचें स्वरूप आलें, व जे अलिखित संकेत होते ते शिष्टाचार, सभ्याचार, परंपरा ह्या नांवानें राहिले.

या सर्व लिखित किंवा अलिखित संकेतांमधून सामाजिक न्यायाच्या कल्पनेचें बीजारोपण झालें, ‘समाजानें मला ज्या तऱ्हेनें वागवावें अशी मी अपेक्षा करतों त्याच तऱ्हेनें मीं इतरांना वागवावें’ ही भावना सामाजिक न्यायाच्या मागें आहे. भारताच्या सांस्कृतिक जीवनाला ज्याप्रमाणें हिमाचलासारखी भव्य व तेजस्वी अशी तत्त्वज्ञानाची बैठक आहे, त्याचप्रमाणें ह्या सामाजिक न्यायाच्या, कल्पनेमागें आत्मौपम्याच्या तत्त्वज्ञानाची बैठक आहे. अहिंसा,दानपद्धति व कर्मयोग ह्या दृष्टिकोनांतून भारतीय संस्कृतीकडे पाहिल्यास सामाजिक न्यायाचें स्वरूप स्पष्ट होईल. पतित, परित्यक्ता, अनाथ व अपंग ह्या प्रश्नांची जाणीव फार पूर्वीपासून भारतांत निर्माण झालेली आहे.

छांदोग्य उपनिषदामध्यें सत्यकाम जाबालाची गोष्ट आलेली आहे. गुरूकडे गेल्यानंतर गुरूनें बापाचें नांव विचारलें आणि तें तर सांगतां येईना.पण शेवटीं आईनें त्याचें समाधान केलें,गुरूनें त्याला शिष्य मानलें व तो पुढें मोठा ऋषी म्हणून प्रसिद्धीस आला. महाभारतांतील कर्णाचें उदाहरण सुद्धां प्रसिद्ध आहे.

'दैवायत्तं कुले जन्म मदायत्तं तु पौरुषम्' असें म्हणणाऱ्या मानधन कर्णाचा बेवारशी म्हणून कित्येक ठिकाणीं उपहास करण्यांत आला आहे. पण तो कर्णाचा दोष आहे का ? सूर्यापासून पुत्र प्राप्त होतांच कुंतीनें त्याला नदींत सोडलें. आजच्या कुमारी माता त्यांना अनाथाश्रमांत सोडतात. येथें कुमारी मातेच्या प्रश्नाची चर्चा करावयाची नाहीं, पण प्रश्न असा विचारावासा वाटतो कीं त्या निरागस मुलांनीं काय अपराध केला आहे कीं त्यांना जन्मभर 'बेवारशी' म्हणून हिणवलें जावें ? रामायणाची थोर नायिका सीता, जनकराजाला शेतांत सांपडली व त्यानें तिचें पालनपोषण केलें. पुढें सीतेच्या आयुष्यांत सर्व स्थिरस्थावर झाल्यानंतर सुद्धां केवळ एका धोब्याला शंका आली म्हणून तिचा त्याग करण्यांत आला. संस्कृत भाषेचें भूषण असणाऱ्या शाकुंतलामध्यें हाच प्रश्न आहे. दुष्यन्ताची स्मृति जाणें, बाल भरताची ओळख न राहणें व त्याला शकुंतलेचें प्रेम न समजणें हा सर्वकालीन प्रश्न आहे. उत्तानपाद राजाला दोन बायकांच्यामध्यें चाललेल्या भांडणांत पडावें लागतें व ध्रुवाला प्रत्यक्ष पित्याच्या मांडीवर जागा मिळत नाहीं. मुलांच्या दृष्टीनें जी अत्यंत प्रेमाची जागा ती जर ध्रुवाला मिळाली नाहीं तर त्यानें काय करावें ? ध्रुव रानांत परमेश्वराची प्रार्थना करायला गेला. त्याची प्रार्थना ही होती कीं "मला अशी सुरक्षित व प्रेमाची जागा दे कीं जेथून कोणीहि उठविणार नाहीं." ह्या कथेमध्यें मुलांच्या आयुष्यांत जें प्रेमाला व सुरक्षिततेला स्थान आहे त्याचें सुंदर विवरण आलें आहे. ह्या तर पुराणांतरींच्या गोष्टी झाल्या. तेराव्या शतकांतली ज्ञानेश्वराची कथा तर सर्वपरिचित आहे. वडिलांनीं एकदा संन्यास घेतला व पुन्हां संसारांत पडले. पण त्यामुळें निवृत्ति, ज्ञानदेव, सोपाना आणि मुक्ता ह्या अर्भकांना समाजांत आसरा उरला नाहीं. त्यांना वाळींत टाकण्यांत आलें. ज्ञानेश्वरांना कोणत्या यातनांतून जावें लागलें हें सुप्रसिद्धच आहे.

वरील सर्व उदाहरणें देण्याचा हेतु हाच कीं जगांत मानवी स्वभावामध्यें जे दोष आढळतात ते सर्वत्र सारखेच आहेच. त्या दोषांचा आविष्कार कोणत्या पद्धतीनें होतो हें स्थलकालसापेक्षतेनें पाहतां येतें. परंतु ह्यामुळें निर्माण होणाऱ्या प्रश्नांची सोडवणूक करण्यासाठीं समाजानें वेळोवेळीं कोणते उपाय अवलंबिले हें पाहायला हवें.

भारतीय संस्कृतीमध्यें पुत्राला फार महत्त्वाचें स्थान आहे. खुद्द 'पुत्र' ह्या शब्दाची फोडसुद्धां 'पुत' नांवाच्या नरकापासून जो पितरांना वांचवतो तो, अशी आहे. ह्यामुळें पुत्रेच्छेचा उल्लेख पुरातन कालापासून सांपडतो. शुक्ल–यजुर्वेदांत असे उल्लेख आहेत (८ : १) स्मृतिकालांतहि मुलांच्याबाबत काय व्यवस्था असावी याबद्दल भरपूर उल्लेख आहेत. कौटिल्याच्या अर्थशास्त्रांत स्त्रिया व मुलें यांचा त्याग करणाराला शिक्षा सांगण्यांत आलेली आहे. हिंदु न्यायशास्त्राप्रमाणेंहि मुलांची विक्री, किंवा दान करण्याचा अधिकार खुद्द आईबापांनाहि नाहीं (मनु ९ : १९०). खिस्ताब्दापूर्वी ३२१ ते २९१ या काळांत झालेलें कौटिल्याचें अर्थशास्त्र हें राजनीतिवरचें सर्वांत जुनें पुस्तक आहे. त्यांत तर गरजू मुलांच्याबाबत स्पष्ट आज्ञा असून त्याच्या पालनपोषणाची व्यवस्था कशी व कोणीं करायची ह्याचेंहि विवेचन केलेलें आहे. "राजानें अनाथ, वृद्ध, पांगळे, वगैरे लोकांचा प्रतिपाळ करावा, अनाथ व गर्भवती स्त्रियांच्या पोषणाची व त्यांना होणाऱ्या मुलांच्या पालनाची व्यवस्था करावी. खेड्यांतील वयस्क मंडळींनीं उघड्या पडलेल्या अनाथ मुलांच्या मिळकतीची व्यवस्था करावी व तीं मुलें वयांत येतांच ती मिळकत त्यांच्या ताब्यांत द्यावी." (अर्थशास्त्र) ह्यावरून पूर्वी सुद्धा अनाथ–अपंगाबाबत काय सामाजिक जबाबदारी आहे हें विचारवंतांच्या लक्षांत आलें होतें असें म्हणण्याजोगा पुरावा उपलब्ध आहे. "ह्या अनाथ मुलांना सरकारला पोसावेंच लागतें तेव्हां त्यांस गुप्तचराचें काम द्यावें', असाहि उल्लेख कौटिल्यांत आहे. यातील पोसावेंच लागतें हे शब्द लक्षांत घेण्यासारखे आहेत."(श्री. द. वि. कुलकर्णी–अप्रकाशित प्रबंध कोलंबिया विश्वविद्यालय)बृहस्पतीनें 'समूहाच्या' कार्याचें विवेचन केलें आहे. त्यांत अनाथांच्या पोषणाचा उल्लेख आहेच. याज्ञवल्क्य स्मृतीचा ख्यातनाम टीकाकार विज्ञानेश्वर ह्यानें म्हटलें आहे कीं स्त्रिया व वृद्ध यांना इतरांच्या मानानें कमी शिक्षा (प्रायश्चित्त) असावी, व ज्यांच्यावर संस्कार झाले नाहींत अशा मुलांना एक चतुर्थांश शिक्षा (मोचन) असावी. शंखस्मृतीमध्यें तर "अगदीं लहान वयाचीं मुलें पाप करीत नाहींत आणि त्यामुळें त्यांच्या चुकांबद्दल तीं मुलें जबाबदार आहेत असें मानतां येणार नाहीं. आणि म्हणून राजानें त्यांना शिक्षा देऊं नये" असें म्हटलें आहे (अंगिरस : २४३).

मुलांना वेगळ्या तऱ्हेनें वागवावें ही कल्पना पाश्चात्य देशांत अलीकडे मानण्यांत आली आहे. कित्येक शतकेंपर्यंत तेथें मुलांना, मोठ्या माणसा-प्रमाणेंच शिक्षा दिल्या जात होत्या. न्यायसभेपुढें मुलें वेगळीं मानलीं जात नसत. याच्या उलट भारतीय न्यायपद्धतीमध्यें मुलांनाच वेगळें वागवावें असें नाहीं, तर स्त्रिया व वृद्ध यांनाहि वेगळें वागवावें असें प्रतिपादन करण्यांत आलें आहे.

अर्थात् मुलींच्या बाबतींत हिंदुधर्मशास्त्रानें समत्व–बुद्धि राखलेली नाहीं हें मानलें पाहिजे. तीच गोष्ट शूद्रांची आहे. एकलव्याची कथा या दृष्टीनें पाहण्याजोगी आहे. बालहत्याहि क्वचित्प्रसंगीं होत असे. इतिहासकालांतहि इमारती वगैरे टिकाव्या, त्यांचा पाया स्थिर राहावा, वास्तूला शांत ठेवावें म्हणून पायांत मुलें घातल्याचीं उदाहरणें सांपडतात. परंतु ही गोष्ट अनेक देशांत सांपडते. स्पार्टामध्यें अशी चाल होती कीं वेदीपुढें मुलांना परीक्षे-करितां चाबकानें मारावें. बेवारशी मुलांना गर्भपातानें मारण्याच्या संबंधींचा उल्लेख झेंदावेस्तामध्यें सांपडतो. अरब लोकांतहि ही चाल होती. परंतु भारतांत हीं उदाहरणें क्वचित् सांपडणारीं आहेत. मुलींच्या बाबतींत मात्र न्याय झाला आहे असें वाटत नाहीं. आजसुद्धां कर्नाटकांत चालू असणारी देवदासीची चाल, महाराष्ट्रांतील मुरळीची प्रथा व तत्संबंधीचे मल्हार वाङ्मयांतील या दृष्टीनें उल्लेख पाहण्याजोगे आहेत.

लिखित संकेतांना कायद्याचें स्वरूप आलें म्हणून त्यांचा व परंपरेच्या दृष्टीनें आणखी कांहीं अलिखित संकेतांचा विचार ह्याच संदर्भांत करायला हवा.

सर्वसाधारणपणें कुटुंबाचें आशास्थान म्हणजे मुलगा. स्मृतिकालांत मुलाच्या हक्काबाबत, पितापुत्रसंबंधाबाबत वारंवार उल्लेख येतात, तेव्हां त्या दृष्टीनें स्मृतिकालीन संकेतांची पाहणी करायला हवी. याज्ञवल्क्यानें पुत्राचे बारा प्रकार सांगितलेले असून त्या प्रकारांतच कानीन ( कौमार्यावस्थेंत झालेला मुलगा ), क्रीत ( विकत घेतलेला मुलगा ), क्षेत्रज ( नियुक्त माणसाकडून भार्येस झालेला मुलगा ), व सर्वांत महत्त्वाच्या अशा अपविद्ध ( ज्या मुलाचा मातापित्यानें त्याग केलेला आहे व ज्याचा आपण स्वीकार केलेला आहे असा मुलगा ) मुलांचा समावेश करण्यांत आला आहे. धृतराष्ट्र व पंडु हे क्षेत्रज पुत्र होते हें सर्वश्रुतच आहे. परदेशांत विशेषतः अमेरिकेमध्यें 'फोस्टर होम्स'

नांवाची संस्था वाढूं लागली आहे. ह्या फोस्टर होमचा अर्थ हा, कीं आई-बापांनीं टाकलेलीं पोरकीं व अनाथ मुलें चांगल्या घरांतून वाढवावीं. अपविद्ध पुत्र व फोस्टर होममध्यें वाढवलीं जाणारीं मुलें यांची तुलना अभ्यसनीय आहे.

ज्या माणसांचें पोषण करणें ही आवश्यक गोष्ट आहे अशा लोकांना पोष्यवर्ग म्हणण्यांत येतें. दायभागावरील श्रीकृष्णाच्या टीकेमध्यें एक श्लोक दिलेला आहे. ह्या श्लोकांत पोष्यवर्गांत कोणकोणते लोक येतात याचें विवेचन आहे. तो श्लोक असाः—

पिता माता गुरुर्भार्या प्रजादीनः समाश्रितः ।
अभ्यागतोऽतिथिश्चैव पोष्यवर्ग उदाहृतः ।। ( मनु )

( पोष्यवर्गांत वडील, आई, गुरु, पत्नी, संतति, आपल्यावर अवलंबून असणारे दीन लोक, पाहुणे हे येतात. ) ह्याचाच एक परिपाक म्हणून कोणाचा त्याग करूं नये हेंहि मनुस्मृतींत सांगितलेलें आहे.

न माता न पिता न स्त्री न पुत्रस्त्यागमर्हति ।
त्यजन्नपतितान् एतान् राज्ञा दण्डयः शतानि षट् ।।

( आईबाप, बायको अथवा मुलगा यांचा त्याग करूं नये. हे पतित असतांना यांचा जो त्याग करील त्याला सहाशें पण ( तत्कालीन नाणें ) दंड करावा.) कांहीं लोकांना विशिष्ट दोषांमुळें वांटणी मागण्याचा अधिकार असत नाहीं व त्या वांटणीऐवजीं त्यांना पोटगी मिळते. याबाबतींत याज्ञवल्क्य स्मृतीमध्यें असें म्हटलें आहेः—

क्लीबोऽथ पतितस्तज्जः पङ्गुरुन्मत्तकोऽजडः ।
अन्धोऽचिकित्स्य रोगाद्याः भर्तव्या स्युर्निरंशकः ।ः
औरसाः क्षेत्रजास्तेषां निर्दोषा भागहारिणः ।
सुताश्चैषां प्रभर्तव्या यावद्वै भर्तृसात्कृताः ।।

( याज्ञवल्क्य : १४०, ४१ )

( " षंढ, पतित, त्याचा मुलगा पांगळा, मूर्ख, वेडा, अंधळा व बरा न होणाऱ्या रोगांनीं ग्रासलेल्या अशासारख्या लोकांना वांटणी मिळत नाहीं पण पोटगी मिळते. यांचे औरस अथवा क्षेत्रज मुलगे दोषरहित असतील

तर त्यांना वांटणी मिळूं शकेल. यांच्या मुली जोंपर्यंत अविवाहित आहेत, तोंपर्यंत त्यांचें पोषण केलें पाहिजे." (स्मृतिकालीन कायदा–राम केशव रानडे)

ह्याच्या उलट स्पार्टामध्यें असलेल्या, अपंग मुलांची पंचांनीं चौकशी करून त्यांची विल्हेवाट लावण्याचा उल्लेख पूर्वी आलाच आहे. तीच कथा अथेन्समधील 'सोलन' च्या कायद्यांची आहे. रोममध्यें रोम्यूलसनें केलेले कायदे अशाच तऱ्हेचे आहेत. असें सांगतात कीं "लहान टोपल्यांत घालून अपंग मुलांना तैबर नदीच्या प्रवाहांत सोडण्याची रोमन राज्यांत चाल होती." (डॉ. रॉय–– "सामाजिक जबाबदारी" इंग्रजी पुस्तिका). परंतु हा दृष्टिकोन बदलत जात असल्याचीं चिन्हें जुना करार (Oed Testament), हिब्रू वाङ्मय वगैरेमध्यें दिसतात. आपस्तंभानेंहि अशा लोकांना करमाफी द्यावी असें सुचविलें आहे.

ह्या सर्व विचारविकसनांतून भूतकालाचा मागोवा घेत गेलों तर दोन मुख्य विचारप्रवाह त्यांत प्रकट झालेले दिसतात. एक विचारप्रवाह असा कीं अपंग, वृद्ध, स्त्रिया व मुलें ह्यांना न्यायदानपद्धतीमध्यें वेगळी वागणूक (Differential treatment) मिळावी. एकाच गुन्ह्याकरितां वयांत आलेला मनुष्य व निरागस मूल ह्याला एकच शिक्षा असूं नये. ह्यांतूनच पुढें मुलांचीं वेगळीं न्यायालयें असावीं हा विचार निघाला. दुसरा विचार-प्रवाह असा कीं अपंग, दीन मुलें हीं समाजाच्या दयेवर वाढावीं, त्यांना टाकून देऊं नये. परंतु लोकशाहीच्या बरोबरच दयेऐवजीं कर्तव्याची भूमिका आली व ह्या मुलांचें रक्षण हें समाजाचें, शासनसंस्थेचें कर्तव्य आहे, ती दया नव्हे अशी जाणीव निर्माण होऊं लागली. ह्यांतूनच पुढे राष्ट्रीय विमा (Social Security) व तत्सम कल्पना वाढीस लागल्या. ह्या मुलांच्या पोषणाचा विचार केला तर असें दिसतें कीं हिंदु कायद्याप्रमाणें पोटगीची जबाबदारी दोन प्रकारची आहे. "पहिल्या प्रकारची नात्यावर अवलंबून असून दुसऱ्या प्रकारची मिळकत ताब्यांत आहे किंवा नाहीं यावर अवलंबून आहे ......उदा० वामन व त्याचा चुलता वासुदेव हे समाईक आहेत. वामन जन्मजात वेडा असल्यानें समाईक मिळकतींत त्याला वांटणी मागण्याचा अधिकार नाहीं. पण कायदा असें सांगतो कीं "वांटणीचे ऐवजीं अशा लोकांना पोटगी मिळण्याचा हक्क असे" (स्मृतिकालीन कायदा–श्री. रा. के.

रानडे ) एके ठिकाणीं मनूनें पोष्यवर्ग, किंवा ज्यांच्या पोषणाची जबाबदारी आपल्यावर आहे त्यांत गरीब अथवा दीन यांचा समावेश केलेला आहे. मनु म्हणतोः—

वृद्धौ च मातापितरौ साध्वी भार्या सुतः शिशुः ।
अप्यकार्यशतं कृत्वा भर्तव्या मनुरब्रवीत् ॥

(वृद्ध आईबाप, साध्वी स्त्री, अज्ञान मूल ह्यांचें करूं नये त्या शंभर गोष्टी करून पोषण केलें पाहिजे. ) दासीपुत्र असणें हा त्या दासीपुत्राचा खास दोष नव्हे, म्हणून दासीपुत्राच्या पोषणाची व्यवस्था व्हावी असें सांगतात. कांहीं दोषांमुळें ( अंधळेपणा, मुकेपणा, वेड, उन्मार्गीपणा ) एखाद्यास जर वांटणी मिळत नसेल तर त्याला पोटगीचा व पोषण मागण्याचा हक्क जरूर आहे."

पूर्वी जेव्हां माणसाची किंमत त्याच्या आर्थिक उत्पादनशक्तीवर, लष्करी सामर्थ्यावर मोजली जात असे त्या वेळीं नवा दृष्टिकोन स्वीकारून अनाथ व अपंगांना आधार देणें ही खरोखरच महत्त्वाची गोष्ट होती. अथेन्समध्यें अंधळ्या मुलांना मातीच्या रांजणांत ठेवून आडवाटेला ठेवण्यांत येत असे. "आश्चर्याचा गोष्ट ही कीं प्लेटो,अरिस्टॉटल ह्यांसारख्या तत्त्ववेत्यांनीं ह्या प्रकारांना तात्त्विक पाठिंबा दिला. प्लेटोच्या आदर्श राज्यव्यवस्थेंत ह्या अनाथ अपंगांना स्थानच नाहीं. म्हणूनच अंधळ्या—पांगळ्यांना प्लेटोचें राज्य अस्तित्वांत न आल्याबद्दल आनंद होत असावा." (डॉ. सुबोधचंद्र रॉय : अंध सामाजिक शक्ति कीं जबाबदारी ?) रोममध्येंहि दृष्टिहीन मुलांची अवस्था करुणास्पद होती. क्वचित् त्यांना नदींत सोडण्यांत येत असे.सुमात्रामधील कांहीं जातींमध्यें अंध व अपंग मातापित्यांना जाळण्याची आज्ञा पुत्रांना दिलेली असे. हिब्रू लोकांमध्यें मात्र मुलांना परमेश्वराची देणगी समजण्यांत येत असे व अशा अनाथ मुलांची क्रूर तऱ्हेनें विल्हेवाट लावणें हें पापच समजलें जाई. परंतु दिवसें-दिवस युरोपीय देशांतील लोकांचा दृष्टिकोन बदलत गेला. त्याच्या खुणा जागोजाग दिसतात. "तूं बहिऱ्यांना शिव्याशाप देऊं नयेस, किंवा अंधळ्याच्या रस्त्यांत दगड आणून ठेवूं नयेस. उलट परमेश्वराच्या ठायीं आदर व पापाचरणाची भीति बाळगावी. मी तुझा ईश्वर आहे." (जुना करार प्र. १९, श्लोक १४ ). हिब्रू व हिंदु वाङ्मयामध्यें अनाथ व अपंगांना योग्य रीतीनें

वागण्याविषयीं वारंवार सांगितलेलें आढळतें. ह्याबाबत अनेक फुटकळ उतारे कौटिल्य, मनु, आपस्तंभ वगैरे शास्त्रकारांचे सांपडतात.

न्यायदेवतेची मूर्ति नेहमीं अंधळी दाखविली जाते व तिच्या हातांत तराजू दिलेला असतो. ह्यामागें कल्पना अशी असावी कीं न्यायदेवतेपुढें सर्व सारखे आहेत व अपराध व शिक्षा यांचें प्रमाण सारखें आहे. परंतु गुन्हा करतांना, आपण काय करतों, ह्या कृत्याचे परिणाम काय होतील ह्याची कल्पना नसणाऱ्या निरागस मुलांना जर मोठ्या माणसाप्रमाणें शिक्षा देण्यांत येणार असेल तर तो ढळढळीत अन्याय होईल. हा अन्याय अंधळेपणानें पचविण्याकरितां जर न्यायदेवतेनें डोळे मिटले असतील तर ह्या अन्यायविरुद्ध ठामपणानें उभें राहून आपल्याला न्यायदेवतेचे डोळे उघडावे लागतील.

वेदकाल, स्मृतिकाल ह्यांमध्यें ह्या मुलांच्याकरितां काय काय करण्यांत आलें ह्याचीं उदाहरणें मागें पाहिलींच आहेत. महाभारतांतहि अशा तऱ्हेचीं उदाहरणें सांपडतात. वनपर्वामध्यें (प्र. ४ थें) नारदानें युधिष्ठिराला विचारलें आहे कीं, ' हे राजा, तूं तुझ्या अंधळ्या, मुक्या, अपंग व अनाथ प्रजेला पित्याची वागणूक देतोस काय ? " त्यानंतरचीं कांहीं शतकें पाहिलीं तरीहि या तऱ्हेची शिकवणूक आढळते. इस्लाम धर्मातहि अपंगाचें रक्षण महत्त्वाचें मानलें आहे. हादीज ( प्रेषिताचीं वचनें ) मध्यें म्हटलें आहे कीं काम करण्याची शक्ति असतांना भिक्षा मागणें हा अपराध आहे. परंतु अनाथाला मदत हें कर्तव्य आहे. १६ व्या १७ व्या शतकांत संत-वाङ्मयामध्यें, अनाथ–अपंगांच्या बाबत अनेक उल्लेख सांपडतात. पेशवे दप्तरांतहि असे उतारे सांपडतात. अज्ञान मुलाच्या रक्षणाची व पोषणाची जबाबदारी त्याच्या चुलत्यावर घातल्याचें उदाहरण सांपडतें. बावडा दप्तर (पत्र ९७ वें) मध्येंहि अंधळे, मुके व अनाथ मुलें ह्यांच्या पोषणाची जबाबदारी राजावर कशी आहे तें विशद केलें आहे. परंतु इंग्रजी राजसत्तेचें स्थान बळकट होतांच भारताचें राज्ययंत्र एकतंत्री होऊं लागलें. साऱ्या देशाचा कारभार एका धोरणानें होऊं लागला. साऱ्या प्रश्नांची सोडवणूक मध्यवर्ती सत्तेच्या सल्ल्यानें होऊं लागली. इंग्रज राज्यकर्त्यांच्या आधींच येथें आलेल्या मिशनरी लोकांनीं सहेतुक वा अहेतुकपणें सेवेच्या कल्पना रुजवल्या व सेवा-संस्था सुरू केल्या. पाश्चात्य कल्पनांवर आधारलेले कायदे होऊं लागले.

१८५० सालचा शिकाऊ कामगारांचा कायदा हा आज मिळत असलेल्या माहितीप्रमाणें मुलांना संरक्षण देणारा भारतातील पहिला कायदा आहे. ह्या कायद्यान्वयें निराश्रित व लहान गुन्हे करणाऱ्या मुलांना जामिनकीवर सोडण्याचा अधिकार दिलेला आहे. त्याचप्रमाणें 'क्रिमिनल प्रोसिजर कोड' च्या ३९९ व्या कलमाप्रमाणें,नाठाळ, हूड व अपराधी मुलांना 'बालसुधार शाळेंत' (रिफॉर्मेटरी स्कूल्स) पाठविण्याची सोय करण्यांत आलेली आहे. अर्थात् ज्या प्रांतांत अशा शाळा असतील तेथेंच हें कलम उपयोगी पडे. १८७६ सालीं बालसुधार शाळांचा कायदा करण्यांत आला. हा कायदा १८९७ सालीं नव्या स्वरूपांत संमत आला.वरील सर्व कायदे हे अखिल भारतीय स्वरूपाचे आहेत. १८९७ च्या कायद्याप्रमाणें मुंबई प्रांतांत १६ वर्षांखालील व इतरत्र १५ वर्षांखालील मुलांची व्यवस्था लावली जात असे. जिथें शक्य असेल तिथें बालसुधार शाळा काढाव्या व न्यायाधिशाला योग्य वाटल्यास त्यानें अपराधी बालगुन्हेगारांना त्या शाळांतून दोन ते सात वर्षेंपर्यंत शिक्षण व शिस्त याकरितां पाठवावें व त्याबद्दलीं तुरुंगवास माफ करावा अशी योजना होती. अशा शाळांतून जास्तींत जास्त वयाच्या१८ वर्षेंपर्यंत मुलाला ठेवतां येत असे व १४ वर्षांनंतर जर नौकरी मिळत असेल तर मुलाला परवान्यावर(लायसेन्स) सोडतां येत असे. मात्र परवान्याच्या अटी पाळल्या जातात किंवा नाहीं हें पाहण्याचें काम शाळेच्या प्रमुखाचें असे.त्या वेळीं मुलांना तुरुंगांत घालण्यापेक्षां बालसुधार शाळेंत घालणें ही फारच मोठी सुधारणा असें वाटत असे.

१९२४ सालीं मुंबई सरकारनें पहिला मुलांचा कायदा केला. हा कायदा केवळ मुंबई प्रांतापुरतांच होता. ह्या कायद्यान्वयें केवळ अपराधी व गुन्हेगार मुलांचीच व्यवस्था नव्हे तर उपेक्षित, हूड, अनाथ मुलांचीहि सोय करण्यांत आली होती. ह्यामध्यें फार मोठें परिवर्तन होतें. पूर्वी मुलांत गुन्हेगार समजून, शिक्षेच्या स्वरूपांत मात्र फरक केलेला होता. पण ह्या कायद्यामुळें उन्मार्गी मुलांना संरक्षण व उपचाराची व्यवस्था, व जी पुढें गुन्हेगार होण्याचा संभव आहे. अशा अनेक उपेक्षित व अनाथ मुलांच्याकडेहि लक्ष देण्याची सोय झालेली होती ह्याच कायाद्यान्वयें मुलांचीं वेगळीं कोर्टें, स्वीकारकेंद्रें ( रिमांड-होम्स ), संमतशाळा ( Certified Schools ) स्थापन करण्यांत आलीं. अनेक खाजगी व सरकारी संस्थांचा उपयोग मुलांच्या शिक्षणाकरितां

होऊं लागला. हा कायदा १९२७ साली मुंबई शहराला व नंतर हळू हळू इतरत्र लागू करण्यांत आला.

१९३३ सालीं बालगुन्हेगार व अनाथ मुलें ह्यांच्या प्रश्नाचा अभ्यास करण्याकरितां ' स्टार्ट कमिटी ' ह्या नांवानें ओळखली जाणारी समिति नेमली गेली. ह्या समितीनें मुलांच्या प्रश्नाचा सर्व बाजूंनीं विचार करून एक सुंदर प्रतिवृत्त सादर केलें ह्या प्रतिवृत्ताच्या आधारावरच ह्या क्षेत्रांतलें काम सरकारनें वाढविलें. ह्या समितीनें सुचविलेल्या सुधारणांमध्यें खालील सुधारणा महत्त्वाच्या होत्या.:–( १ ) मुलांना परवान्यावर सोडण्याच्या पद्धतीचा जास्तींत जास्त उपयोग करावा. ( २ ) सर्वसाधारणपणें मुलाला कमींत कमी तीन वर्षें शाळेंत पाठवावें (संमत–शाळेंमध्यें). ( ३ ) सात ते सोळा वर्षांपर्यंतच्या पोरक्या मुलांच्याकरितां वेगळ्या संस्था स्थापन कराव्या. ( ४ ) हें काम करण्याकरितां स्वतंत्र खातें निर्माण करण्यांत यावें. ( ५ ) मोठ्या माणसांच्या कोर्टांत जर मुलांची साक्ष द्यायची झाली तर ती ' खाजगी ' ( In camera ) पद्धतीनें घ्यावी. (जर मुलावर कांहीं अत्याचार झाला असेल तर त्याचा दुरुपयोग होऊं नये म्हणून,) (६) ज्या खटल्यांत मुलें व मोठीं माणसें ह्यांच्यावर एकच आरोप ठेवला असेल त्या खटल्यांत सुद्धां मुलांची केस मुलांच्या कोर्टांत चालविण्यांत यावी. ( ७ ) जेव्हां ७ तें १२ वर्षांच्या मुलावर खटला केला जाईल तेव्हां त्या अपराधाचें स्वरूप व त्याचे परिणाम ह्याची पूर्ण कल्पना त्या मुलाला आहे हें सिद्ध करण्याची जबाबदारी खटला करणारावर राहील. ( ८ ) ज्या वेळीं मुलाला अशी कल्पना नव्हती ह्या किंवा तत्सम आधारावर मुलगा निर्दोषी सुटेल, म्हणून त्याच वेळीं तो मुलगा अनाथ, उपेक्षित व गरजू आहे किंवा नाहीं हें पाहिलें जाईल व त्याप्रमाणें त्याला मदत करण्यांत येईल. ( ९ ) ' प्रस्थापित आरोपी ( Convict ), शिक्षा ( Sentence ) ह्यासारखे शब्द मुलांच्या बाबतींत वापरतां येणार नाहींत. कारण हा कायदा मुलांना संरक्षण देण्याकरितां, सुधारण्याकरितां आहे, शिक्षा देण्याकरितां नाहीं. ( १० ) मुलांच्या लहानमोठ्या सर्व अपराधांची चौकशी मुलांच्या न्यायालयापुढें व्हावी. जेथें मुलांचीं न्यायालयें नसतील तेथें तेथील न्यायाधिशानें कोर्टाखेरीज इतर जागेंत व इतर वेळीं ही चौकशी करावी. ( ११ ) मुलांच्या

कोर्टाचे न्यायाधीश, हा नवा दृष्टिकोन जाणणारे व मुलांच्या कल्याणकार्याचें ज्ञान घेतलेले असावे. ( १२ ) परप्रांतीय अनाथ मुलांचा खर्च त्या त्या प्रांतांनीं करावा. ( १३ ) मनोदुर्बल मुलांच्या शिक्षणाची व्यवस्था करण्यांत यावी. ( १४ ) अनुचिंतन संस्थेची ( After-care ) संघटना त्वरित करण्यांत यावी. ( १५ ) मुलें उन्मार्गी होऊं नयेत म्हणून क्रीडाकेंद्रें ( क्लब्स ) स्थापन करावीं.

ह्याच प्रतिवृत्तांत म्हटलें आहे—" जगाच्या पाठीवर कोठेंहि झालें तरी मानवी स्वभाव सारखाच आहे. त्यामुळें मानवाचा पुढील प्रश्न व त्याचें योग्य उत्तर ह्यामध्यें पुष्कळ देशांत साम्य दिसतें. जर एखाद्या मुलाच्या हातून बेकायदे-शीर कृत्य घडलें तर समाजाच्या स्वास्थ्याकरितां व मुलांच्या रक्षणाकरितां कायद्यानें मध्यें पडायला हवें; परंतु मुलांच्या बाबतींत शिक्षा करण्याच्या हेतूनें खास नव्हे. आम्हांला केवळ तत्त्व म्हणून नव्हे तर व्यवहार म्हणून हें मान्य करावयाचें आहे, कीं मुलानें केलेल्या गुन्ह्याचा इतिहास पाहणें व गुन्ह्याची कारणपरंपरा शोधणें हें प्रत्येक न्यायाधिशाचें कर्तव्य आहे. ' मुलाची सुधारणा ' हें कायद्यानें सांगितलेल्या शिक्षेपेक्षां महत्त्वाचें ध्येय आहे. मुंबई शहरांत व प्रांतांत इतरत्र राहणीचें मान इतकें खालावलें आहे कीं मुलांचें शील चांगलें राहणें व त्यांची योग्य वाढ होणें संभवनीय नसतें व त्यामुळें मुलांच्यांत उन्मार्गीपणा वाढतो. बेकारी व राहण्याला अपुरी जागा ह्यामुळें नैतिक मूल्यें पुष्कळदां ढासळतात. गजबजलेल्या चाळी व घरें ह्यांतील उदासवाणें वातावरण, खेळकरमणुकींचा अभाव, मोकळ्या मैदानांचा अभाव, बाजार व हॉटेलें यांतील भडक आकर्षकता व भिकारी व मवाली यांचा वाईट सहवास ह्यामुळें मुलें नको त्या रस्त्याला नेमकीं जातात. ह्या पार्श्वभूमीवर असंख्य अनाथ मुलांना जीवनाचा झगडा चालवायचा असतो. उपेक्षित मुलांचा प्रश्न साऱ्या भारतांत आढळून येतो. ' हा प्रश्न पाश्चात्य राष्ट्रांना—निदान इतक्या मोठ्या प्रमाणांत तरी—मुळींच माहीत नाहीं. म्हणून ह्या मुलांच्याकरितांहि वेगळी सोय करणें अगत्याचें झालें आहे." ...आजच्या शैक्षणिक पद्धतीचा विचार केल्यावांचून ह्या प्रश्नाचा उहापोह होऊंच शक-णार नाहीं. सक्तीचें शिक्षण नसल्यानें मुलांच्यावर नीट देखरेख होत नाहीं. याबाबत पूर्वीं उल्लेख केलाच आहे. आजचें निरुद्योगी मूल उद्यां उन्मार्गी

होण्याचा संभव असतो. आजचीं अशिक्षित मुलें उद्यां बेजबाबदार आईबाप होण्याचा संभव असतो. मुलांच्या कोर्टाच्या प्रत्येक बैठकींत हें स्पष्ट होत असतें कीं मुलांच्यावर आईबापांचें असावें तितकें लक्ष नाहीं. उन्मार्गी मुलांच्या उपचाराबाबत जागृत लोकमत नाहीं. भावनात्मक व अप्रबुद्ध वागणुकीमुळें बेबंद दानधर्माला ऊत येतो व भिक्षेची प्रवृत्ति वाढते. याचमुळें जेव्हां कडक उपायानें मूल सुधारेल असें वाटतें त्या वेळीं सहानुभूति दाखविली जाते. ह्या उन्मार्गी मुलांचा सदुपयोग कसा होईल ह्याबाबत समाजांत कसलीहि जाणीव निर्माण झालेली नाहीं. ह्या कार्याची किंमत पैशापेक्षां मानवी मूल्यांतच मोजायला हवी व ह्यामुळें उद्यांचे किती सराईत गुन्हेगार वांचवले जातील ह्याचाच विचार करायला हवा" (पृष्ठें २, १३).

ह्या प्रतिवृत्ताच्या आधारावरच 'जुवेनाईल ॲण्ड बेगर्स' ह्या खात्याचा पाया घातला गेला. ह्या खात्याला व कार्याच्या वाढीला, सुप्रसिद्ध इंग्रज समाजसेविका कु. डेव्हिस ह्यांनीं मोठाच हातभार लावलेला आहे. पहिल्याप्रथम ह्या खात्यांतून त्या खात्याकडे जात जात ह्या खात्याचा पाय 'बॅकवर्ड क्लास' खात्यांत रोवला गेला. पण तेथें असलेली मुलांच्या कामाची ही शाखा लौकरच वाढली व १९४७ सालीं तिचें एक स्वतंत्र खातें झालें. ह्या खात्याला व पूर्वी आलेल्या अनुभवाचा फायदा घेऊन १९४८ सालीं मुलांचा कायदा दुरुस्त करण्यांत आला. मात्र हा कायदा दुरुस्त करण्यापूर्वी ३ जुलै १९४५ ला एक खात्याची समिति नेमण्यांत आली. व त्या समितीनें मुलांच्या कायद्याचा खोल अभ्यास करून सुधारणा सुचविल्या. १९२४ च्या कायद्यापेक्षां १९४८ च्या कायद्यांत महत्त्वाची सुधारणा म्हणजे कायद्यांत अपराधी मुलांच्या उपचाराची व्यवस्था केली आहेच, पण अनाथ उपेक्षित कुमार्गाला बळी पडलेलीं अशा मुलांना जुवेनाईल व बेगर्स खात्यातर्फें वेगळी मदत देण्याची व्यवस्था करण्यांत आली आहे.[1]

मुंबईचा पहिला कायदा होण्यापूर्वी १९२० सालीं मद्रासमध्यें मुलांचा कायदा संमत झाला. १९२२ सालीं बंगालमध्यें मुलांचा कायदा, १९२८ मध्यें मध्यप्रांतामध्यें मुलांचा कायदा करण्यांत आला. मद्रास येथील कायदा दुरुस्त करण्याकरितां १९४९ सालीं एक तज्ज्ञांची समिति नेमली. ह्या

१. १९५३ सालीं हें खातें 'कायम' स्वरूपाचें झालें.

समितीनेंहि—गुन्हा व तत्सम शब्द गाळावे, अनुचिंतन-संस्था स्थापन करावी, अधिकाधिक गरजू मुलांना फायदा मिळण्याकरितां वयोमर्यादा विस्तृत करावी व कायद्याचा हेतु शिक्षा नसून सुधारणा असावा—अशा महत्त्वाच्या सुधारणा केल्या आहेत.

निरनिराळ्या प्रांतांतील मुलांच्या कायद्याची तुलना खालीलप्रमाणें:—

| राज्य | कायदे | कार्य |
|---|---|---|
| (१) मुंबई | १ मुंबई मुलांचा कायदा | सरकारी |
| | २ बोर्स्टल स्कूल कायदा | व |
| | ३ प्रोबेशन ऑफ ऑफेंडर्स कायदा | खासगी |
| | ( व अनेक फुटकळ कलमें ) | |
| (२) म्हैसूर | १ म्हैसूर मुलांचा कायदा | सरकारी |
| | २ म्हैसूर बोर्स्टल शाळेचा कायदा | खाजगी संस्था नाहींत |
| | ३ प्रोबेशन ऑफ ऑफेन्डर्स कायदा | सरकारी परिवीक्षाधिकारी देखरेख करतात |
| (३) मध्यप्रदेश | १ रिफॉर्मेटरी स्कूल कायदा | सरकारी |
| (४) राजपुताना | नाहीं | नाहीं |
| (५) त्रावणकोर-कोचीन | १ मुलांचा कायदा | सरकारी |
| (६) आसाम | नाहीं | नाहीं |
| (७) उत्तर प्रदेश | १ प्रोबेशन ऑफ ऑफेन्डर्स कायदा | |
| | २ बोर्स्टल स्कूल कायदा | निमसरकारी |
| (८) पंजाब | १ मुलांचा कायदा | सरकारी |
| | २ प्रोबेशन ऑफ ऑफेन्डर्स | ( लहान |
| | ३ रिफॉर्मेटरी कायदा | प्रमाणांत) |
| | ४ बोर्स्टल स्कूल कायदा | |
| (९) बिहार | नाहीं | सरकारी संमत शाळा |
| (१०) बंगाल | १ बंगाल मुलांचा कायदा | सरकारी व खासगी |
| (११) ओरिसा | स्वतंत्र कायदे नाहींत मद्रासचे दोन कायदे व हजारीबाग रिफॉर्मेटरी कोड | सरकारी |

| | | | |
|---|---|---|---|
| ( १२ ) मद्रास | १ मद्रास मुलांचा कायदा | | |
| | २ प्रोबेशन ऑफ ऑफेन्डर्स कायदा | सरकारी व खाजगी | |

( वरील तुलनात्मक आलेख श्री. द. वि. कुलकर्णी, चीफ इन्स्पेक्टर ऑफ सर्टिफाइड स्कूल्स, मुंबई राज्य यांच्या मान्यतेनें, त्यांच्या इंग्रजी लेखांतून घेतला आहे. )

भारतांतील वरील सर्व कायद्यांचा तुलनात्मक विचार करतांना मुंबई प्रांतांतील कार्य हें अग्रेसर आहे असें स्पष्ट दिसतें. आज तरी मुंबईचा १९४८ चा कायदा हा सर्वांत प्रगत कायदा आहे. ह्या कायद्यांतील तत्त्वें व त्यांत निर्माण केलेल्या सोयी ह्या अत्यंत महत्त्वाच्या व उपयुक्त आहेत. बालक-कल्याण-कार्य हें मुंबई राज्यांत अत्यंत पुढारलेलें आहे. परंतु परिवीक्षेचें कार्य-विशेषतः कौमारावस्थेंतील १६ ते २१ ह्या वयांतील मुलांच्या करितां-हें फारसें पुढारलेलें नाहीं. त्या बाबतींत ( Adult probation ) मद्रास व उत्तर प्रदेश यांचें कार्य वाखाणण्याजोगें आहे. मद्रास सरकारचा दुरुस्त कायदा अधिक प्रगतिशील आहे कारण त्यामध्यें मुंबई मुलांच्या कायद्यापेक्षां अधिक स्पष्टपणें, दंडशास्त्रीय व शासनशास्त्रीय दृष्टिकोनापेक्षां महत्त्वाचा असा मुलांच्या सुधारणेचा दृष्टिकोन मांडलेला आहे. मध्यभारतांतील कायदा व्यवहारांत पूर्णपणें आणला जात नाहीं. बंगालमध्येंहि रिफॉर्मेटरी शाळांबाबत व तेथील कार्य-पद्धतीबाबत थोडासा मागासलेलेपणा.आहे.

भारत सरकारला असें वाटलें कीं मुलांच्या उपचाराबाबत व पुनःस्थापनेबाबत सर्वत्र सारखेपणा असावा व ह्या हेतूनें भारत सरकारनें १९४९ सालीं एक शिक्षण-मंत्र्यांची परिषद बोलाविली व त्यानंतर एक तज्ज्ञांची समिति नेमण्यांत आली. ह्या समितीच्या कार्याचा हेतु एक अनुकरणीय स्वरूपाचा ( Model ) मुलांचा कायदा करावा हा होता. हा कायदा करतांना समितीनें आज असणाऱ्या सर्व कायद्यांतील गुण घेतले आहेत. त्यांत सर्व दंडशास्त्रीय ( म्ह० गुन्हा, गुन्हेगार, शिक्षा वगैरे ) शब्द टाकले आहेत. जास्तींत जास्त मुलें व कुमारांना याचा फायदा मिळावा म्हणून वयोमर्यादा २१ पर्यंत वाढविण्याचें योजलेलें आहे. शिवाय आज या क्षेत्रांत असलेलीं सर्व चांगलीं तत्त्वें घेऊन दंडशासनाचें ( Penal ) तत्त्वज्ञान टाळलें आहे. येथेंच,

जातां जातां, एका प्रश्नाचा विचार करणें अगत्याचें आहे. कांहीं लोकांना असें वाटतें कीं सर्व देशाला लागूं पडेल असा एकच मुलांचा कायदा असावा. मुलांच्या कामामधील सर्वांत महत्त्वाची गोष्ट म्हणजे मूल व परिवीक्षाधिकारी यांचे संबंध. हे संबंध ही वैयक्तिक गोष्ट आहे. प्रत्येक मुलाचे प्रश्नहि वेगळे असतात. तेव्हां अशा कामाचें नियंत्रण एका केंद्रामधून झालें तर तें दिरंगाईचें व अव्यवस्थित होईल. शिवाय तो कायदा बदलणेंहि फार कठीण होईल. कायदा ही गतिमान् संज्ञा आहे व त्या त्या कालांतील सामाजिक संकेतांचें प्रतिबिंब त्या त्या कायद्यांत पडलेलें असतें. तेव्हां संकेताबरोबरच कायदा बदलणें श्रेयस्कर पण अखिल भारतीय कायदा लौकर बदलणें कठिण होईल. अखिल भारतीय कायद्यामुळें प्रांतांना कार्याची प्रेरणा पुरेशी मिळणार नाहीं. शिवाय आज भारतांत प्रत्येक प्रांतांत गरजू मुलाला वेगवेगळी वागणूक दिली जाते. कोठें त्याला 'लहान गुन्हेगार' समजतात, तर कोठें 'परिस्थितीचा बळी' मानतात. तेव्हां या कल्पना एका पातळीवर आणून, तशा संस्था काढून, कार्यकर्ते शिकवून काम चालविणें आर्थिक व राज्यव्यवहाराच्या दृष्टीनें शक्य होणार नाहीं.

परंतु गरजू मुलांच्या बाबत कार्य करणाऱ्या प्रांतांना योग्य दिशा मिळावी म्हणून मध्यवर्ती सरकारनें कांहीं गोष्टी करणें आवश्यक आहे. ( १ ) मुलांचा अनुकरणीय ( Model ) कायदा करावा. म्हणजे त्याच्या आधारानें प्रांतांना कायदे करतां येतील. अनुकरणीय कायदा हा त्या वेळच्या अद्यावत् कल्पनांचा निदर्शक असावा व प्रत्येक प्रांतानें त्यांतून जास्तींत जास्त कल्पना आपल्या शक्यतेप्रमाणें घ्याव्या. ( सध्यां लोकसभेपुढें श्री. केशवदेव मालवीय ह्यांनीं मांडलेला व लौकरच 'क' राज्यांना लागूं होणारा 'मुलांचा कायदा' आहे.) (२) निरनिराळ्या प्रांतांतील कार्यांचें सुसूत्रीकरण करावें. उदा० मुंबई-मध्यें पकडलेल्या मद्रासच्या मुलाला शिक्षणानंतर मद्रासमध्यें परत पाठविला तर तेथें मुंबईसारखी मदतीची व्यवस्था असावी. ( ३ ) आजपर्यंत झालेल्या भारतांतील कामाचा आढावा घेऊन परिभाषा, आंकडे व माहिती जमवून त्यांचा उपयोग करावा. ह्याकरितां एखादा ब्यूरो किंवा तत्सम-संस्था निर्माण करावी. ह्या संघटनेचा संदर्भ म्हणून, मार्गदर्शक म्हणून, संशोधक म्हणून उपयोग व्हावा. अशा संघटना अमेरिका व इंग्लंडमध्यें आहेत. ह्यामुळें कामाची

पातळी उंचावण्याला मदत होईल. १९५२ सालीं भारतांतील कार्य पाहण्याकरितां आलेल्या डॉ. रेकलेस या युनायटेड नेशन्सच्या तज्ज्ञानेंहि मध्यवर्ती ब्यूरो वा तत्सम संस्था काढावी असें सुचविलें आहे. (४) शक्य तेथें "सामाजिक कल्याण" किंवा समाजसेवेचें कार्य करणारें स्वतंत्र खातें असावें.

अमेरिकेमध्यें प्रत्येक राज्याचा वेगळा कायदा असल्यानें कामामध्यें वेगवेगळेपणा निर्माण झाला आहे. त्याला मार्गदर्शन म्हणून 'स्टॅंडर्ड जुवेनाईल कोर्ट' कायदा नांवाचा कायदा करण्यांत आला आहे. त्याच्या हेतूबद्दल त्या कायद्यांत म्हटलें आहे. "ह्या कायद्याचा हेतु, त्याच्या व्यवस्थेखालीं येणाऱ्या प्रत्येक मुलाला आसरा व मार्गदर्शन देण्याकरितां, शिस्त लावण्याकरितां आहे. ही व्यवस्था शक्य तर मुलांच्याच घरीं व कुटुंबांत व तें शक्य नसेल तर घरासारख्याच वा तत्सम संस्थेंत केली जाईल. आईबापांनीं मुलांकरितां जें जें केलें असतें, तें तें सर्व; शिक्षण, काळजी, प्रेम, व्यवस्था ह्या व्यवस्थेंत सामावलें जाईल. ह्या कायद्यांत हें तत्त्व मानलेलें आहे कीं कोर्टापुढें आलेलीं मुलें हीं राज्यसरकारचीं मुलें आहेत व त्या भावनेनेंच त्यांचें रक्षण, पोषण व शिक्षण केलें जाईल." इंग्लंडमध्यें पहिला कायदा १९०८ सालीं केला गेला. तो नंतर १९३३ सालीं बदलला व १९३८ सालीं सुधारला. इंग्लंडच्या कायद्यांत अमेरिकन कायद्याप्रमाणें भावना नाहीं. कायद्यांतील दंडशासनाची वृत्ति स्त्रियांना न्यायाधीश नेमून काढण्याचा तेथें प्रयत्न केला आहे. मुलांना वेगळ्या तऱ्हेची वागणूक द्यायला हवी, बालगुन्हेगारांना वेगळें शिक्षण हवें अशी हाकाटी प्रथम फ्रान्समध्यें करण्यांत आली. पण फ्रेंच कायद्याची ह्याबाबतची प्रगति थोडी सावकाश झाली. १८९८ पासून ऑगस्ट १९५० पर्यंत ही चालूच होती. तेथें १९३१ सालीं मुलांच्या बाबतच्या कायद्याला खरें स्वरूप आलें. त्यानंतर झालेली वाढ ही युद्धकालांत निर्माण झालेल्या अडचणी लक्षांत घेऊन झालेली असल्यानें १९५० सालीं कायद्याला आलेलें स्वरूप हें पुष्कळच प्रगत आहे. बेल्जममध्यें १९१२ व झेकोस्लोव्हाकियांत १९३१ सालीं मुलांचे कायदे झाले. जर्मनीमध्यें १९२३ सालीं मुलांच्या कोर्टांचा कायदा झाला पण हिटलरच्या राजवटींत त्यांतील महत्त्वाचीं तत्त्वें उपेक्षिलीं गेलीं. ग्रीसमध्यें तर मुलांचीं कोर्टें १९४० सालीं सुरू झालीं. पोलंडमध्यें १९१९ सालींच मुलांचीं कोर्टें स्थापन झालीं. स्कॅंडेनेव्हियन देशांत विशेषत: नॉर्वेंत "अनौपचारिक कोर्टांचा" प्रयोग पुष्कळ यशस्वी

झाला आहे. रशियन भागांतहि याबाबत अगदीं नवे उपाय, प्रयोग व सुधारणा होत आहेत असें कळतें. ( पहा " सिन्स अँड सायन्स " ) पण त्याविषयीं संपूर्ण माहिती मिळत नाहीं.

फार पुरातन काळापासून मुलांना वेगळ्या तऱ्हेनें वागवावें, त्यांना संरक्षण द्यावें अशा तऱ्हेच्या कल्पना प्रचलित आहेत. पण त्यांना शास्त्रशुद्ध स्वरूप गेल्या शतकांत आलें व कमीजास्त प्रमाणांत त्या कल्पनांचा अंमल निरनिराळ्या देशांत केला गेला. कायद्यानें माणसें सुधारत नाहींत. देशांतील माणसें नीतिमान् असावीं असा कायदा करून नीति सुधारत नसते, परंतु माणसें सुधारावीं म्हणून वातावरण, सुधारण्याकरितां लागणारें मार्गदर्शन व आर्थिक व सामाजिक साह्य वगैरे करणारी यंत्रणा कायदाच निर्माण करूं शकतो. मूल कायद्यानें सुधारत नाहीं, पण त्याला सुधारण्याकरितां शाळा, मदत देणारा परिवीक्षाधिकारी, ही यंत्रणा कायदाच निर्माण करूं शकतो. कायदा हा दंड आणि शिक्षेकरितां नाहीं. समाजाचें स्वास्थ्य व माणसांच्या सुधारणेकरितां आहे. त्याचप्रमाणें हीं चुकलेलीं मुलें गुन्हेगार झालीं याला कारण परिस्थिति व समाज, हें केवळ कायदाच पटवूं शकेल. ह्या दृष्टिकोनांतून विचार केला तरच बालगुन्हेगारांच्या प्रश्नाचें खरें उत्तर सांपडेल.



: ७ :

# मुलांच्या हक्काचा जाहीरनामा

मुलांच्या कल्याणाकरितां मध्यवर्ती व राज्यसरकारांनीं केलेल्या निरनिराळ्या कायद्यांचा अभ्यास करून व सरकारी खातें व खाजगी संस्था ह्यांच्या कार्याचा अनुभव जमेला धरून १९४८ सालीं मुंबई सरकारनें नवा मुलांचा कायदा केला. ह्या कायद्याचीं सर्व कलमें पाहिलीं व त्यांतील विचारांचा आढावा घेतला तर या कार्यांत येणाऱ्या अडचणी कोणत्या व त्यांचें निराकरण या कायद्यान्वयें कशा तऱ्हेनें होईल हें लक्षांत येतें. ह्या कायद्याच्या प्रास्ताविकांतच म्हटलें आहे कीं "मुलांना व कुमारावस्थेंतील बाल-गुन्हेगारांना आसरा, संरक्षण देणाऱ्या व उपचारव्यवस्था सांगणाऱ्या आणि त्यांच्या पुन:स्थापनेची व्यवस्था करण्याकरितां व बालगुन्हेगारांच्या चौकशीकरितां करण्यांत आलेल्या सर्व कायद्यांचें एकत्रीकरण व सुधारणा करण्याच्या हेतूनें हा १९४८ चा मुलांचा कायदा करण्यांत येत आहे." ह्या कायद्याची संपूर्ण तपासणी करण्याआधीं त्याचे नजरेंत भरणारे ठळक विशेष कोणते आहेत व त्यायोगें कोणतीं नवीं तत्त्वें प्रस्थापित होत आहेत हें पाहणें इष्ट आहे. ह्या कायद्याप्रमाणें ( १ ) बालगुन्हेगारांची चौकशी मुलांच्या कोर्टातच झाली पाहिजे व जेथें जेथें मुलांचें कोर्ट आहे तेथें तेथें गुन्हेगार मूल व त्याचा वयांत आलेला साथीदार ह्यांची एकत्र चौकशी होतां कामा नये. ( २ ) न्याया-ध्यक्षांच्या खास परवानगीवांचून वकिलांना मुलांच्या कोर्टांत येतां येणार नाहीं.

( ३ ) महारोग व मनोव्यथा ह्यांना बळी पडलेल्या मुलांची व्यवस्था करण्यांत आली आहे. (४) जीं मुलें ऐकत नाहींत किंवा हूड आहेत त्यांना संमत शाळेंत न घालतां सुयोग्य अशा खाजगी संस्थेंत किंवा एखाद्या नातलग अगर पालकाकडे सोडतां येतें. ( ५ ) मुलांची पिळवणूक थांबविण्याकरितां व्यवस्था करण्यांत आली आहे. ( ६ ) मुलांची छळणूक हा गुन्हा गंभीर ठरवून गुन्हेगाराला वॉरंटाशिवाय पकडण्याची सोय केली आहे. ( ७ ) संपूर्ण खात्री झाल्याशिवाय व मूल सुरक्षित राहील ही खात्री दिल्याशिवाय मुलाला जामिनावर सोडण्यांत येत नाहीं. ( ८ ) धोकेबाज मुलांना तुरुंगांत पाठविणें हें क्वचित् व तेंहि फक्त सरकार करूं शकतें. ( ९ ) परप्रांतांतील मुलांना आपल्या प्रांतांत पाठवून त्यांच्या पुनःस्थापनेची सोय करण्यांत आली आहे. ( १० ) परिवीक्षाधिकारी ( प्रोबेशन ऑफिसर्स ) हे राज्याचे सेवक आहेत. हें मान्य केलें गेलें आहे, व सद्हेतूनें केलेल्या कोणत्याहि कृत्याबद्दल त्यांच्यावर खटला भरतां येत नाहीं असें ठरविण्यांत आलें आहे.

ह्या कायद्यामुळें कांहीं संज्ञांना विशिष्ट अर्थ प्राप्त झाला आहे. त्या संज्ञा अशा मूल (Child)=१६ वर्षांच्या आंतील मुलगा अगर मुलगी. संमत-शाळा ( Certified School ) = अनाथ व उन्मार्गी मुलांच्या शिक्षणाकरितां सरकारनें अगर खाजगी संस्थांनीं स्थापन केलेल्या शालेय शिक्षणाच्या, धंदे-शिक्षणाच्या अगर शेती-शिक्षणाच्या शाळा. सुयोग्य व्यक्ति अगर संस्था, (Fit Person Institution or Individual)= मुलांच्या संरक्षणपोषणा-करितां स्थापन झालेली व ह्या मुलांच्या योग्य शिक्षणाची जबाबदारी घेणारी कोणतीहि संस्था अगर व्यक्ति. मुलांचें कोर्ट = गरजू मुलांच्या अडचणींचा विचार करण्याकरितां स्थापिलेलें कोर्ट. सुरक्षित जागा = स्वीकार-केंद्र ( रिमांड-होम ) अगर मुलांना जेथें तात्पुरतें संरक्षित ठेवतां येईल अशी संस्था. दोन्ही नसल्यास मुलाला पोलिस ठाण्यांत इतर गुन्हेगारांपासून अलग ठेवण्यांत येतें. परिवीक्षा ( Probation )= मुलगा चांगला वागावा म्हणून स्वतःच्या जबाबदारीवर त्याला सोडल्यावर त्याच्या मार्गदर्शनार्थ किंवा त्याच्या पुनःस्थापनेकरितां केलेले प्रयत्न. देखरेख ( Supervision ) = मुलगा कोणा नातलगाच्या किंवा हितचिंतकाच्या घरीं चांगल्या वागणुकीकरितां ठेवलेला असेल त्या वेळीं केलेली देखरेख.

कायद्याच्या दुसऱ्या भागामध्यें ह्या कायद्यान्वयें जें मुलांचें कोर्ट स्थापन होतें, त्याविषयीं माहिती दिलेली आहे. समजा सरला नांवाच्या मुलीवर झालेल्या बलात्काराची चौकशी चालू आहे. अशा वेळीं खटल्याला खूप प्रेक्षक जमतील, वकील लांबलचक भाषणें करतील व वृत्तपत्रें त्या बातमीचे मोठमोठे मथळे देतील. त्या मुलीच्या मुलाखती छापतील, चित्रें देतील. पुढें त्या खटल्यांत आरोपीला शिक्षा होईलच पण ह्या खटल्यामुळें प्रसिद्धीला आलेल्या मुलीची काय स्थिति होईल, तिच्याशीं पुढें लग्नाला कोणी तयार होईल काय ! त्याचप्रमाणें एका गांवांत दरोड्याचा खटला चालू आहे. त्या दरोडेखोरांना मदत केल्याच्या आरोपामध्यें एक लहान मुलगा आहे, ह्या खटल्याचें स्वरूप पाहून खटला सेशन कमिट करण्यांत आला आहे. आतां त्या खटल्यामध्यें त्या बदनाम झालेल्या दरोडेखोराबरोबरच त्या मुलाची चौकशी करणें योग्य होईल, का स्वतंत्रपणें ? या भागांत असें सांगितलें आहे कीं सरकारनें जागोजाग मुलांचीं कोर्टें स्थापन करावीं. त्यांवर अध्यक्ष म्हणून पगारी मॅजिस्ट्रेट ( वर्ग १ ) ह्यांना नेमावें व कोणतेंहि मूल व वयांत आलेला माणूस ह्यांची चौकशी एकत्र होऊं नये. मुलांचें कोर्ट वेगळ्या जागीं व वेगळ्या वेळीं भरावें. खटला सेशन कमिट झाला तरी मुलांची चौकशी मुलांच्या कोर्टातच चालावी. कोर्टाचे न्यायाधीश, अधिकारी व खास परवानगीनें आलेले लोक व खटल्यांत गुंतलेलीं माणसें याशिवाय इतरांना कोर्टात येण्याची बंदी असावी. हजर असलेल्या कोणत्याहि माणसाला कोर्ट बाहेर घालवूं शकतें. एका मुलीची हकीकत अशीच महत्त्वाची आहे. ती मुलगी—रझिया नांव तिचें—आपल्या एका लांबच्या मावशीकडे राहात होती. ही मावशी अनैतिक वर्तनाची होती. तिची इच्छा रझिया आपल्या ताब्यांत मिळावी अशी होती म्हणजे तिच्या अनैतिक व्यवसायाला रझियाचा उपयोग करतां आला असता. ह्या बाबतींत मुलीला पालकापासूनच संरक्षण देणें अवश्य आहे. कारण ती मावशी जर कोर्टात आली तर मुलीवर दडपण आणेल, तिला पढवेल म्हणून अशा मुलांमुलींच्या बाबतींत पालकांना सुद्धां कोर्टात हजर राहण्यास बंदी करतां येते. तीच गोष्ट वकिलांची आहे. वकील हे वकिलीकडे व्यवसाय म्हणून बघतात. अर्थात् हें अगदीं स्वाभाविक आहे. पण दुर्दैवानें कांहीं अपवादात्मक वकील धंदा करतांना आपली खोटी

बाजूहि तांत्रिक कायदेबाजीनें खरी भासवितात. वरच्याच उदाहरणामध्यें जर एखादा वकील आला व त्यानें मावशी ही कायदेशीर पालक असून ती नीतिमान् आहे असें भासविलें व ती मुलगी सुटली तर काय होईल ? तो खटला मावशी जिंकेल, वकिलाला फी मिळेल व मुलगी अनैतिक व्यवसायाला लागेल. सर्वच वकील असे नसतात. पण असे अपघात टाळण्याकरितां असें एक कलम घालण्यांत आलें आहे कीं कोर्टाच्या परवानगीविना वकिलांना मुलांच्या कोर्टांत येतां येत नाहीं. इतर कोर्टांमध्यें, कोर्ट हा गुन्हा खरा कीं खोटा येवढेंच पाहतें व शिक्षा देतें. मुलांचें कोर्ट हें शिक्षा देणारें कोर्ट नाहीं. अपराध कां घडला ह्याची चिकित्सा करून मुलांना सन्मार्गाला लावण्याचें पालकाचें काम तें करतें. तेथें मुलांचें हित प्रथम पाहिलें जातें. कायदा नंतर सांभाळला जातो. यामुळें सामान्यतः वकिलांनाहि येथें काम नसतें. मुलाची चौकशी करतांना कोर्ट मुलाचें वय, स्वभाव व शील, मुलाच्या भोंवतालची परिस्थिति व परिवीक्षाधिकाऱ्याचा अहवाल याचा विचार करतें. ह्या मुलांचीं नांवें, पत्ते, चित्रें वगैरे छापण्यास व प्रसिद्ध करण्यास कायद्यानें बंदी आहे. अर्थातच ह्याचा हेतु स्पष्ट आहे. संसर्गजन्य रोगानें पछाडलेलीं मुलें चौकशी करतां आल्यास त्यांना वेगळें ठेवण्यांत येतें व पालकांच्याकडे सोडावयाचें झाल्यास पालक त्या रोगानें पछाडलेले नाहींत अशी खात्री करून घेण्यांत येते.

तिसऱ्या भागांत संमत-शाळा, सुयोग्य संस्था, स्वीकार-केन्द्रें ह्यांसंबंधीं माहिती देण्यांत आली आहे. प्रांतिक सरकार खाजगी संस्थांना व शाळांना संमत-शाळा किंवा स्वीकार-केन्द्र म्हणून जाहीर करूं शकतें. प्रांतिक सरकार सुयोग्य संस्था कोणाला म्हणावें ह्याचे नियम करतें व बालकल्याण खात्याचे प्रमुख चीफ इन्स्पेक्टर ऑफ सर्टिफाईड स्कूल्स तसें जाहीर करतात. संमत-शाळा सरकारी किंवा खाजगी कशीहि असली तरी, त्याला एक शाळा-प्रमुख व हितचिंतकांची समिति लागते. या शाळांतून वैद्यकीय तपासणी होते. खाजगी शाळांना संमत-शाळा ( Certified Schools ) म्हणून जाहीर केलेलें असलें तरी सरकार आपली संमति काढून घेऊं शकतें किंवा ती संस्था हें काम करण्यास नकार देऊं शकते. खाजगी संस्थेंत पाठविल्या जाणाऱ्या प्रत्येक मुलाकरितां त्या संस्था-चालकांची संमति घ्यावी लागते.

ह्या भागांत सर्वांत महत्त्वाचें कलम ३५ वें आहे. पुष्कळदां असें अनुभवास येतें कीं कांहीं आपमतलबी लोक एखादी संस्था अगर अनाथाश्रम काढतात. त्याकरितां देणग्या व पैसे मिळवितात व त्या सार्वजनिक संस्थेच्या नांवाखालीं स्वतःचा स्वार्थ साधतात, त्या मुलांची आबाळ करतात व त्या मुलांची छळवणूकहि करतात. हे प्रकार थांबविण्याची व्यवस्था या कलमांत आहे. या कलमान्वयें एखादी मुलांच्यासाठीं स्थापन केलेली शाळा अगर संस्था ( तिला सरकारी मदत असो अगर नसो ) मुलांचा दुरुपयोग करीत आहे, त्यांचें अकल्याण करीत आहे अशी शंका आल्यास चीफ इन्स्पेक्टर अगर त्यांचे प्रतिनिधि केव्हांहि त्या शाळेची तपासणी करूं शकतात. त्यांचीं दप्तरें तपासूं शकतात. जर त्या संस्थेंत अंदाधुंदीचा कारभार आहे. मुलांची गैरव्यवस्था आहे असें आढळलें तर त्या संस्थाचालकाला समन्स काढतां येतें व तेथील सर्व मुलें दुसरीकडे हलविलीं जातात. अर्थातच ह्या कलमाचा वापर करण्याची वेळ क्वचितच येते.

मुलांच्या कायद्याच्या चौथ्या भागांत ह्या कार्याकरितां लागणारे अधिकारी ( चीफ इन्स्पेक्टर, इन्स्पेक्टर व असिस्टंट इन्स्पेक्टर ऑफ सर्टिफाइड स्कूल व प्रोबेशन ऑफिसर्स ) व त्यांचीं कामें ह्यांचें विवेचन केलें आहे. सरकार किंवा या कार्यांत असणाऱ्या खाजगी जिल्हा-संस्था प्रोबेशन ऑफिसर्सची नेमणूक करतात.

अनाथ मुलांची व्यवस्था करण्याची योजना ह्या कायद्याच्या पांचव्या भागांत करण्यांत आलेली आहे. पुढील मुलांना मुलांच्या कोर्टापुढें हजर करावें लागतें. ( १ ) ज्या मुलाला राहायला घर किंवा उदरनिर्वाहाचें साधन नसेल व जो भटकत असेल, भीक मागत असेल, किंवा कोणतीहि गैर गोष्ट करीत असेल; ( २ ) जें मूल अनाथ किंवा बेवारशी असेल, ज्याला आईबाप किंवा पालक नसतील, अगर असूनहि मुलाचा सांभाळ करण्याला अयोग्य असतील; ( ३ ) जें मूल वेश्या, दारूबाज अगर गुन्हेगार व्यक्तींच्या सहवासांत असेल; ( ४ ) जें मूल वेश्या असलेल्या घरांत राहात असेल किंवा तेथें वारंवार जात असेल; ( ५ ) किंवा जें मूल कुसंगतींत असेल किंवा अनैतिक वातावरणांत,नैतिक धोक्यांत असेल किंवा गुन्हेगारी जीवनांत असेल; त्या सर्व मुलांना पोलिस अगर प्रोबेशन ऑफिसर

यांनीं मुलांच्या कोर्टांत हजर करावें. जर तेथें मुलांचें कोर्ट नसेल तर मुलांच्या कोर्टांची व्यवस्था जेथें असेल तेथें मुलाला पाठवावें. ह्या ताब्यांत घेतलेल्या मुलाला जर आईबाप असतील तर पोलिसानें प्रथम आईबापांना कळविलें पाहिजे. एखाद्या गरजू मुलाबाबत माहिती मिळतांच मॅजिस्ट्रेट त्या मुलाला हजर करा असें पालकांना कळवितात व पालक योग्य आहेत असें वाटल्यास चौकशीच्या काळांतहि मुलाला पालकाजवळच ठेवतात. परंतु चौकशीच्या काळांत मुलाला भलत्या ठिकाणीं हलवलें जाईल, लपवलें जाईल अशी शंका आल्यास कोर्ट मुलाला आपल्या ताब्यांत घेईल. आवश्यक वाटेल तर पालकाच्या घराची झडतीहि घेतली जाईल. ही खबरदारी आवश्यक आहे कारण एका उदाहरणांत ताब्यांत असलेली मुलगी चौकशीच्या काळांत नाहींशी झाली. ती वेडसर आहे, ती पळून गेली म्हणून त्या तथाकथित पालकांनीं कांगावा केला; पण पोलिस तपासांत ती मुलगी एका वेश्यागृहांत सांपडली. या मुलांची चौकशी पूर्ण झाली व मॅजिस्ट्रेट यांस जर असें वाटलें कीं मुलाला एखाद्या संमत-शाळेंत पाठविल्यास त्याचा फायदा होईल तर त्यास संमत-शाळेंत घालण्यांत येतें. जर असें वाटलें कीं पालक अगर दुसरा कोणी सुयोग्य गृहस्थ त्याचा योग्य सांभाळ करील तर कोर्ट योग्य तो लेख व जामीन घेऊन व वाटल्यास मुलाच्या देखरेखीची व्यवस्था करून त्याच्या ताब्यांत देईल. जामिनकीच्या अटींचा भंग झाल्यास मुलाला पुन्हा संमत–शाळेंत पाठविण्यांत येईल. याशिवाय त्या भागांत अशीहि सोय आहे कीं एखाद्या पालकाला असें वाटलें कीं आपला मुलगा आपलें अजिबात ऐकत नाहीं, वांड आहे, तर ते पालक मुलांच्या कोर्टाकडे तसा अर्ज करूं शकतात व अर्जाच्या छाननीनंतर कोर्टाला तें पटल्यास कोर्ट त्या मुलाला शाळेंत पाठवतें अगर दुसरी योग्य व्यवस्था करतें.

आईबाप व पालक यांच्या दृष्टीनें ह्या कायद्याचा सहावा भाग अत्यंत महत्त्वाचा आहे. याच्या ४८ कलमांत म्हटलें आहे. मुलगा ताब्यांत असतांना जो मुलाला जाणूनबुजून त्रास देईल, वाईट वागवेल, त्याच्याकडे दुर्लक्ष करील किंवा हें होण्याला कारणीभूत होईल, मुलाला शारीरिक व मानसिक त्रास होईल अशा तऱ्हेनें, मुलाला पुरेसें खायला, अंगावर घालायला, राहायला किंवा अवश्य असणारी वैद्यकीय मदत देणार नाहीं त्या पालकाला जास्तींत जास्त दोन

वर्षें शिक्षा व हजार रुपयांपर्यंत दंड होईल. अर्थातच योग्य कारणाकरितां मुलाला शिक्षा केल्यास ती ह्या कलमाच्या कक्षेंत येणार नाहीं. पुढील कलमांमधूनहि अशाच स्वरूपाची शिक्षा सांगितली आहे.

| कलम | शिक्षा |
| --- | --- |
| ४९ भीक मागण्याकरितां मूल नोकरीवर ठेवणें, विकणें, त्याला भीक मागायला लावणें, त्याकडे दुर्लक्ष करणें, भिकेकरितां प्रदर्शन करणें. | एक वर्ष शिक्षा ३०० रु. दंड. |
| ५०, ५१, ५२, मूल ताब्यांत असतां, सार्वजनिक जागीं झिंगणें व त्यामुळें मुलावर ताबा ठेवण्यास असमर्थ होणें. डॉक्टरांच्या आज्ञेविना मुलांना नशा येणारीं औषधें किंवा दारू पाजणें, किंवा जेथें दारू वगैरे विकली जाते तेथें मुलाला पाठविणें, मुलाला आंत घेणें. | २०० रु. दंड |
| ५३, ५४, शब्दांनीं अगर खुणांनीं मुलाला सट्टा, अगर जुगार ह्यांकडे प्रवृत्त करणें, पैसे उसने घेण्यास लावणें, मुलांकडून गहाण वस्तु घेणें. | अनुक्रमें १ महिना शिक्षा व १००रु. दंड. १ वर्ष शिक्षा व ५०० रु. दंड. |
| ५५ मुलाला वेश्यागृहांत जाण्यास प्रवृत्त करणें, जाऊं देणें. | २ वर्षें शिक्षा व १००० रु. दंड. |
| ५६, ५७, ५८, अठरा वर्षांच्या आंतील मुलीला, अनैतिक मार्गाला किंवा वेश्याव्यवसायाला प्रवृत्त करणें, पतीखेरीज दुसऱ्याशीं संबंध ठेवावयास लावणें, वेश्येच्याकडे मुलीला नोकरीला ठेवणें. १८ वर्षांच्या आंतील मुलीशीं अनैतिक वर्तन करणें, मुलीला अनैतिक वर्तनाच्या किंवा वेश्यावृत्तीच्या धोक्यामध्यें, जाणून बुजून अगर अजाणतां ठेवणें, फूस अगर नादीं लावणें. | अनुक्रमें २ वर्षें शिक्षा १००० रु. दंड; तसेंच पालकांकडून लेख घेतला जाईल. |
| ५९ मुलाला हलक्या कामाकरितां अगर डॉक, फॅक्टरी व इतरत्र नोकरीला ठेवून त्याचा स्वार्थाकरितां उपयोग करणें, त्याचें वेतन न देणें अगर त्यावर स्वतः जगणें. | १००० रु. दंड. |

किंवा त्याला नादीं लावण्याच्या, समसंभोगाच्या, ६ वर्षे शिक्षा,
व वेश्यावृत्तीच्या धोक्यांत ठेवणें. किंवा हें सर्व १००० रु. दंड.
पाहून त्याकडे डोळेझांक करणें.

६०, पळणाऱ्या मुलाला मदत करणें, लपविणें, ३ महिने
परत न पाठविणें ५०० रु. दंड.

( १ ) खासगी संस्थांचा दुरुपयोग रु. ५०० व पुढें रु. ५० रोज.

( २ ) कलम २३ च्या विरुद्ध वागून मुलाचें चित्र,
प्रतिवृत्त छापणें ५०० रु. दंड व ३ महिने शिक्षा

( ह्या भागातलें सर्व गुन्हे असे आहेत कीं ज्यांच्या करितां पोलिसांना कोणालाहि वॉरंटशिवाय पकडतां येतें. )

बालगुन्हेगारांना पकडल्यानंतर त्यांची कशी व्यवस्था करावी ह्याचें विवेचन कायद्याच्या सातव्या भागांत केलें आहे. १६ वर्षांच्या आंतील वाटणाऱ्या व गुन्हा करणाऱ्या सर्व मुलांमुलींना कोर्टापुढें उभें केल्यावर पुरेसा जामीन मिळाल्यास जामिनावर सोडण्यांत येईल; पण सोडल्यानें मुलाला धोका आहे असें वाटल्यास अगर न्यायाला अडथळा येतो असें वाटल्यास सोडलें जाणार नाहीं. न सोडलेल्या मुलांना रिमांड–होममध्यें पाठवून तेथील प्रोबेशन ऑफिसरांना कळविण्यांत येईल. ते त्या मुलाच्या घरची माहिती व पूर्वेतिहास जमा करतील. चौकशीच्या वेळीं पालकांना बोलावण्यांत येईल. चौकशीचा कांहींहि निर्णय झाला तरी मुलाला फांशी किंवा जन्मठेप देतां येणार नाहीं. गुन्ह्याचें स्वरूप फारच गंभीर आहे किंवा मुलगा अत्यंत दंगेखोर किंवा शीलभ्रष्ट आहे व ह्या कायद्याखालील कोणतीहि शिक्षा त्याला पुरेशी होणार नाहीं असें कोर्टाला वाटल्यास ते सर्व खटला सरकारला कळवितील व त्याचा निर्णय घेतील. मुलांच्या बाबतींत गुन्हा ( Conviction), शिक्षा ( Sentence ) वगैरे शब्दप्रयोग वापरण्यांत येणार नाहींत. चौकशीनंतर मुलाला शिक्षणाकरितां व सुधारण्याकरितां एखाद्या संस्थेंत पाठविणें अवश्य आहे असें वाटल्यास त्याला संमत–शाळेंत किंवा सुयोग्य संस्थेंत पाठविण्यांत येतें, किंवा योग्य वाटल्यास मुलाला ताकीद देऊन सोडण्यांत येईल. मुलाला जामिनकीवर सोडण्यांत येईल किंवा मुलगा १४ वर्षांवरील असल्यास दंड करण्यांत येईल, किंवा तो परप्रांतांतील असून नीट वागेल

असें वाटल्यास आपल्या गांवीं परत पाठविण्यांत येईल. मूल १४ वर्षां-खालील असल्यास पालकांना दंड भरायला लावतां येतें. मात्र असें करण्या-पूर्वी त्याच्या पालकांना आपली बाजू मांडण्याची संधि दिली जाईल. जामिनकीवर सोडलेल्या मुलावर देखरेख ठेवण्याची व्यवस्था कोर्टाला करतां येते व जामिनकीच्या अटींचा भंग झाला तर त्या बालगुन्हेगाराच्या मूळ गुन्ह्याचें स्वरूप पाहून त्याची व्यवस्था करण्यांत येईल.

ज्या मुलाबाबत कांहीं गुन्हा घडला आहे किंवा घडण्याचा संभव आहे त्या मुलाला पोलिस सब–इन्स्पेक्टर किंवा इतर अधिकारी आपल्या ताब्यांत घेतील व त्यास चोवीस तासांच्या आंत मॅजिस्ट्रेटपुढें उभें करतील. नंतर पुढील खटला सुरू होईपर्यंत व निकाल लागेपर्यंत मुलाला ताब्यांत ठेवण्यांत येईल. ज्यांत मुलाबाबत गुन्हा घडलेला आहे अशा स्वरूपाच्या खटल्यांत मुलाला मुलांच्या कोर्टापुढें आणण्यांत येईल. अशा मुलांना संमत–शाळेला पाठविण्यांत येईल, किंवा पालनपोषण करण्यास योग्य असे पालक अगर आप्त कोणी असल्यास त्यांच्या ताब्यांत देण्यांत येईल. याबाबत जामीन घ्यावा किंवा नाहीं, देखरेख ठेवावी किंवा नाहीं हें कोर्टानें ठरवावें. देखरेखीच्या अटींचा भंग झाल्यास कोर्ट मुलाला पुन्हा ताब्यांत घेईल. घरचे लोक योग्य आहेत असें वाटल्यास परप्रांतांतील घरींसुद्धां मुलाला पाठविण्यांत येईल. वरील उपाय–योजना करतांना तीं करण्याचीं कारणें निकालपत्रांत दिलीं जातील.

याच आठव्या भागांत असें म्हटलें आहे कीं एखाद्या मुलाबाबत एखादा गुन्हा घडला आहे अगर घडण्याचा संभव आहे असा संशय एखाद्या कोर्टाला आल्यास त्या मुलाचा ताबा घेण्याकरितां कोर्ट वॉरंट काढील. त्या वेळीं जर अपराधी, मुलाला वाईट वागवतांनाच आढळेल, तर झडतीच्या वेळींच त्या अपराधी गृहस्थाला अटक केली जाईल अगर कोर्टांत जरूर तेव्हां हजर राहण्याच्या जामिनावर त्याला सोडण्यांत येईल. अशी माहिती देणारा गृहस्थ व डॉक्टर यांची गरज असल्यास तेहि झडतीच्या वेळीं हजर राहतील. मूल ताब्यांत घेतल्याबरोबर प्रोबेशन ऑफिसर किंवा रिमांड–होमचे अधिकारी ह्यांना कळविण्यांत येईल व चौकशीच्या करितां जास्तीत जास्त १४ दिवसांची (जी पुन्हा वाढवितां येईल) मुदत मॅजिस्ट्रेट देतील.

कायद्याच्या नवव्या भागांत मुलाच्या शिक्षणाबाबतच्या उपाययोजनेबाबत सांगतललें आहे. सर्वसामान्यपणें मुलाला वयाच्या अठरा वर्षापर्यंत, ( मुलगा पंधरा वर्षांवरचा असल्यास, सतरा वर्षापर्यंतच्या मुदतीकरितां) संमत–शाळेमध्यें पाठविण्यांत येईल. मुदत कमी दिल्यास त्याचीं कारणें न्यायाध्यक्षानें नोंदून ठेवावीं. ह्या मुलाच्या पालनपोषणाकरितां, पालकांना शक्ति असल्यास त्यांचें आर्थिक साहाय्य घेण्यांत यावें. ह्या मुलांना त्यांच्या धर्माप्रमाणें वाढविण्यांत यावें. तसें होत नाहीं असें आढळल्यास त्या मुलांची बदली दुसऱ्या संस्थेंत करावी. मुलाला संमत–शाळेंत, सुयोग्य संस्थेंत ठेवून सहा महिने झाल्यावर, संस्थेच्या हितचिंतकाच्या समितीनें ( Visiting Committee ) सुच-विल्यावर व अनुचिंतन संस्थेकडून ( After-care Association ) त्याला दुजोरा मिळाल्यावर, मुलाला परवाना देऊन सोडण्यांत येईल. परवान्याच्या अटींचा भंग झाल्यास, चीफ इन्स्पेक्टर ऑफ सर्टिफाइड स्कूल्स तो परवाना रद्द करतील. परवाना रद्द झाल्यावर आईबाप व पालक त्या मुलाला परत करीत नाहींत अशी खात्री झाल्यास कोर्ट त्यांना तसें करायला लावील. परवान्यावर असतांनाचा काळ संमत–शाळेंत घालविण्याच्या मुदतीचाच एक भाग समजला जाईल. मात्र परवान्याच्या अटींचा भंग झाल्यास, भंग झाल्यापासून परत शाळेंत येईपर्यंतचा काळ त्यांत मोजला जाणार नाहीं. मूल पळाल्यास तो अपराध समजला जाणार नाहीं, मुलावर खटला केला जाणार नाहीं पण कोणीहि अधिकारी त्या मुलाला वॉरंटाशिवाय पकडून शाळेंत पाठवूं शकेल.

दहाव्या व अकराव्या भागांत औपचारिक गोष्टींचा उहापोह केला आहे. कोर्टाच्या निकालावर तीस दिवसांच्या आंत वरिष्ठ कोर्टाकडे अपील करतां येते. मुलाची बिनशर्त सुटका किंवा बोर्स्टल शाळेमध्यें बदली, प्रांतिक सरकार करूं शकतें. बोर्स्टल शाळेमध्यें मात्र बोर्स्टल कायदा लागूं पडेल. प्रांताबाहेरच्या संस्थेमध्यें बदली करणें असल्यास प्रांतिक सरकारची संमति लागेल. एखादें मूल दुर्बल मनाचें अथवा महारोगी आहे असें आढळून आल्यास त्याला रुग्णालयांत अगर महारोग केंद्रांत पाठविण्यांत येईल. त्याला सुधारण्याकरितां कोर्टानें दिलेल्या मुदतीपेक्षां जास्त ठेवणें अवश्य आहे असें वाटल्यास प्रांतिक सरकार ठेवूं शकेल. तीं मुलें ल्युनसी कायदा व महारोगाचा कायदा याखालीं येतील. मुलांच्या इतर बदल्या चीफ इन्स्पेक्टर करूं शकतील. मुलाबाबत जो कोणी जाणूनबुजून खोटी माहिती देईल त्याला, ज्याच्या विरुद्ध माहिती दिली

असेल त्याला नुकसानभरपाई द्यावी लागेल. हें काम करणारे प्रोबेशन ऑफिसर्स, चीफ इन्स्पेक्टर, व त्यांचे अधिकृत प्रतिनिधि हे लोकांचे सेवक आहेत असें समजलें जाईल. मुलाच्या कल्याणाकरितां केलेल्या कोणत्याहि गोष्टीकरितां त्यापैकीं कोणावरहि फिर्याद करतां येणार नाहीं.

मुंबई सरकारचा मुलांचा कायदा हा आजपर्यंतच्या मुलांच्या कायद्यामध्यें सर्वांत प्रगत व सुधारलेला आहे. ह्यांतहि कांहीं उणीवा आहेत व ज्या प्रत्यक्ष अनुभवानें दृष्टोत्पत्तीस येत आहेत, त्या वेळचे वेळीं कायदा सुधारून दूर करण्यांत येतीलच. मुलांच्या कायद्याशिवाय इतर अनेक कायद्यांत मुलांच्या संरक्षणाकरितां कलमें घालण्यांत आलेलीं आहेत. उदा० एम्प्लॉयमेंट ऑफ चिल्ड्रेन ॲक्ट, भिकाऱ्यांचा कायदा, देवदासी कायदा, वेश्याप्रतिबंधक कायदा, खाणींचा कायदा, शारदा कायदा, शॉप्स ॲंड एस्टॅब्लिशमेंट कायदा. वरील सर्व कायद्यांमधून मुलांच्या व्यवस्थेविषयीं फुटकळ कलमें घातलेलीं असलीं तरी मुलांच्यासाठीं केलेला असा 'मुलांचा कायदा' हाच गरजू मुलांच्या सर्व व्यवस्था करूं शकतो.

याखेरीज कुमारावस्थेंतील मुलांच्या करितांहि कांहीं कायदेशीर व्यवस्था करणें अवश्य आहे असें वाटतें. आज मुलांच्या कायद्यामध्यें मुलाची वयोमर्यादा सोळा वर्षांपर्यंतच आहे. पण ती २१ वर्षांपर्यंत न्यावी असें कित्येक तज्ज्ञांचें मत आहे. मुलाच्या आयुष्यांतील सर्वांत महत्त्वाचा काळ कुमारावस्थेचा ( Adolescent Age ) असतो. या कालखंडांत मुलें मोठीं होत असतात, मुली वयांत येतात, त्यामुळें त्यांच्या अर्धसुप्त मनामध्यें, नव्या नव्या भावना निर्माण होत असतात. लहान मुलें ( ६ ते १२ वर्षांचीं ) गटागटांनीं खेळणें पसंत करतात, तर जरा वरच्या म्हणजे १२ च्या पुढचीं मुलें आपल्या स्वतःचा असा कंपू बनवून त्यांतच गुंग असतात. पण १६ वर्षांच्या सुमाराला मुलांचें लक्ष स्वतःभोंवतीं केंद्रित होत जातें. कळी उमलून यावी तसें त्याचें नवें व्यक्तिमत्त्व प्रगट होत असतें. स्वतःचे कपडे, चर्या, केशभूषा यांकडे त्यांचें अधिक लक्ष असतें. त्याला 'कांहींतरी वाटतें,' 'कशाची तरी' लाज वाटते. त्या आवाज फुटलेल्या मुलांना लहान मुलें मोठीं माणसें समजतात, आपल्यांत मिसळूं देत नाहींत व मोठीं माणसें त्या मुलांना अजून 'मूल' आहे अशा कल्पनेनें वागवतात. त्यामुळें धड मूल नाहीं, धड पूर्ण वाढ

झालेला गृहस्थहि नाहीं अशा चमत्कारिक वयोमर्यादेमध्यें मुलाचें मन हेल-कावे खात असतें. सुंदर पोशाख करावा, लोकांवर छाप पाडावी, कशाची तरी आकांक्षा धरावी, कांहीं ध्येय धरावें व त्यासाठीं सर्वस्व पणाला लावावें असें वाटतें. इथेंच माणसाच्या जीवनांतला मोठा चौक असतो. इथून अनेक रस्ते फुटतात, अनेक वाटा जातात. त्या वाटांमधून कोणती वाट निवडायची, कोणत्या रस्त्यानें जायचें हें प्रत्येक मुलाला कळतेंच असें नाहीं. कारण प्रत्येक वाटेवर वेगवेगळीं आकर्षणें असतात; वेगवेगळे मोह असतात. म्हणून या वयामध्यें मुलांची खरी काळजी घ्यावी लागते.

ह्या वयोमर्यादेमध्यें एखादे वेळीं या कुमार-कुमारींच्या हातून गुन्हा घडला तर त्यांना तुरुंगांत न पाठवितां दुसऱ्या एखाद्या संस्थेंत पाठवून सुधारण्याचा प्रयत्न करावा म्हणून 'बोर्स्टल शाळेचा कायदा' करण्यांत आला आहे ( १९२९ ). ह्या कायद्यामध्यें १९ ते २१ वर्षांच्या कुमारानें एखादा गुन्हा केला तर त्याला सुधारण्याची संधि देण्याकरितां बोर्स्टल शाळे-मध्यें पाठविण्यांत येतें. हें केवळ मॅजिस्ट्रेटच्या मनावर आहे किंवा जेलमध्यें असलेल्या एखाद्या कुमाराला बोर्स्टल शाळेंत पाठविल्यानें तो सुधारेल असें वाटलें तर त्याला बोर्स्टल शाळेमध्यें बदली करून पाठवितां येतें. त्याच्या उलट बोर्स्टल शाळेत पाठविलेला एखादा कुमार तेथें सुधारणें अशक्य आहे असें वाटल्यास त्याची बदली तुरुंगामध्यें करतां येतें. ह्या कुमारांना धंदेशिक्षण देण्यांत येतें. ह्या कुमारांचा त्या शाळेंत प्रवेश झाल्यापासून सहा महिन्यांनंतर, हितचिंतकांच्या समितीनें ( Visiting Committee ) सुचविल्यानंतर इन्स्पेक्टर जनरल ऑफ प्रिझन्स त्याला परवान्यावर सोडूं शकतात. परवान्याच्या काळांत त्याच्यावर प्रोबेशन ऑफिसरांची देखरेख असते. या मुदतींत तो नीट वागला नाहीं तर त्याला पुन्हा पकडून बोर्स्टल शाळेंत पाठविण्यांत येतें अगर चौकशी समितीपुढें (Investigating Committee ) उभें करण्यांत येतें. ही समिति त्याची संपूर्ण चौकशी करून त्याला पुन्हा शाळेंत पाठवतें अगर परवान्यावर सोडते. अशी एकच बोर्स्टल शाळा धारवाड येथें आहे. मुलींच्याकरितां बोर्स्टल शाळा काढण्याची फार आव-श्यकता आहे. वरील कायदा जुना झाल्यानें त्याच्या यंत्रणेमध्यें थोड्या उणीवा राहिल्या असून त्या सुधारण्याची तीव्र गरज निर्माण झालेली आहे.

उदाहरणार्थ बोर्स्टल शाळेमध्यें पाठविणें हें आज बंधनकारक नाहीं. शाळेच्या शिक्षणक्रमांतहि थोडासा फरक व अनुचिंतनाच्या ( After-care ) व्यवस्थेंत सुधारणा करतां येण्यासारखी आहे. ह्या वयांतील गुन्हेगाराबाबतचें संशोधन फार महत्त्वाचें ठरणारें असल्याकारणानें व ह्या वयांत सुधारण्याची शक्यता जास्त असल्यानें या कायद्यांत सुधारणा व यंत्रणेंत बदल व्हावा असें वाटतें.

बॉम्बे प्रोबेशन ऑफ ऑफेन्डर्स कायदा (१९३८) नांवाचा एक कायदा करण्यांत आलेला आहे. ह्या कायद्यामध्यें प्रत्यक्ष वयोमर्यादा घालून दिलेली नसली तरी ज्यांची सुधारणा होणें शक्य आहे अशा दंडशास्त्राच्या दृष्टीनें कोवळ्या गुन्हेगारांच्या करतांच त्याचा उपयोग असल्यानें वरील कायद्यांच्या समवेतच त्याची पण ओळख करून घ्यायला हवी. ह्या कायद्यामध्यें असें म्हटलें आहे कीं गुन्हेगारांचें शील, वय, पूर्वेतिहास मानसिक व शारीरिक स्थिति यांचा आणि गुन्ह्याचें स्वरूप व तत्कालीन परिस्थिति यांचा विचार न्यायाधिशांनीं करावा. त्या गुन्ह्याला जर जन्मठेप अगर फांशीची शिक्षा नसेल तर जामिनकीवर अगर देखरेखीखालीं त्या माणसाला सोडण्यांत येतें. [ कलम ५ (१) व ५ (२). ] ह्या पद्धतीला "मोकळी सुधारणा पद्धति" ( Open Treatment ) म्हणतां येईल. कारण पद्धतीमध्यें गुन्हेगाराला त्याच्या घरांत व समाजांत सुधारण्याचा यत्न केला जातो. तुरुंगांत घातल्यानें जेवढीं माणसें सुधारतील त्यापेक्षां जास्त माणसें ह्या मोकळ्या सुधारणा पद्धतीनें सुधारतील असें तज्ज्ञांचें म्हणणें आहे. ( भारतीय तुरुंग सुधारणेचें प्रतिवृत्त डॉ. वॉल्टर सी.रेकलेस ). मात्र देखरेखीच्या अटींचा भंग केल्यास पूर्ववत् शिक्षा देण्यांत येते. ह्या पद्धतीचा विशेष हा कीं प्रथमच गुन्हा करणाऱ्या अगर चुकीनें त्यांत सांपडलेल्या माणसांना त्याच्या घरांत ठेवून मार्गदर्शन व मदत देऊन सुधारण्याचा प्रयत्न करण्यांत येतो. ह्या पद्धतीमुळें तुरुंगामध्यें ज्या अनेक अडचणी निर्माण होतात, त्या सर्व नष्ट होतात. ह्या कायद्यांत वयाच्या २६व्या वर्षापर्यंत माणसाला देखरेखीखालीं सोडण्यांत येतें.

कांहीं तुरळक उणीवा सोडल्या तरी सर्वसामान्यपणें पाहिलें तर असें दिसतें कीं इतर प्रांतांच्या मानानें मुंबई प्रांतांत मुलें व युवक यांच्याकरितां केलेले कायदे हे पुष्कळच पुढारलेले आहेत. उत्तर प्रदेश व मद्रास ह्या प्रांतांत

'प्रोबेशन ऑफ ऑफेन्डर्स' कायद्याचें काम मुंबईपेक्षां जास्त संघटित आहे. परंतु केवळ मुलांचाच विचार करायचा झाला तर असें स्पष्टपणानें म्हणायला हरकत नाहीं कीं आजचा मुंबई सरकारचा कायदा हा पुष्कळच पुढारलेला आहे. त्यांत असलेल्या उणीवा हळू हळू दुरुस्त केल्या जात आहेत ही फार महत्त्वाची गोष्ट आहे कारण कायदा हा गतिशील असतो, तो कालमानानें बदलतो हेंच अजून कित्येक लोक मानायला तयार नाहींत. मुलांच्या कायद्यांत गुन्हेगार व ज्यांच्याबाबत गुन्हे घडले तीं मुलें व त्यापेक्षांहि म्हणजे अनाथ, उपेक्षित, गरजू व वांड मुलांच्याकरितां केलेली सोय, समाजांतील वाईट लोकांच्यापासून (ते कदाचित् पालकाहि असूं शकतील) मुलांना दिलेलें संरक्षण ह्याचा विचार केला म्हणजे लक्षांत येतें कीं मुलांचा कायदा हा कायदा नसतो, मुलांच्या हक्कांचा जाहीरनामा असतो.



: ८ :

# खाजगी प्रयत्न

मुंबई सरकारनें मुलांच्या कल्याणाकरितां केलेल्या कायद्यान्वयें मुलांच्या व्यवस्थेकरितां जी यंत्रणा निर्माण करण्यांत आली आहे ती पाहतां आज भारतामध्यें ' बालक–कल्याण ' ( Child-welfare ) या विषयांत तरी मुंबई राज्य अग्रेसर आहे असें मानण्यास आधार आहे. ह्या कायद्यांतील सर्वांत महत्त्वाचा कायदा म्हणजे १९४८ चा मुलांचा कायदा. या कायद्या-प्रमाणें अनाथ, उपेक्षित, निराधार, वांड, उन्मार्गी व अपराधी मुलांच्या सुशिक्षणाची व पुनःस्थापनेची व्यवस्था करण्यांत येते. ही व्यवस्था करण्याचें काम खाजगी जिल्हा संस्था करीत असतात. हें काम कसें चालतें हें आपण उदाहरणानेंच पाहूं.

समजा, राम नांवाचा एक मुलगा आहे. लहानपणींच आईबाप वारल्या-मुळें तो निराधार आहे व मामाच्या आश्रयानें पुणें शहरांत राहात आहे. मामा स्वतःच्या मुलाला चांगलें प्रेमानें वागवतात व रामला सावत्रपणा करतात, यामुळें रामाला घरांत सुख नाहीं. साहजिकच राम जास्तींत जास्त वेळ घराच्या बाहेर काढूं लागतो. तेथें त्याला वाईट मित्र मिळाल्यामुळें हॉटेलांत जाण्याची, वारंवार चित्रपट पाहण्याची संवय लागते. ह्या संवयी पुरविण्या-इतके पैसे तर रामजवळ नसतात. तेव्हां तो प्रथम मित्रांची उसनवारी

करतो. मग फुटकळ चोऱ्या करूं लागतो व शेवटीं जुगाराकडे वळतो. अल्प वयांत रामची झालेली प्रगति ही रामचे मामा किंवा शेजारीपाजारी कोणालाच मान्य नसते. पण रामला कसा सुधारावा हा तर गहन प्रश्न असतो. कारण मारून झोडून, उपाशी ठेवून सर्व उपाय करून, त्याचे मामा थकलेले असतात. अर्थात् रामचा स्वभाव हें त्याच्या पालकांना व भोंवतालच्या समाजाला एक कोडें असतें, राम म्हणजे एक अहर्निश लागलेली चिंता किंवा प्रमेय वाटूं लागतें. अशा तऱ्हेच्या मुलांना सामान्यपण प्रमेयात्मक मुलें ' ( Problematic Children ) म्हणतात. हीं मुलें अनेक प्रकारचीं असूं शकतात. समजा एक लक्ष्मण नांवाचा मुलगा आहे. घरीं आईबाप आहेत पण बाप भिक्षुकी करीत असल्यानें घरांत अठराविश्वे दारिद्र्यच आहे. बापाला मदत म्हणून लक्ष्मण वर्तमानपत्रें वगैरे विकत असतो, परंतु त्यांत वेळ गेल्यामुळें त्याला शाळेचा अभ्यास करायला वेळच होत नाहीं. लक्ष्मण हा जात्याच हुषार आहे. थोराघरीं जन्माला आला असता तर आय्. सी. एस्. झाला असतां असें लोकांना वाटतें. राष्ट्राच्या दृष्टीनें लक्ष्मणाचा पुष्कळ उपयोग होण्यासारखा आहे. पण त्याला संधीच मिळत नाहीं. अर्थात् त्याच्या बाबतींत गरिबी हा अपराध झाला आहे. हें कोडें कसें सोडवणार ? लक्ष्मणाला मदत कोण करणार ? एकदां काय झालें कीं अहिल्या नांवाची चौदा पंधरा वर्षांची एक मुलगी होती. धड मुलगी म्हणण्याइतक्या लहान वयांत नव्हती, धड बाई म्हणण्याइतकी वाढली नव्हती. लहानपणापासून हळव्या मनाची. कादंबऱ्या, कविता व चित्रपट पाहून तिच्या मनांत प्रेमानें ठाण मांडलें होतें. तिला प्रेमाचीं स्वप्नसुंदर वर्णनें तोंडपाठ होतीं पण प्रीतीमागें लागणारा व्यवहार व जीवनाची खोली तिला समजली नव्हती. तिच्या शेजारच्या श्रीमंत गुजराथ्याकडे एक ड्रायव्हर कामाला होता. बरा पगार असल्यानें थोडासा छानछोकींत राही. त्याची भूल अहिल्येला पडली. ती त्याच्या येण्याजाण्याच्या वेळीं दारांत उभी राही. एकदां चोरून चिठ्ठी पण पाठविली. अहिल्येच्या आईवडिलांना हा मोठा पेंच पडला आहे. तशीच द्रौपदी नांवाची एक मुलगी आहे. घरीं विधवा आई आहे. लोकांकडे स्वैंपाक करून पोट भरतें, कांहीं दिवसांनंतर तिच्या गांवचा एक गजानन नांवाचा इसम द्रौपदीच्या आईला भेटायला आला. तो एका

थिएटरमध्यें डोअरकीपर आहे. तो द्रौपदीला चित्रपटसृष्टींतल्या रंगीबेरंगी गोष्टी सांगे. तिच्या रूपाची स्तुति करी व सांगे "तुला सिनेमांत घालूं. तूं काय नर्गीस, नस्सीम, जयश्री यांपेक्षां सुंदर आहेस. खोऱ्यानें पैसा ओढशील. मग आपण लग्न करूं." या थापांना द्रौपदी फसली व गजाननबरोबर पळाली. तिला गजाननें एका अनैतिक स्त्रीच्या घरीं ठेवलें आहे व तो तिच्या स्वभावाचा फायदा घेणार आहे. इकडे द्रौपदीची आई गांवभर तिच्या शोधांत वणवण फिरते आहे. त्या आईपुढें हा एक प्रश्नच आहे. अशीं हजारों प्रमेयात्मक मुलें आहेत. पालक, आईबाप, शिक्षक व समाज ह्यांच्या-पुढें ही प्रश्नांची मालिकाच उभी आहे. ह्या प्रश्नाचें उत्तर कोण आणि कसें देणार ?

ह्या सगळ्या मुलांच्या प्रश्नांचा विचार करण्याकरितां सरकारनें जागोजाग 'मुलांचीं न्यायालयें' ( Juvenile Courts ) उघडलीं आहेत. मुलांचीं न्यायालयें वेगळीं असण्याचें कारण काय ? असा प्रश्न इथें साहजिकच उद्भवतो. त्याचें मुख्य कारण म्हणजे मुलांच्याकरितां स्थापन केलेलीं कोर्टें व मोठ्या माणसांच्याकरितां काढलेलीं कोर्टें ह्यामध्यें मूलभूत फरक आहे. त्यांची कार्यपद्धति, हेतु व स्वरूप सर्वस्वीं वेगळें आहे मोठ्या माणसांच्या न्याया-लयांत कोणताहि खटला आला म्हणजे कोर्टाचें काम हें असतें कीं आलेला साक्षीपुरावा तपासायचा व गुन्हा शाबीत होतो कां नाहीं हें पाहायचें व शाबीत होत असेल तर त्या गुन्हेगाराला शिक्षा करायची. एखादा चोरीचा खटला असला तर चोरी झाली का ? तिचें स्वरूप काय ? व चोरी ज्यानें केली त्यावर गुन्हा शाबीत झाला का हें पाहून मग गुन्हेगाराला शिक्षा द्यायची हें काम असतें. त्याच्यामध्यें प्रमुख हेतु दंड-शासनाचा ( Penal ) आहे. पण मुलांच्या कोर्टाचा हेतु शासनाचा नाहीं, संरक्षणाचा आहे, मदतीचा आहे. त्यामुळें मुलांच्या कोर्टांत साक्षी, पुरावे, कायद्याची भाषा, वगैरे सर्व टाळण्यांत आलें आहे.

मुलांच्या कोर्टांत जर चोरीचा खटला आला तर त्या मुलानें चोरी केली हें सिद्ध करणें व त्याला शिक्षा करणें हा हेतु मुलांच्या न्यायालयाचा नसतो, तर मुलानें चोरी कां केली याचीं कारणें शोधून काढून त्यावर उपाय करणें हा हेतू असतो. ह्या मूलभूत हेतूमध्येंच फरक असल्यानें मुलांच्या कोर्टांत खास

परवानगी काढल्याशिवाय वकिलांना सुद्धां येऊं देत नाहींत. कारण इथें खटला लढवायचा प्रश्नच नसतो. अर्थातच कायद्याचीं कलमें व त्याचे श्लेष काढण्यापेक्षां मुलगा कसा सुधारेल ह्याचा विचार मुख्यत: करायचा असल्यामुळें येथील न्यायाधीशसुद्धां त्याच पद्धतीचे असतात. मुलांच्या कोर्टांत बहुधा तीन न्यायाधीश असतात. त्यांत दोन न्यायाधीश स्त्रिया असतात. ह्या स्त्रिया कायदा शिकलेल्या नसतात, पण ज्यांना समाजसेवेची हौस आहे, उपेक्षित मुलांच्याकरितां कांहीं करावें अशी हौस आहे अशा स्त्रिया असतात. शिवाय एक मुख्य न्यायाधीश किंवा न्यायाध्यक्ष असतो. हा मात्र मोठ्या माणसांच्या कोर्टांतील व्यावसायिक न्यायाधीश असतो. आजकाल या क्षेत्रांतील तज्ज्ञांचें असें मत आहे कीं या तिन्ही न्यायाधिशांचा मोठ्या माणसांच्या कोर्टाशीं कांहींहि संबंध नसावा व सर्वांना समाजसेवेला अवश्य असणाऱ्या बालमानसशास्त्रासारख्या विषयांचें ज्ञान असावें. या दिशेनें मुंबई सरकारनें कांहीं प्रयत्न केलेच आहेत.

मुलांच्या न्यायालयाला प्रमेयात्मक मुलांची चौकशी करावी लागते व त्यांच्या सुधारणेचे उपाय सुचवावे लागतात. आतां प्रश्न असा येतो कीं जागोजाग सुरू केलेल्या या मुलांच्या न्यायालयांना ह्या मुलांची बातमी तरी कोण पोंचवणार ? कारण कोणाची कोठें, काय अडचण आहे हें समजल्याशिवाय मुलांचें न्यायालय तरी काय करणार ? तेव्हां ही बातमी पोंचवून त्या अडचणींत सांपडलेल्या गरजू मुलांची चौकशी करण्याकरितां ह्या कोर्टाच्या हाताखालीं कांहीं अधिकारी नेमले आहेत. त्यांना परिवीक्षाधिकारी किंवा प्रोबेशन ऑफिसर्स म्हणतात. त्यांचें काम म्हणजे गरजू मुलांच्या अडचणी काय आहेत हें समजावून घेणें किंवा त्यांच्या अडचणींचीं कारणें शोधणें, त्या अडचणींना कोण जबाबदार आहे हें पाहणें. त्या मुलांच्या स्वभावाचें विश्लेषण करून तो बिघडण्याचें बीज कुठें खोल दडलें आहे तें शोधून काढून सुधारायला काय करावें हें सुचविणें. गांवोगांव नेमलेल्या या लोकांचें काम हें असतें कीं अनाथ, उपेक्षित, गरजू, वांड, अपराधी वगैरे मुलें कोठें आहेत हें शोधून काढणें व सुधारणें. परंतु मुलांच्या कोर्टाला त्या मुलांची खबर केवळ प्रोबेशन ऑफिसरच देतो किंवा त्यानेंच द्यावी असें नाहीं. एखादे वेळेला पोलिससुद्धां तें काम करतात. समजा, एखाद्या खटल्यामध्यें मोठ्या



मुलांच्या अडचणी समजावून घेऊन त्यांचें निराकरण करणें ” (मुलांचें कोर्ट पुणें)

माणसांच्या बरोबर मुलेंहि सांपडलीं तर नियमाप्रमाणें पोलिस मुलांची खबर मुलांच्या कोर्टाला देतात. व त्यांची चौकशी वेगळी होते. याशिवाय मुलांचें आईबाप किंवा पालकसुद्धां मुलांच्या कोर्टाला अर्ज करूं शकतात.

कोणाकडूनहि मुलांबद्दल मुलांच्या कोर्टाला खबर पोंचतांच न्यायाधीश त्या मुलाला जामिनावर घरीं राहूं देतात किंवा त्यांना जर असें वाटले कीं मुलाला त्याच्या घरांतून हलविणें इष्ट आहे तर स्वीकार–केंद्रामध्यें किंवा रिमांड–होममध्यें ठेवतात. उदाहरणार्थ एखाद्या मुलीबाबत अनैतिक वागणुकीचा संशय असला व ती ज्या घरांत राहते तेथील वातावरणच जर अनैतिक असेल तर कांहींहि चौकशी करण्यापूर्वी त्या मुलीला त्या घरांतून हलवून एखाद्या सुरक्षित स्थळीं ठेवणें इष्ट असतें. म्हणून ज्या मुलां–मुलींच्या घरचें वातावरण आर्थिक, नैतिक व सामाजिक दृष्टया चांगलें नसेल त्यांना रिमांड–होममध्यें ठेवण्यांत येतें. स्वीकारकेंद्रांत मुलाला दाखल केल्यानंतर परिवीक्षाधिकारी त्या मुलाचा पूर्वेतिहास काय आहे त्याचा अभ्यास करतात व संपूर्ण चौकशी झाल्यानंतर मुलांच्या कायद्याच्या ज्या कलमान्वयें मुलाला ताब्यांत घेतलें असेल त्या कलमांत दिलेला अपराध किंवा त्या कलमांत सांगितलेली अडचण खरी आहे कीं नाहीं हें पाहतात. ज्या कलमाखालीं मुलाला मुलांच्या कोर्टापुढें आणण्यांत आलें, तो आरोप किंवा ती अडचण सिद्ध झाल्यानंतरच मुलांच्या कोर्टाचें खरें काम सुरू होतें. कारण मुलांच्या कोर्टांत आरोप सिद्ध करणें हा मुख्य हेतु नसून मुलांच्या हातून झालेल्या चुकीची कारणपरंपरा शोधून काढणें व ती चूक दुरुस्त करण्यासाठीं मुलाला सुशिक्षण देणाऱ्या संस्थेंत पाठविणें किंवा मुलगा सुधारण्याचे इतर उपाय अवलंबिणें हें प्रधानकार्य असतें. उदाहरणार्थ, गणपत नांवाच्या एखाद्या मुलानें चोरी केली व त्या प्रांतांत मुलांचा कायदा नसेल तर गणपतला कोर्टापुढें आणल्यावर गणपतनें चोरी केली हें सिद्ध करणें व चोरी केल्याबद्दल इं. पि. को. च्या २६७ व्या कलमाप्रमाणें शिक्षा करणें हेंच काम असतें. परंतु जर गणपतला मुलांच्या कोर्टांत उभें केलें तर गणपतवर आरोप सिद्ध होतो कीं नाहीं ह्यापेक्षांसुद्धां महत्त्वाचा एक प्रश्न कोर्टापुढें असतो आणि तो म्हणजे गणपतनें चोरी कां केली ! चोरीची कारणपरंपरा शोधल्यानंतर तें कारण नाहींसें करण्यासाठीं कोर्ट व्यवस्था करण्याचा प्रयत्न

करतें. समजा गणपत निराधार असला व दोन दिवस खायला न मिळाल्यानें त्यानें चोरी केली असली तर मुलांच्या कायद्याच्या ४० व्या गरीब व उपेक्षित मुलाच्या कलमान्वयें त्याला एखाद्या चांगल्या शाळेंत पाठवून त्याची व्यवस्था केली जाईल किंवा जर घरची परिस्थिति चांगली असूनहि गणपतला चोरी करण्याची वाईट खोड लागली असली तर त्याला एखाद्या बालसुधार शाळेंत पाठविण्यांत येईल. हें कार्य चांगलें व्हावें म्हणूनच मुलांच्या कोर्टांत सहानुभूतिपूर्वक विचार करणाऱ्या स्त्रियांना कायद्याचें ज्ञान नसूनहि सन्माननीय न्यायाधीश नेमण्यांत येतें. त्याचप्रमाणें मुलांच्या कोर्टाचें वातावरणहि इतकें अनौपचारिक, प्रेमळ व सहानुभूतीचें ठेवण्यांत येतें कीं तेथें मुलाला मनमोकळेपणानें सल्ला घेतां यावा. हें वातावरण कायम ठेवण्याच्या दृष्टीनें पोलिसांनासुद्धां गणवेश घालून कोर्टांत येण्यास मनाई असते. त्याचप्रमाणें वकिलांनाहि मुलांच्या कोर्टांत शक्य तों येऊं दिलें जात नाहीं कारण मुलांच्या कोर्टांत कोणताहि खटला हा धंद्याकरितां चालवावयाचा नसल्यानें तेथें साक्षीपुरावे गोळा करणें, "देवाशपथ खरें सांगेन व खोटें सांगणार नाहीं" अशा शपथा घेणें व कायदेकानूंचा कीस काढून खटले लढविणें याची आवश्यकताच वाटत नाहीं.

कोणत्याहि तऱ्हेची गरजू, अडचणींत सांपडलेलीं व तथा–कथित अपराधी मुलें दृष्टिपथांत येतांच पोलिस किंवा परिवीक्षाधिकारी त्या मुलाला आपल्या ताब्यांत घेतात. ताब्यांत घेतल्याबरोबर त्या मुलांना मॅजिस्ट्रेटसमोर हजर करून त्यांच्या परवानगीनें स्वीकारकेंद्र अथवा रिमांड–होममध्यें दाखल केलें जातें. जर मुलगा ऐकत नाहीं, घरीं दंगा करतो अशी सामान्य स्वरूपाची तक्रार असेल तर त्या मुलाला स्वीकार–केंद्रांत दाखल न करतां पालकांच्याकडेच सोडण्यांत येतें व परिवीक्षाधिकारी तेथें जाऊन त्याची चौकशी करितात. चौकशी पूर्ण होतांच अडचणींत सांपडलेल्या उपेक्षित व उन्मार्गी मुलाला मुलांच्या न्यायालयापुढें उभें करण्यांत येतें. तेथें त्या मुलाच्या अडचणींची सांगोपांग चर्चा करून त्या मुलाला सुधारण्यासाठीं वा मार्गावर आणण्यासाठीं काय उपाययोजना करावी याचा विचार करण्यांत येतो. मुलांच्या कोर्टांतील न्यायाधिशांपुढें असा प्रश्न वारंवार उभा राहतो कीं ज्या मुलांना घरीं ठेवून सुधारणें अशक्य आहे त्यांना कोठें पाठवावयाचें ? कारण

सर्वसाधारणपणें मुलांच्या न्यायालयांत धोरण म्हणून असें ठरविलें जातें कीं मुलाला सुधारण्यासाठीं जे जे उपाय करावयाचे ते ते आई-वडिलांच्या जवळ ठेवून त्यांच्या मदतीनेंच करावयाचे, कारण तेथेंच मुलगा सुधारण्याचा संभव जास्त असतो. हें न झाल्यास मुलाला आईबापांजवळ ठेवून त्याच्यावर देखरेख करण्यासाठीं ( supervision ) एक परिवीक्षाधिकारी नेमला जातो. अशा प्रयत्नांना यश मिळणें दुरापास्त आहेसें वाटल्यास त्याला एखाद्या चांगल्या नातलगाकडे ठेवण्याचा प्रयत्न केला जातो व हें सर्व उपाय थकल्यास किंवा एखाद्या मुलास आईबाप, घरदार व आप्तेष्ट नसल्यास त्या मुलाला एखाद्या संस्थेंत ठेवण्याचा प्रश्न उद्‌भवतो. आज मुंबई प्रांतांत कांहीं थोडे जिल्हे वगळल्यास, जवळ जवळ प्रत्येक जिल्ह्यांत व कांहीं ठिकाणीं कित्येक तालुक्यांत सुद्धां स्वीकारकेंद्रे किंवा रिमांड होम्स चालू आहेत. आज सुमारें ४९ स्वीकारकेंद्रें व ३१ मुलांचीं न्यायालयें जागोजाग चालू आहेत. ह्या सर्व न्यायालयापुढें येणाऱ्या मुलांची संख्या पाहिली तर दिवसेंदिवस या क्षेत्रांतील काम किती प्रभावी, उपयुक्त व यशस्वी होत आहे याची कल्पना येईल. दरसाल सुमारें अकरा ते बारा हजार मुलें मदतीकरितां मुलांच्या न्यायालयापुढें येतात व त्यांना मदत करण्याचा यथाशक्ति प्रयत्न न्यायालयाकडून केला जातो.

हीं सर्व स्वीकारकेंद्रें आजहि सरकार चालवूं शकेल, परंतु बालककल्याणाच्या कामांत सर्व समाजसेवकांचा व समाजाचा जास्तींत जास्त उपयोग करून घ्यावा व स्वीकारकेंद्राबाबत जनतेला आपलेपणा वाटावा म्हणून हीं स्वीकारकेंद्रें खासगी संस्थांकडून चालविलीं जातात. ह्या संस्था म्हणजे "जिल्हा परिवीक्षा व अनुचिंतन संस्था" किंवा "डिस्ट्रिक्ट प्रोबेशन व आफ्टरकेअर असोसिएशन" ह्या जिल्हासंस्था त्या त्या जिल्ह्यांतील बालककल्याणाचें जणूं केंद्रच बनतात. कारण त्या संस्था जागोजाग स्वीकारकेंद्रेंच चालवितात, असें नाहीं तर, चांगल्या मुलांची राहण्याची व्यवस्था करतात. जीं मुलें बालसुधार शाळांतून शिकून आलेलीं आहेत त्यांच्याकरितां वसतिगृहे चालवितात व यासारखीं या क्षेत्रांतील अनेक कामें करतात. पुणें जिल्हा संस्थेनें उन्मार्गी व मागासलेल्या मुलांच्याकरितां नुकतेंच "बालमार्गदर्शन-केंद्र" उघडलें आहे. ह्या केंद्रांत मुलामुलींचें बुद्धिमापन करून त्यांच्या स्वभावांत खोल रुजलेलीं उन्मार्गीपणाची कारणें

शोधण्यांत येतात. आजपर्यंत अशी कल्पना होती कीं माणूस वयानें वाढत गेला म्हणजे त्याची बुद्धीहि वाढत जाते, पण शास्त्रानें हें खोटें ठरविलें आहे. एखादा माणूस सोळा वर्षांचा झाला तरी त्याचें बौद्धिक वय पांच वर्षांचेंच राहिलें असेल. म्हणून माणसाचें कालनिदर्शक वय व बौद्धिक वय किती व त्यामध्यें अंतर किती हें पाहण्याकरितां अनेक बुद्धिमापन कसोट्या ठरविल्या गेल्या आहेत. त्या कसोट्यांवरून ( Mental tests )माणसाचा बुद्धिनिर्देशांक (Intelliegence Quotient) काढतां येतो. ह्या बालमार्गदर्शन केंद्रांचा फायदा शाळा, मुलांचीं न्यायालयें व गरजू पालक या सर्वांना होतो. आतांपर्यंत पुणें व मुंबई येथें चाललेल्या या कामाचा आढावा पाहिला तर पुढील प्रकारच्या मुलांच्याबाबत बालमार्गदर्शन-केंद्र उपयोगीं पडल्याचें दिसतें. (१) अस्थिर स्वभावाचीं मुलें—पळून जाणारीं वगैरे. (२) थोड्या प्रमाणांत आंकडी, अपस्मार इ. असलेली. ( ३ ) भावनाविवश, तापट, हट्टी वगैरे. ( ४ ) बुद्धीनें मागासलेलीं. ( ५ ) वांड, दंगेखोर, न ऐकणारीं. ( ६ ) शाळेंत मागासलेलीं. ( ७ ) चोरीची संवय असलेली. अशा तऱ्हेच्या मुलांच्या बाबतींत बालमार्गदर्शन—केंद्रांना पुष्कळच करण्यासारखें आहे. बालमार्गदर्शन केंद्रांना खालील स्वरूपाचें काम करावें लागतें. बुद्धीनें मागासलेलीं मुलें शोधून काढून त्यांना योग्य असें शिक्षण कोणतें हें शोधणें. ज्या मुलांच्या व्यक्तित्वामध्यें कांहीं बिघाड झाला आहे, [ उदाहरणार्थ अत्यंत भित्रीं व अत्यंत लाजाळू मुलें ] किंवा ज्या मुलांच्या शारीरिक व्यवस्थेमध्यें मानसशास्त्रीय कारणामुळें बिघाड झाला आहे [उदाहरणार्थ, रात्रीं अंथरूण भिजविण्याची संवय, किंवा अंगठा चोखण्याची संवय, किंवा हाताची कायम हालचाल करण्याची संवय, किंवा बोबडें वा तोतरें बोलण्याची संवय, असणारीं मुलें ] शिवाय ज्यांना लहानमोठ्या वाईट खोडी लागल्या आहेत [ उदाहरणार्थ दंगेखोरपणा, खोडकरपणा, हस्तमैथुन, चोरी वगैरे. ] त्यांना उपचार करणें. मुलें केंद्रांत आल्यावर त्यांचा घरचा, शाळेंतला व बाहेरचा सर्व व्यवहार चोखंदळपणें पाहून त्यांच्या खोडीची चिकित्सा केली जाते व आईबाप व शिक्षक यांच्या सल्लामसलतीनें योग्य उपाययोजना केली जाते. अशा तऱ्हेच्या केंद्रांना शरीरशास्त्रज्ञ, मानसशास्त्रज्ञ व मनोव्यथाशास्त्रज्ञ यांचें सहाय्य आवश्यक आहे.

अशा तऱ्हेनें जिल्हा परिवीक्षा व अनुचिंतन संस्था ह्या जिल्ह्यांतील बालककल्याण–चळवळीचें केंद्र बनतात व जागोजाग, तालुक्याचे ठिकाणीं आपलें काम वाढविण्याचा प्रयत्न करतात. मुलांचें न्यायालय सोडलें तर बाकी सर्व व्यवस्था खासगी कार्यकर्त्यांची असते. मुलांचें न्यायालय हींसुद्धां प्रथम सामाजिक, मानसशास्त्रीय, शैक्षणिक व नंतर कायदेविषयक संस्था आहे. मुलांच्या न्यायालयांत मुलाचें कल्याण हा सर्वांत महत्त्वाचा भाग आहे. कायद्याचें कलम हा नाहीं. मुलांच्या न्यायालयांत काम करणारे न्यायाधीश हे कायद्यांचे तज्ज्ञ असतात. पण त्यांना मुलें, त्यांचें मन, त्यांच्या अडचणी याची पूर्ण कल्पना असावी तेवढी असतेच असें नाहीं. शिवाय ह्या न्यायाध्यक्षांना आठवड्यांतील पांच दिवस फौजदारी वा दिवाणी कोर्टांत काम करायचें असतें व केवळ एक दिवस त्यांना मुलांच्या न्यायालयांत यावें लागतें. मानसशास्त्राच्या नियमाप्रमाणें पांच दिवस झालेले संस्कार ते सहाव्या दिवशीं इच्छा असूनसुद्धां विसरूं शकत नाहींत व मधून मधून त्यांच्या स्वभावांतला कायदेखोरपणा जागा होत असतो. त्या न्यायाधिशांनीं आपल्या कोर्टांत समोर हें वाक्य लिहून ठेवावें कीं " मुलांचें कल्याण हा ह्या कामाचा पहिला हेतु आहे " हें कोणी विसरतां कामा नये कीं कायदे हे माणसांच्या करितां आहेत, माणसें कायद्याकरितां नाहींत. कायदे माणसानें निर्माण केलेले आहेत व ते समाजाच्या प्रगतीच्या आड येऊं लागतील तर ते बदलायला लागतील. वस्तुतः योग्य व्यवस्था असावी म्हणून मुलांच्या न्याया-लयांतील न्यायाध्यक्ष व सन्मान्य स्त्री न्यायाधीश ह्यांनीं ह्या विषयाचा अभ्यास करणें अगत्याचें आहे. ह्या दिशेनें कांहीं पावलें उचललीं जात आहेत, हें येथें नमूद करणें अवश्य आहे. जी गोष्ट न्यायाधिशांची तीच गोष्ट पोलिस अधिकाऱ्यांची. त्यांनींहि आपला दृष्टिकोन शक्य तितक्या लवकर बदलायला हवा. पोलिसखातें हें केवळ संरक्षक खातें नाहीं, नागरिकांच्या जीवनांत स्वास्थ्य व सुख निर्माण करण्याकारितां अनेक दिशांनीं त्यांना प्रत्यक्ष विधायक कार्य करतां येते; व अशा तऱ्हेचें कार्य सुरूहि होत आहे. मुलांच्या न्याया-लयापुढें येणारीं मुलें हीं गुन्हेगार नाहींत, तीं वाट चुकलेलीं आहेत हें ध्यानांत घेऊन त्यांच्याशीं वागायला हवें. मुलांचा कायदा व तत्सम इतर कायद्यांची अंमलबजावणी करण्याकारितां " बालसहाय्य पोलिस–दल ( Juvenile Aid

Police Unit ) उभारणें अगत्याचें आहे. असें दल मुंबई शहरांत स्थापन झालें आहे.

ह्या जिल्हा–संस्था स्वीकारकेंद्र, बालन्यायालय व क्वचित् बालमार्गदर्शन-केंद्र चालवतात. याशिवाय कांहीं खासगी जिल्हा–संस्था सुयोग्य संस्था म्हणून ( Fit Person Institutions ) सरकारमान्य झालेल्या असतात. " सुयोग्य संस्था " याचा अर्थ असा कीं उपेक्षित व गरजू मुलांचा प्रतिपाल करण्याकरितां जी संस्था योग्य आहे ती. जिल्हा–संस्था "सुयोग्य" म्हणून जर मान्य झाली असेल तर जागोजागचीं मुलांचीं न्यायालयें त्या संस्थेंत ठेवण्याकरितां मुलें पाठवितात व ती जिल्हा–संस्था त्यांच्या शिक्षण व नोकरीधंद्याची व्यवस्था करते. याशिवाय जिल्हा–संस्था ह्या पुष्कळदां "अनुचिंतन वसतिगृहें" चालवितात. मुलांच्या न्यायालयांनीं जागोजाग शाळांमध्यें जीं मुलें पाठविलेलीं असतात, त्यांचें शिक्षण पूर्ण झाल्यावर त्यांनीं पुढें काय करायचें हा प्रश्न पुष्कळदां उद्भवतो. समजा, श्रीधर नांवाचा बेवारशी मुलगा आहे. मुलाचें न्यायालय त्याच्या शिक्षणाकरितां त्याला शाळेंत पाठवतें. शाळेंत तो नेहमींचे वा इतर कोणतें तरी धंदेशिक्षण घेतो पण त्याचें शिक्षण पूर्ण झाल्यावर त्यानें कोठें जायचें? कोठें राहायचें ? त्याला नोकरी कोणी पाहायची ? त्याच्या लग्नाची खटपट कशी व्हायची ? ह्या प्रश्नांचें उत्तर म्हणजे अनुचिंतन वसतिगृह. ह्या वसतिगृहांत त्याला राहायला जागा व खाणें मिळतें व त्याच्या नोकरीची खटपट तेथील परिवीक्षाधिकारी करतो. पण हा प्रश्न तितकासा यशस्वी रीतीनें सुटूं शकत नाहीं ह्याला अनेक कारणें आहेत. एक तर शिक्षणानें मुलांच्या आशा-आकांक्षा पालवलेल्या असतात, पण व्यवहाराच्या झळीमध्यें त्या टिकूं शकत नाहींत. शिवाय समाजामध्यें अजूनहि ह्या मुलांच्याकडे पाहायचा जुनाट दृष्टिकोन म्हणावा तितका बदललेला नाहीं. त्यामुळें अजूनहि, आमच्या संस्था, शाळा, न्यायालयें, केंद्रें व आम्ही व्यावसायिक कार्यकर्ते ह्यांच्याकडे एक प्रकारच्या भीतियुक्त तुच्छतेनें पाहिलें जातें, व शाळेला " गुन्हेगारांची शाळा " म्हणण्यांत येतें. हें लक्षांत ठेवायला हवें कीं मुलांचा कायदा हा गुन्हेगारांच्याकरितां केलेला कायदा नाहीं, तो अडचणींत सांपडलेल्या, गरजू, उपेक्षित व उन्मार्गी मुलांच्याकरितां केलेला कायदा आहे व गरजू, उपेक्षित, गरीब व उन्मार्गी असणें हा कोणत्याहि मुलाचा अपराध असूं शकत नाहीं.

अशा तऱ्हेच्या जिल्हा-संस्था जिल्हाभर आपल्या कामाचें जाळें विणतात, व मुलांच्या कायद्याबरोबरच मुलांच्या बाबतींतले इतर जे सामाजिक कायदे आहेत त्यांचें काम पाहूं लागतात. " बोर्स्टल शाळेचा कायदा " व " अपराध्यांच्या जामिनकीबाबत कायदा" (Probation of Offender's Act) ह्या कायद्यान्वयें जें मुलें व कुमारांच्याबाबत सुधारणेचें काम केलें जातें त्यांत मदत करूं लागतात.

या संस्थांमधून व मुलांच्या न्यायालयांतून काम करणारे जे परिवीक्षाधिकारी आहेत त्यांना ह्या सर्व क्षेत्रांत फार महत्त्व आहे, कारण मुलाच्या आयुष्याला वळण लावण्याचें जबाबदारीचें काम त्यांना करायचें असतें. हें काम करण्याकरितां लागणारें शास्त्रीय व तांत्रिक ज्ञान त्यांना असणें अवश्य आहे. मुलगा हा उपजत गुन्हेगार नसतो, चुकलेल्या मुलाला सुधारणें ही समाजाची जबाबदारी व कर्तव्य आहे हें सांगणाऱ्या समाजसेवेच्या तत्त्वज्ञानावर त्यांची असीम श्रद्धा असायला हवी. नाहींतर श्रद्धा व ज्ञानाविना समाजकार्य म्हणजे सुकाणूं व शीड नसलेली नाव आहे, ती फुटायचाच संभव जास्त. हें टाळण्याकरितां जिल्हासंस्थांमध्यें काम करण्याकरितां सरकारी परिवीक्षाधिकारी पाठविले जातात. हे परिवीक्षाधिकारी बहुधा सरकारनें नेमलेले असतात. कांहीं ठिकाणीं जिल्हा संस्थानी खाजगी रीतीनें परिवीक्षाधिकारी नेमलेले आहेत. अशा प्रोबेशन ऑफिसर्सची विभागणी पुढीलप्रमाणें आहे:-(४३ सरकारी, १२ खासगी,एकूण ५५)नवा प्रत्येक परिवीक्षाधिकारी निदान पदवीधर असावा अशी अपेक्षा आहे. परंतु केवळ पदवीधर असून भागत नाहीं तर समाजसेवेच्या तंत्राचें त्यांना शिक्षण मिळावें लागतें. हिंदुस्थानांत टाटा इन्स्टिट्यूट ऑफ सोशल सायन्सेस, समाजसेवा शिक्षण विद्यालय, बडोदा, दिल्ली, काशी विद्यापीठ वगैरे ठिकाणीं समाजसेवेचें शिक्षण दिलें जातें. अशा समाजसेवेच्या तंत्राचें ज्ञान घेतलेल्या कार्यकर्त्यांची अधिक गरज असल्यामुळें आज काम करीत असलेल्या कार्यकर्त्यांना शिकविण्याकरितां " जुवेनाईल व बेगर्स " खात्याच्या वतीनें एक शिक्षणक्रम आखण्यांत आलेला आहे. हा अभ्यासक्रम केवळ काम करणाऱ्या अनुभवी लोकांकरितां आहे. ( In service training course ).

समाजसेवा ही लोकांच्या सहकार्याशिवाय कधींच यशस्वी होऊं शकत नाहीं व हा मुख्य फरक " जुवेनाईल व बेगर्स खातें " आणि इतर सर-

कारी खातीं यांमध्यें आहे. ह्या खासगी संस्थांना मदत म्हणून सरकारी परिवीक्षाधिकारी पाठविले जातात व जवळ जवळ ९०% आर्थिक मदत सरकार देतें. ती मदत खालील पद्धतीनें वांटली जाते. स्वीकारकेंद्रांत दाखल झालेल्या प्रत्येक मुलामागें दररोज एक रुपया किंवा महिन्याचे तीस रुपये, "सुयोग्य संस्था" म्हणून एखादी संस्था मानली गेली असेल तर तेथील प्रत्येक मुलामागें दरमहा अठरा रुपये, ह्याशिवाय शिक्षण, वैद्यकीय मदत, अगदीं लहान मुलें ( रांगतीं ), मुलींना संरक्षण देण्याचें कार्य ह्याकरितां वेगळी मदत देण्यांत येतें. ह्या सर्व जिल्हा-संस्थांना मार्गदर्शन व मदत करण्याकरितां मुंबई प्रांतिक प्रोबेशन व आफ्टरकेअर असोसिएशनची स्थापना झाली आहे. ही निमसरकारी संस्था असून त्याचे अध्यक्ष, उपाध्यक्ष व खजिनदार हे खाजगी कार्यकर्ते असतात. संस्थेचे चिटणीस मात्र पदसिद्ध सरकारी अधिकारी ( चीफ इन्स्पेक्टर ) असतात. थोडक्यांत म्हणजे खासगी संस्था व व्यक्ती यांची तळमळ, सरकारची आर्थिक मदत व ज्ञानाच्या पार्श्वभूमीवर काम करणाऱ्या कार्यकर्त्यांचें तांत्रिक ज्ञानह्याचा समन्वय म्हणजेच मुंबई प्रांतांतील बालक–कल्याण–कार्य.



: ९ :

# सरकारी यंत्रणा

अनाथ, गरजू व उपेक्षित मुलांच्याकरितां संमत-शाळा चालविणें, त्यांची व्यवस्था पाहणें व त्या मुलांना शक्य तों मदत करणें ह्याकरितां मुंबई सरकारनें जुवेनाईल आणि बेगर्स या नांवाचें एक खातें सुरू केलें आहे. हें खातें पूर्वी मागासलेल्या जमातींच्या खात्यामध्यें समाविष्ट केलेलें होतें. परंतु जून १९४७ मध्यें त्याचें स्वतंत्र खातें बनविण्यांत आलें आहे. या खात्याच्या वतीनें मुख्यतः खालील कायद्यांच्या बाबत कामकाज करण्यांत येतें. मुंबई मुलांचा कायदा, बोर्स्टल स्कूल कायद्याची चौकशी, व अनुचिंतनाचें काम, मुंबई भिकाऱ्याचा कायदा, प्रोबेशन ऑफ ऑफेन्डर्स ॲक्ट, व सराईत गुन्हेगारांचा कायदा. या खात्याचे प्रमुख म्हणून चीफ इन्स्पेक्टर ऑफ सर्टिफाइड स्कूल्स, चीफ इन्स्पेक्टर ऑफ सर्टिफाइड इन्स्टिटय़ूशन्स, रेक्लेमेशन आफिसर व सेक्रेटरी मुंबई राज्य परिवीक्षा व अनुचिंतन संस्था यांची नेमणूक झाली आहे. या खात्याची कारभाराच्या सोईनें चार भागांत विभागणी केली आहे. पहिल्या भागाला मुलांच्या कायद्याचा विभाग असें म्हटलें जातें. ( जुवेनाईल ब्रँच ) या विभागामध्यें मुलांच्या कोर्टाच्या कामकाजावरील देखरेख, रिमांड होम्स किंवा स्वीकार-केन्द्राची तपासणी, सरकारी संमत-शाळांची व्यवस्था,

( सर्टिफाइड स्कूल्स ) खाजगी संमत शाळांची व सुयोग्य संस्थांची तपासणी, अनुचिंतन छात्रालयांची किंवा आफ्टर-केअर हॉस्टेल्स तपासणी, सुयोग्य संस्थांना ग्रँटच्या रूपानें आर्थिक मदत व मुलांच्या कायद्यान्वयें येणाऱ्या अधिकारांचें पालन, हीं कामें मुख्यतः केलीं जातात. दुसरा विभाग जिल्हा-संस्थाचा असून त्याला असोसिएशन ब्रँच असें म्हणतात. या विभागामध्यें रिमांड होम्स काढणें, चालविणें, मुलांच्या कोर्टाचें काम, अनुचिंतन वसतिगृहें काढणें, चालविणें, देखरेखीखालीं सोडलेल्या मुलांची व्यवस्था व कांहीं ठिकाणीं सुटलेल्या कैद्यांना मदत हीं कामें पाहिलीं जातात. वरील दोनहि विभागांचे मुख्य म्हणून चीफ इन्स्पेक्टर ऑफ सर्टिफाइड स्कूल्स व इन्स्पेक्टर ऑफ सर्टिफाइड स्कूल्स हें काम बघतात. असोसिएशन विभागामध्यें हेच गृहस्थ सेक्रेटरी व असिस्टंट सेक्रेटरी ( मुंबई राज्य परिवीक्षा व अनुचिंतन संस्था ) ह्या नात्यानें काम करतात. तिसरा विभाग " मुंबई भिकाऱ्यांचा कायदा " ह्या कायद्याची अंमलबजावणी करतें, त्याअन्वयें भिकाऱ्यांच्या पुन:स्थापनेकरितां संस्था चालविणें व तदनुषंगिक कामें केलीं जातात. चौथा विभाग सराईत गुन्हेगारांच्या कायद्याची अंमलबजावणी व सराईत गुन्हेगारांच्या करितां संस्था चालविणें हीं कामें करतो. वरील दोनहि विभागांचीं कामें चीफ इन्स्पेक्टर ऑफ सर्टिफाइड इन्स्टिटयूशन्स व इन्स्पेक्टर ऑफ सर्टिफाइड इन्स्टिटयूशन्स हे प्रमुखपणानें पाहतात. चौथ्या विभागाकरितां हेच गृहस्थ रिक्लमेशन ऑफिसर व असिस्टंट रिक्लमेशन ऑफिसर ह्या नात्यानें काम पाहतात. ह्या खात्याचें कार्यक्षेत्र किती वाढलें आहे ह्याची, खालील माहितिवरून स्पष्ट कल्पना येईल ( १९५३ ) संमत शाळा ( सर्टिफाइड स्कूल्स ) = २७. संमत शाळांत असणारी मुलें = २८६८. सुयोग्य संस्था ( फिट पर्सन इन्स्टिटयूशन्स ) = ९९. मुलांच्या कोर्टाच्यापुढें आलेल्या 'केसेस' ची संख्या = ११७२८. प्रोबेशन ऑफिसर्स = ४७. चीफ ऑफिसर्स = ५. मुलांचीं कोर्टें = ३१. स्वीकारकेंद्रें ( जिल्हा संस्थांनीं चालविलेलीं ) = ३०. स्वीकारकेंद्रें ( इतर संस्था ) = १९..

राज्यकारभाराच्या सोईनुसार खात्याच्या कामाची विभागणी खालीलप्रमाणें केलेली आहे:—




मुलांचा कायदा सुरू झाल्याला २६ वर्षें झालीं असलीं तरी हें खातें स्वतंत्र झाल्याला जून १९५४ मध्यें ७ वर्षें होतील. ह्या वर्षीच हें खातें कायम झालें ( १९५३ ) परंतु या थोड्या अवधींत सुद्धां ह्या खात्याच्या कामाचा पसारा खूपच वाढलेला आहे. ह्याची कल्पना खालील आंकड्यांवरून येईल.

हे आंकडे १९४१ पासून १९५१ पर्यंत, गेल्या दहा वर्षांत काम किती वाढलें हें दाखवितात.

| नांव | १९४१-४२ | १९५१ |
|---|---|---|
| संमतशाळा | १९ | २६ |
| संमतशाळांमधील मुलें | १६६१ | १७६० |
| सुयोग्य संस्था | २० | ८२ |
| देखरेखीखालीं सोडलेल्या मुलांची संख्या | १०७ | ३३९ |
| मुलांच्या कोर्टापुढें आलेल्या मुलांची संख्या | ३२५६ | ९९४७ |
| देखरेखीखालीं कोर्टानें सोडलेल्या मुलांची संख्या | ३८८ | ५३३ |
| प्रोबेशन ऑफिसर्स | ११ | ४२ |

मुलांच्या कायद्याची अंमलबजावणी अधिक चांगली व्हावी म्हणून खालील दिशेनें प्रयत्न केले जातात. संस्थांची तपासणी अधिक काळजीपूर्वक व नेहमीं केली जाते. अडचणींत असलेल्या मुलांचा पूर्वेतिहास शक्य तितक्या सखोल रीतीनें अभ्यासिला जातो. खाजगी संस्थांना जास्तींत जास्त आर्थिक मदत दिली जाते व बिनसरकारी सामाजिक कार्यकर्त्यांची मदत जास्तींत जास्त घेतली जाते. संमतशाळांमध्यें शिक्षणाचा दर्जा वाढविण्याचा प्रयत्न केला जातो. तेथें मुलांच्या मनोरंजनाची व्यवस्था करण्यांत येते. व्यवसायात्मक उपचार ( Occupational Therapy ) व बालमार्गदर्शन–केन्द्र ( Child-Guidance clinic ) याच्या सोई वाढविण्यांत येतात. मुली व कुमार्गाला लागलेल्या स्त्रिया यांना मदत करणाऱ्या संस्थांना अधिक आर्थिक मदत दिली जाते. १९२४ पेक्षां १९४८ च्या मुलांच्या कायद्यांत मुलांना संरक्षण देण्याच्या दृष्टीनें कांहीं कलमें घालण्यांत आलीं आहेत. ह्या कलमांचा जास्तींत जास्त व अधिक चांगला उपयोग केला जातो.

रिमांड होम्स जवळ जवळ १९ जिल्ह्यांत स्थापन झालेलीं असून पुणें, अहमदनगर, नाशिक, धारवाड, सोलापूर, विजापूर व भडोच या जिल्ह्यांत तालुक्याच्या गांवींसुद्धां कांहीं रिमांड होम्स सुरू करण्यांत आलीं आहेत. अशा रिमांड होम्सची संख्या ३१ आहे. परंतु कांहीं मुलांना ह्या रिमांड होममध्यें ठेवणें शक्य नसतें. विशेषतः मुलींच्या बाबतींत हा प्रश्न अधिक तीव्रतेनें जाणवतो. सुमारें १९ सस्थांना रिमांड होम्स म्हणून मान्यता देण्यांत आली आहे. सरकारतर्फे एकहि रिमांड होम चालविण्यांत येत नाहीं. हीं सर्व रिमांड–होम्स जिल्हा–परिवीक्षा व अनुचिंतन संस्था या निमसरकारी

संस्थांच्या वतीनें चालविण्यांत येतात. बहुतेक ठिकाणीं मुलांचें कोर्ट हें रिमांड होममध्येंच भरतें व जिल्हा–संस्थेच्या कार्याचा एक भाग म्हणून तें मानलें जातें. सुरवातीला दिलेल्या तक्त्यावरून मुलांच्या कोर्टापुढें येणाऱ्या मुलांची संख्या किती वाढत आहे ह्याची स्पष्ट कल्पना येईल. खालील ठिकाणीं रिमांड–होम्स आहेत.

| जिल्हा | रिमांड होम | | चालक |
|---|---|---|---|
| १. मुंबई शहर | ( अ ) मुलांकरितां<br>( ब ) मुलींकरितां | चिल्ड्रन्स होम उमरखाडी | चिल्ड्रन्स एड सोसायटी, मुंबई |
| | ( अ ) मुलांकरितां<br>( ब ) मुलींकरितां | चिल्ड्रन्स होम चेंबूर | चिल्ड्रन्स एड सोसायटी, मुंबई |
| | ( क ) १० वर्षांखालील मुलामुलीं-करितां हिंदु दीनदया संघ, सायन, मुंबई. | | |
| | ( ड ) मुलींकरितां ( १ ) बॉम्बे प्रेसिडेन्सि वुइमेन्स कौन्सिल रिस्क्यू होम. ( २ ) श्रद्धानंद अनाथ महिलाश्रम, माटुंगा. | | |
| | ( इ ) हॅपी होम फॉर दी ब्लाइंड, वरळी, मुंबई. | | ( अंध मुलांकरितां ) |
| २. अहमदाबाद | ( अ ) मुलांकरितां, रिमांड–होम, अहमदाबाद<br>( ब ) मुलींकरितां ( १ ) विकास गृह, अहमदाबाद. ( २ ) आर्. एस्. महिपतराव रुपराम, अनाथाश्रम | | डिस्ट्रिक्ट प्रोबेशन आणि आफ्टर-केअर असोसिएशन अहमदाबाद |
| ३. सुरत | ( अ ) मुलांकरितां<br>( ब ) मुलींकरितां | रिमांड–होम | चाइल्ड प्रोबेशन सोसायटी ॲण्ड डिस्ट्रिक्ट प्रोबेशन ॲण्ड आफ्टर-केअर असोसिएशन, सुरत. |

| | | |
|---|---|---|
| ४. पुणें | ( अ ) मुलांकरितां रिमांड–होम | डिस्ट्रिक्ट प्रोबेशन |
| | ( ब ) मुलींकरितां रिमांड–होम | ॲण्ड आफ्टर– |
| | ( क ) पांच वर्षांखालील मुलांकरितां के. इ. एम्. हॉस्पिटल, पुणें. ८ वर्षांखालील मुलामुलींकरितां | केअर असोसिए-शन, पुणें. |
| | ( ड ) हिंदु वुइमेन्स रिस्क्यू होम पुणें, ( २ ) महिला सेवाग्राम. | |
| | ( इ ) अनाथ पंगू पुणें. पुणें, नं. ४ | |
| बारामती | ( १ ) मुलांकरितां रिमांड होम, | बारामती (प्रादेशिक संस्था) |
| ५. सोलापूर | ( अ ) मुलांकारितां रिमांड होम. | डिस्ट्रिक्ट प्रोबेशन |
| | ( ब ) मुलींकरितां सर्टिफाइड स्कूल, सोलापूर. | ॲण्ड आफ्टरकेअर असोसिएशन सोलापूर |
| पंढरपूर | ( अ ) ८ वर्षांवरील मुलांकारितां रिमांड होम पंढरपूर. | (प्रादेशिक संस्था) पंढरपूर. |
| | ( ब ) मुलींकरितां व ८ वर्षां-खालील मुलांकरितां डब्ल्यू. बी.एन्.ऑर्फनेज पंढरपूर. | |
| ६. सातारा | ( अ ) मुलांकरितां रिमांड होम. | डिस्ट्रिक्ट प्रोबेशन |
| | ( ब ) मुलींकारितां लक्ष्मीबाई पाटील वसतिगृह, सातारा | ॲण्ड आफ्टर-केअर असोसिएशन,सातारा |
| ७. अहमदनगर | ( अ ) मुलांकरितां रिमांड होम | डिस्ट्रिक्ट प्रोबेशन |
| | ( ब ) मुलींकारितां रिमांड होम. | ॲण्ड आफ्टर-केअर असोसिएशन अहमदनगर. |
| श्रीरामपूर | ( अ ) मुलांकरितां रिमांड होम, श्रीरामपूर श्रीरामपूर. | ( प्रादेशिक संस्था ) |

| जिल्हा | रिमांड होम | चालक |
|---|---|---|
| संगमनेर | ( ब ) मुलांकरितां रिमांड होम संगमनेर. | संगमनेर ( प्रादेशिक संस्था ) |
| ८. धारवाड | ( अ ) मुलांकरितां रिमांड होम, धारवाड | डिस्ट्रिक्ट प्रोबेशन ॲण्ड आफ्टर–केअर असोसिएशन, धारवाड |
| गदग | ( ब ) मुलांकरितां रिमांड होम, गदग | ,, |
| राणीबेन्नूर | ( अ ) मुलांकरितां रिमांड होम, राणीबेन्नूर | ,, |
| हुबळी | ( अ ) मुलांकरितां रिमांड होम, हुबळी | ,, |
| | ( ब ) मुलींकरितां रिमांड होम, हुबळी | ,, |
| लक्ष्मेश्वर | ( अ ) मुलांकरितां रिमांड होम | ,, |
| ९. बेळगांव | ( अ ) मुलांकरितां रिमांड होम, ( ब ) मुलींकरितां मागासलेल्या मुलींच्याकरितां वसतिगृह, बेळगांव | डिस्ट्रिक्ट प्रोबेशन ॲण्ड आफ्टर–केअर असोसिएशन, बेळगांव |
| १०. विजापूर | ( अ ) मुलांकरितां रिमांड होम, ( ब ) मुलींकरितां हरिजन कन्या मंदिर, विजापूर | डिस्ट्रिक्ट प्रोबेशन ॲण्ड आफ्टर–केअर असोसिएशन, विजापूर |
| बागलकोट | ( अ ) मुलांकरितां रिमांड होम, बागलकोट | बागलकोट ( प्रादेशिक संस्था ) |
| ११. सांगली | ( अ ) मुलांकरितां | डि. प्रो. व आ. के. संस्था दक्षिण सातारा |
| १२. धुळें | ( अ ) ,, | धुळें |

| जिल्हा | रिमांड होम | चालक |
|---|---|---|
| १३. नाशिक | ( अ ) मुलांकरितां रिमांडहोम<br>( ब ) मुलींकरितां नाशिक | डिस्ट्रिक्ट प्रोबेशन ॲण्ड आफ्टर–केअर असोसिएशन, नाशिक |
| मनमाड | ( अ ) फक्त मुलांकरितां रिमांड होम, मनमाड | मनमाड ( प्रादेशिक संस्था ) |
| १४. बडोदा | ( अ ) मुलांकरितां रिमांड होम<br>( ब ) मुलींकरितां रिमांड होम | डिस्ट्रिक्ट प्रोबेशन ॲण्ड आफ्टर–केअर असोसिएशन, बडोदा |
| १५. भडोच | ( अ ) मुलांकरितां रिमांड होम, | प्रोबेशन ॲण्ड आफ्टर-केअर असोसिएशन, भडोच |
| राजपिपला | ( अ ) मुलांकरितां रिमांड होम, राजपिपला | राजपिपला |
| जंबुसार | ( अ ) जंबुसार | जंबुसार |
| १६. कारवार | ( अ ) मुलांकरितां } रिमांड होम,<br>( ब ) मुलींकरितां } कारवार | डिस्ट्रिक्ट प्रोबेशन ॲण्ड आफ्टर–केअर असोसिएशन, कारवार |
| १७. ठाणा(भिवंडी) | (अ) मुलांकरितां रिमांड होम, भिवंडी | डिस्ट्रिक्ट प्रोबेशन ॲण्ड आफ्टर–केअर असोसिएशन, ठाणा |
| १८. कोल्हापूर | ( अ ) मुलांकरितां रिमांड होम, कोल्हापूर<br>( ब ) मुलींकरितां करवीर अनाथाश्रम, कोल्हापूर | डिस्ट्रिक्ट प्रोबेशन ॲण्ड आफ्टर–केअर असोसिएशन, कोल्हापूर |
| १९ जळगांव पूर्व खानदेश | ( अ ) मुलांकरितां } रिमांड होम,<br>मुलींकरितां } जळगांव | डिस्ट्रिक्ट प्रोबेशन ॲण्ड आफ्टर–केअर असोसिएशन, जळगांव |

मुलांच्या कायद्याचें संरक्षणात्मक ( प्रकरण ४ थें ) प्रतिकारात्मक ( प्रकरण ६ वें ) व अपराधी मुलांबाबत ( प्रकरण ७ वें ) असे तीन भाग करण्यांत आलेले आहेत. त्यांच्या १९५०–५१ सालांतील तुलनात्मक आंकड्यांवरून या कायद्याचा कसा सदुपयोग होतो हें लक्षांत येईल.

| | संरक्षणात्मक | | प्रतिकारात्मक | | अपराधी मुलाबाबत | |
|---|---|---|---|---|---|---|
| १९०–५१ | मुलें | मुली | मुले | मुली | मुलें | मुली |
| | २४३३ | ८१८ | ३० | २०५ | ४२३२ | ३०३ |

वरील तुलनात्मक आंकडेवारीवरून मुलांच्या कायद्याच्या प्रतिकारात्मक उपाययोजनेचा मुलींच्याबाबत किती चांगला उपयोग होत आहे हें चांगलें लक्षांत येईल. १९४८ पासून ५१ पर्यंतचे आंकडे तपासले तर असें दिसतें कीं ४८ सालीं ३८·७५ केसेस् संरक्षणात्मक कलमाखालच्या होत्या. त्या ५१ सालीं ४०·०८ पर्यंत वाढलेल्या आहेत. प्रतिकारात्मक कलमांखालच्या १·१८ पासून २·९० पर्यंत वाढलेल्या आहेत व अपराधी मुलांच्या कलमाखालच्या केसेस ६०·०७ पासून ५७·०२ पर्यंत घटलेल्या आहेत. ह्याचा उघड अर्थ असा आहे कीं वेळच्या वेळीं उपाययोजना केल्यास पुढें अपराधी होणारी मुलें वांचलीं जातील. याच संदर्भात खालील आंकडेवारी पाहणें मनोरंजक ठरेल.

ज्या ठिकाणाहून हीं मुलें आलीं त्यांचाहि विचार करणें आवश्यक आहे. त्याचें वर्गीकरण खालीलप्रमाणें:—

| इतर प्रांत | | भारतीय संस्थानें | | परदेश | | अज्ञात | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| मुलें | मुली | मुले | मुली | मुलें | मुली | मुलें | मुली |
| ७५४ | ७० | २५९ | ३५ | ३० | ६ | ० | ० |

एकूण ६६९५ मुलें व १४१६ मुली ह्यांच्या केसेसचा अहवालाचे सालीं विचार करण्यांत आला. त्यापैकीं वरील मुलें व मुली परप्रांतीय वा परदेशांतील होतीं. मुलांच्या कोर्टापुढें आलेल्या मुलांच्यामध्यें आढळून येणाऱ्या

शारीरिक रोगाचें वर्गीकरण खालीलप्रमाणें आहे. मानसिक रोगामध्यें वेडे–२–, मनोदुर्बल–१४, अपस्मार–८, इतर मनोव्यथा–१. शारीरिक रोगामध्यें पूर्ण आंधळे–११ मुलें, दृष्टि फारच कमी असलेलीं अगर १ च डोळा असलेलीं–७ मुलें, मुकीं व बहिरीं १३ मुलें, लैंगिक रोगानें पछाडलेलीं–३२३ मुलें, क्षयी–४ मुलें व इतर रोगानें–६ मुलें, अशी वर्गवारी आहे.

मुलें मुलांच्या कोर्टासमोर ज्या वेळीं येतात त्या वेळीं त्यांच्या येण्याचें कारण शोधलें तर समाजांतील आजच्या परिस्थितीवर व मुलांची होणारी आबाळ, व उद्वेगजनक उपेक्षा ह्यावर चांगला प्रकाश पडेल.

| संरक्षणात्मक उपाययोजना | प्रतिकारात्मक उपाययोजना | अपराधी मुलें |
|---|---|---|
| २२४७ घर नसलेलीं अगर भटकत असलेलीं | १८ मुलांना क्रूरपणानें वागविण्यांत येत होतें | १६९९ चोरी, घरफोडी तत्सम गुन्हे |
| ४०१ अनाथ, अनौरस अगर अयोग्य पालक असलेलीं | ४ना भीक मागायला लावलें होतें | ११७ मुली–“– |
| १५ दारूबाज व वेश्या यांच्या संगतींत असलेलीं | ३९ मुलें व ९ मुलींना फूस लावण्यांत आली होती | २६० जुगार |
| १४६ वेश्यागृहांत राहणारीं (यांत १४५ मुली आहेत.) | | |
| २६८ नैतिक अधःपाताकडे चाललेलीं | १४६ ची नोकरीच्या नांवाखालीं पिळवणूक होत होती | ५१४ रेल्वेच्या नियमांचा भंग |
| | १९ तत्सम उपाययोजना म्हणून ताब्यांत घेतले. | ७६ असभ्य वर्तन व विनयभंग |

| संरक्षणात्मक उपाययोजना | प्रतिकारात्मक उपाययोजना | अपराधी मुलें |
|---|---|---|
| १९५ न ऐकणारी<br>२९ देखरेखीचा भंग करणारी | | १० आत्महत्ये-चा प्रयत्न<br>१३ खून<br>५ बलात्कार<br>२ अनैसर्गिक गुन्हे<br>३० पळपुटी<br>१८९९ इतर कलमें |
| ३२४१ एकूण मुलें | २३५ एकूण मुलें | ४६२५ एकूण मुलें |

वरील सर्व मुलांपैकीं २११५ मुलांना आईबापांच्या ताब्यांत देण्यांत आलें, १६३१ मुलांना शाळेला पाठविण्यांत आलें, व इतरांना देखरेखी-खालीं अगर इतर मार्गानें सोडण्यांत आलें. वरील आंकडे ५०–५१ सालचे असून जेथें मुलांचीं कोर्टें आहेत तेथील कामकाजाबाबत आहेत.

कोर्टापुढें आलेल्या गरजू व उपेक्षित मुलांना कुठलाहि आर्थिक वा सामाजिक आधार नसेल, तरच त्या मुलांना संमत–शाळांतून औद्योगिक, शेतकी वा दुय्यम शालेय अभ्यासक्रमाकरितां पाठविण्यांत येतें. कोठल्याहि शाळेमध्यें मुलाला पाठविणें हा शेवटला उपाय मानला जातो. १९५०–५१ सालांतील मुलांची आंकडेवारी जर तपासली तर असें दिसतें कीं केवळ १८·३ इतक्याच मुलांना कोणत्या तरी संस्थेंत पाठविण्यांत आलें. आज-पर्यंत स्थापन झालेल्या शाळांची संस्था वाढून ती आतां २७ झाली आहे. शिवाय जेथें योग्य वाटेल तेथें रिमांड-होमलाच सुयोग्य संस्था म्हणून मान्यता देऊन तेथेंहि मुलें ठेवण्याची व्यवस्था केलेली आहे. मुंबई प्रांतांत ९ सरकारी व १७ खाजगी समंत–शाळा आहेत. या संस्थांतून मराठी, हिंदी, गुजराथी, कानडी व इंग्रजी ह्या भाषांचें शिक्षण तर दिलें जातेंच पण या शाळांचें वर्गीकरण करून कांहीं शाळांतून दुय्यम शिक्षण व कांहीं शाळांतून औद्योगिक शिक्षण व कांहीं शाळांतून शेती–शिक्षण दिलें जातें. त्याचें वर्गीकरण पुढीलप्रमाणें:—

| | नांव | उद्योग | वर्णन | संख्या मुलें—मुली |
|---|---|---|---|---|
| (१) | डेव्हिड ससून इंडस्ट्रिअल स्कूल, माहीम मुंबई १६ | शिवण, लोहारकाम, विणणें, बांबू-काम. बागकाम, सुतारकाम | औद्योगिक बंदिस्त शाळा १३ वर्षांवरील मुलांकरितां | ४१८—० |
| (२) | बैरामजी जिजिभाई होम किंग्ज सर्कल, माटुंगा, मुंबई १९ | विणणें, शिवणें, विणकाम, गायन, कागदकाम, बटनें बनविणें | शालेय शिक्षण घेणाऱ्या लहान मुलांकरितां | ७८—४७ |
| (३) | श्रद्धानंद अनाथ महिलाश्रम किंग्ज सर्कल, माटुंगा, मुंबई १९ | शिवणकाम, भरतकाम, खेळणीं बनविणें, विणणें, गायनं | अडचणींत सांपड-लेल्या व शिकणाऱ्या मुली | ८—६३ |
| (४) | साल्वेशन आर्मी गर्ल्स होम सायन, मुंबई | भरतकाम, विणकाम | ,, | १—११ |
| (५) | हॅपी होम फॉर दी ब्लाइंड बी. डी. डी. नं. ५२ वरळी, मुंबई. | शिवण, वेताचें काम, गायन | अंध मुलांची शाळा | ५—० |
| (६) | ए. डी. बावला मुस्लीम गर्ल्स ऑर्फनेज, ११ चिंचपोकळी रोड, मुंबई | कातर व शिवणकाम भरत-काम, कागदी फुलें बनविणें. | | ०—९ |
| (७) | चिल्ड्रन्स होम, चेंबूर, मानखुर्द, पोस्ट ट्रॉम्बे ग्रेटर बॉम्बे. | सुतारकाम, शिवण, ड्रॉइंग, विणणें, शेती व बागकाम. | | ३६२—० |

| | | | |
|---|---|---|---|
| (८) होम फॉर दी मेंटली डिफिशिअन्ट चिल्ड्रन...... चेंबूर, मानखुर्द, पोस्ट ट्रॉम्बे ग्रेटर बॉम्बे | विणकाम, भरतकाम, शिवण, बागकाम, कागद बनविणें. | बुद्धीनें मागसलेल्या मुलांच्याकरितां | ४८–१५ |
| (९) बॉम्बे प्रेसिडेन्सि वुइमेन्स कौन्सिल रिस्क्यू होम,... उमरखाडी, मुंबई ९ | भरतकाम, कातरकाम लाकडी खेळणीं बनविणें, कागदी काम, कातडी काम. | अडचणींत सांपडलेल्या मुलींच्याकरितां | ०–५० |
| (१०) सेंट कॅथरिन्स होम, अंबोवली, वरसोवा... ... रोड, अंधेरी, मुंबई | घरकाम, स्वयंपाक, बागकाम. | | १–२७ |
| (११) आर. एस. महिपतराम रुपराम अनाथाश्रम,... आउटसाईड रायपूर गेट, अहमदाबाद | शिक्षण | | ३६–४४ |
| (१२) विकास गृह, पोस्ट आनंदनगर सरखज ... ... रोड, अहमदाबाद | शिवणकाम, गायन, विणकाम भरतकाम, ड्रॉइंग | | २–५४ |
| (१३) येरवडा इंडस्ट्रिअल स्कूल, पुणें ६... ... ... | सुतारकाम, शिवणें, बांबूकाम शेती, बागकाम, केस कापणें, इ. इ. | औद्योगिक बांदिस्त शाळा १२ वर्षांवरची मुलें. | ३६८–० |
| (१४) हिंदु वुइमेन्स रिस्क्यू होम ... ... ... ... २९९ नारायण पेठ पुणें. | भरतकाम, विणकाम. | अडचणींत सांपडलेल्या मुलींच्याकरितां | १४–१०७ |
| (१५) हिंगणें स्त्रीशिक्षण-संस्था ... ... ... ... ... | शिवणकाम इ. इ. | | १६–१४० |
| (१६) सेवासदन होम फॉर दि होमलेस, ७८९–७९०... सदाशिव पेठ, पुणें | विणकाम, शिवणकाम शिक्षण | | २–८ |

| नांव | उद्योग | वर्णन | संख्या मुलें—मुलीं |
|---|---|---|---|
| (१७) सर्टिफाइड स्कूल, सोलापूर. उमेदपूर सोलापूर..... | सुतारकाम, शिवण, विणणें, | | ७९–७२ |
| (१८) डब्यू. बी. एन. ऑर्फनेज पंढरपूर... ... ... | शिवणकाम, गायन, भरतकाम | अनाथ व अनौरस मुलांकारितां | ५४–९१ |
| (१९) श्री. छत्रपति शाहू बोर्डिंग हाउस, सातारा. ... | विणणें, शेतीकाम. | | १५१–० |
| (२०) लक्ष्मीबाई पाटील वसतिगृह सातारा ... ... ... | शिक्षण | | १–२६ |
| (२१) सर्टिफाइड स्कूल हुबळी, धारवाड जिल्हा.... ... | शिवण, विणकाम, | | ९७–६२ |
| (२२) जांबुळ सर्टिफाइड स्कूल, पोस्ट कुळगांव, (जी. आय. पी. रेल्वे) तालुका कल्याण, जिल्हा ठाणा.... ... | सुतारकाम, शिवण, शेती व बागकाम, | शेतीशाळा | ८२–० |
| (२३) सर्टिफाइड स्कूल फॉर गर्ल्स शिरूर पोस्ट शिरूर जि पुणें.... ... ... | शिवणकाम | | ०–४१ |
| (२४) सर्टिफाइड स्कूल, बडोदा. पोस्ट केमिकल इंडस्ट्रीज बडोदा नं. ३... ... | सुतारकाम | | ४८–० |
| (२५) सर्टिफाइड स्कूल, सुरत जिल्हाः—सुरत.... ... | शिवणकाम | | ७–१ |
| (२६) सर्टिफाइड स्कूल माळशिरस जि. सोलापूर... ... | सुतारकाम, शेतीकाम | शेतीशाळा | १९–० |

( सुयोग्य संस्थांची संख्या जास्त असल्यानें त्यांची माहिती दिलेली नाहीं.)

आजपर्यन्त मुलांच्या कायद्यांमध्यें मुलांना १८ वर्षापर्यन्तच संस्थांमधून ठेवण्याची सोय होती. परंतु सरकारनें नवी व्यवस्था करून शारीरिक व मानसिक दृष्ट्या अपंग असणाऱ्या मुलांना त्यानंतरहि संस्थांमधून ठेवण्याची परवानगी दिली आहे. या सोईमुळें अपंग मुलांना संरक्षण व शिक्षण देण्याची चांगली व्यवस्था निर्माण झालेली आहे. कोर्टापुढें आलेल्या मुलांची व्यवस्था कोणत्या रीतीनें लावण्यांत आली हें पाहिल्यास संस्थांमध्यें मुलें ठेवणें हा उपचार केव्हां अवलंबिला जातो व इतर मार्गानें सुधारण्याचा कसा प्रयत्न केला जातो हें लक्षांत येईल.

१९५०–५१

| सुटलीं | आईबापांना दिलीं | | ताकीद | प्रोबेशन | |
|---|---|---|---|---|---|
| | देखरेखी खालीं | देखरेखी शिवाय | | देखरेखी खालीं | देखरेखी शिवाय |
| ४·५६ | ३·०७ | १६·३७ | १३·०१ | ३·३२ | ३·६८ |

| संस्थांमधून पाठविली | | | इतर | एकूण |
|---|---|---|---|---|
| संमत–शाळा | सुयोग्य संस्था | सुयोग्य व्यक्ति | | |
| ९·६८ | ८·६२ | ०·६७ | ३७·०२ | १०० |

समाजकार्यातील अनेक वर्षांच्या अनुभवानंतर अशी विचारसरणी आतां सर्वमान्य झालेली आहे, कीं गरजू मुलांना कोणत्याहि संस्थेपेक्षां घरीं दिलेलें शिक्षण अधिक संस्कारक्षम व त्यांना घरीं ठेवून केलेली देखरेख अधिक यशस्वी ठरते. त्याचप्रमाणें नवा विचारप्रवाह असा आहे, कीं अधिक संख्या असणाऱ्या शाळांच्यापेक्षां ज्या शाळेमधून मुलांची संख्या कमी व वैयक्तिक लक्ष अधिक त्या शाळांतून दिलेला उपचार अधिक प्रभावी ठरतो. त्यामुळें दिवसेंदिवस मोठ्या प्रमाणांवर संख्या असणाऱ्या संमत–शाळांपेक्षां प्रांताच्या कानाकोपऱ्यांतून लहान शाळा काढून त्यांचें शास्त्रशुद्ध वर्गीकरण करून भाषा व परिस्थिति ह्यामुळें निर्माण होणारे अनेक प्रश्न सोडवितां येण्याजोगे आहेत. आज प्रत्येक रिमांड–होममध्यें ४।५ भाषिक गट असतात.

त्यामुळें तेथें किंवा संमत–शाळांमधून हवें तसें शिक्षण होऊं शकत नाहीं. अगर निरीक्षण होऊं शकत नाही. हाच अनुभव सुयोग्य संस्थांमधून येतो, व त्यामुळें प्रत्येक शाळेमध्यें ३।४ भाषांचे वर्ग चालवावे लागतात. ह्याशिवाय एका विशिष्ट परिस्थितींतून आलेला मुलगा त्याच्या उपचाराच्या दृष्टीनें योग्य अशा संस्थेंत जातोच असें नाहीं. या शाळांतील व संस्थांतील औद्योगिक व शेती–शिक्षणाचा दर्जा आतां पुष्कळच सुधारलेला आहे. परंतु या मुलांना पुढें नोकऱ्या मिळविणें अतिशय अवघड जातें. कारण नोकऱ्या देणारे कारखानदार त्यांना गैरसमजानें गुन्हेगार म्हणून समजतात, व त्यांना समाजबहिष्कृत म्हणून वागवितात. या संस्थांतून व शाळांतून मुलांच्या आरोग्याकरितां वैद्यकीय उपचाराची सोय केलेली असते व मुलाचें मन रमावें म्हणून खेळ, मैदानी सामने, शारीरिक शिक्षण, दृक्‌श्राव्य शिक्षण, छावण्या, बालवीर पद्धत वगैरेंची व्यवस्था केलेली असते. मोठ्या शाळांतून मुलांना समाजांत जबाबदारीनें जगतां यावें म्हणून घरकुल पद्धतीचा अवलंब केला जातो. ( House System ) कांहीं ठिकाणीं नगरपालिकेप्रमाणें शाळा चालविण्यामध्यें मुलांना कांहीं स्थान देण्यांत येतें व कांहीं शाळांतून चांगलें वागणाऱ्या व काम करणाऱ्या मुलांना गुणवेतन ( Marks Money ) देण्यांत येतें.

या खात्याचा इतर कोणत्याहि खात्यापेक्षां जनतेशीं अधिक संबंध येत असतो. कारण जिल्हा संस्था चालविणारे लोक हे खाजगी व हौशी समाज-कार्यकर्ते असतात. त्याचप्रमाणें अनेक खाजगी रीतीनें चालविल्या जाणाऱ्या संस्था अनाथ, उपेक्षित, गरजू व उन्मार्गी मुलांना संरक्षण देऊन ह्या खात्याशीं सहकार्य करतात. सुयोग्य संस्थांची संख्या दिवसेंदिवस वाढत आहे. हें त्याचेंच चिन्ह आहे. उदार अन्तःकरणाचे कांहीं लोक अशीं मुलें वाढ-विण्याकरितां घेतात व त्यांची संख्या आज कमी वाटत असली तरी दिवसेंदिवस वाढत आहे.

मुलगा शिक्षण पूर्ण करून शाळांतून बाहेर आल्यानंतर त्याचें अनुचिंतन किंवा पुढली सर्व व्यवस्था व काळजी जिल्हासंस्था करतात. त्यामध्यें सुटलेल्या मुलांना मदत करणें, नोकरीला लावून देणें, लग्न करून देणें, अनाथ मुलांना अनुचिंतन छात्रालयांत आसरा, अन्न व वस्त्र देणें, परवान्या-



एरवीं ‘ वानरलीलांत ’ गुंतलेल्या हातांतून ‘ विनायक ’ निर्माण करणें. ( येरवडा औद्योगिक शाळा, पुणें )

वर सुटलेल्या मुलांच्यावर देखरेख ठेवणें, वगैरे भाग येतात. ज्या मुलांनीं आपल्या उपचाराची कालमर्यादा पुरी केलेली आहे, त्यांचं वर्गीकरण खालील-प्रमाणें आहे.

| यशस्वी | शंकित | बोर्स्टल शाळेला पाठविलेले | अयशस्वी | पळाले | इतर |
|---|---|---|---|---|---|
| १५६ | ५ | १ | ३४ | ८५ | १७ |

ह्यावरून शिक्षणक्रम पुरा करून एके काळीं ज्यांना समाजानें टाकलें तीं मुलें किती यशस्वी होऊं शकतात हें स्पष्ट कळेल. जुवेनाईल व बेगर्स खात्याच्या चार विभागांपैकीं एकाच विभागाचा परिचय येथें करण्यांत आलेला आहे.

हें खातें नवीनच आहे. जनतेचें सहकार्य जसें जसें जास्त मिळत जाईल तसें तसें काम अधिक यशस्वी होणार आहे, व अशा राष्ट्रनिर्मितीच्या प्रयत्नाना जनतेचें वाढतें सहकार्य मिळेल यांत शंकाच नाहीं.



: १० :

# समाजसेवेचें तत्त्वज्ञान व तंत्र

समाजसेवा ह्या शब्दामागें माणसांच्या जीवनांतील कांहीं उच्च भावनांना आवाहन आहे. त्याच्या मागें संस्कृतीच्या विकासाचा एक महत्त्वाचा टप्पा आहे. ह्यामुळेंच भाषिक मूल्यामध्यें समाजसेवा ह्या शब्दाची किंमत कल्पनेपेक्षां जास्त वाढली गेली आणि प्रत्येकाला आपण समाजसेवक आहोंत असें मिरविण्यांत अभिमान वाटूं लागला. परंतु आतां समाजसेवा ह्या कल्पनेमागें असलेली आपली भावना अधिक स्पष्टपणें व्यक्त करावयाला हवी. सेवाभावाच्या मागें अविभक्तपणाचें किंवा आपलेपणाचें एक विशाल तत्त्वज्ञान सदैव असावें लागतें.

समाजशास्त्रीय उदाहरण घेऊन स्पष्ट करायचें म्हटलें तर असें म्हणतां येईल कीं फार फार वर्षांपूर्वी हिमयुगांत माणूस आपल्या प्राचीनतम अवस्थेंत होता. तेव्हां त्याची सारी सुधारणा व संस्कृति स्वत:भोंवतीं केन्द्रित झाली होती. प्रथम सामाजिक गट निर्माण झाले कीं प्रथम कुटुंबसंस्था निर्माण झाली हा प्रश्न वादाचा आहे. पण एक मात्र खरें कीं एका आश्रयाखालीं माणसें आपल्या क्षुधा भागविण्याकरितां एकत्र राहूं लागलीं. बुद्धि हा मानवी जीवनाचा विशेष असल्याकारणानें एका गटांत राहणाऱ्या त्या माणसांना लौकरच असें आढळून आल असेल कीं भुकेच्या समाधानापलीकडे असलेला असा कांहीं आपलेपणा आपणा सर्वांत निर्माण झालेला आहे. साहजिकच

पहिले भावनात्मक बंध पतिपत्नी, आईमुलें यांत निर्माण झाले असतील. आपलेपणा केवळ मनांतच राहणें अशक्य असल्यानें एकाचें दुःख दुसऱ्याच्या डोळ्यांत पाणी आणीत असेल तर एकाचें सुख दुसऱ्याला आनंद देऊं लागेल. ह्या भावनेबरोबरच माणसां-माणसांमधला विभक्तपणा संपला आणि आपण एक आहोंत अशी सुप्त सामाजिक जाणीव मानवी मनामध्यें डोकावूं लागली. ह्या जाणिवेचें परिणत स्वरूप म्हणजेच आजचें मानवता वादाचें तत्त्वज्ञान. प्रथम मानवी मनाचें क्षितिज स्वतःच्याच सुखदुःखांत गुरफटलेलें होतें. पुढें त्याचा विचार-विस्तार कुटुंबापर्यंत झाला व पुढें सर्व कुटुंबियांचीं सुख-दुःखें एक झालीं. आज सुद्धां आपल्या संस्कृतीच्या मूल्यमापनामध्यें ज्याचें आपलेपणाचें क्षितिज मोठें तो श्रेष्ठ मानला जातो. प्रांत, देश ह्या मर्यादा ओलांडून जो अवघ्या विश्वाला घर मानूं लागतो, अवघाची संसार स्वतःचाच मानून सर्वांना आपुलकीचा ओलावा दाखवितो, तो संत, महात्मा, भगवान् होतो. ह्याचाच इत्यर्थ असा कीं आपल्या सुखदुःखाचीं वर्तुळें कितपत विस्तारलेलीं आहेत ह्यावर आपली सुसंस्कृतता अवलंबून आहे. दुसऱ्याच्या दुःखांत एकरूप होणें किंवा आपलेपणाच्या मर्यादा वाढणें म्हणजे दुसऱ्याचें दुःख आपलें मानणें. एकदां कां दुसऱ्याच्या दुःखानें आपल्या मनाला व्यथा होऊं लागली कीं त्याच्या मदतीला धावून जाणें अटळ होतें व दीन, दुःखी व पतित ह्यांची सेवा हा स्वभावधर्म बनतो. पूर्वी ही दया होती. हे पतितावर उपकार होते. पण आज त्यांच्या दुःखाचें कारण समजल्यामुळें हें एक सामाजिक कार्य ठरतें.

समाजसेवेच्या कल्पनेमागचें हें तत्त्वज्ञान स्पष्ट झालें म्हणजे परिभाषेचा वादंग किती पोकळ आहे हें स्पष्ट दिसतें. आज अनेक लोक समाजसेवा व समाजसुधारणा ह्यांना एकाच अर्थी मानतात व विचारांचा गोंधळ करतात. समाजसेवेचा अर्थ ताणावा तितका ताणला जातो. एके काळीं जी समाजसेवा मानली जाई ती आज समाजसेवा ठरेलच असें नाहीं. आदिवासी विभागांत आज शाळा काढणें ही समाजसेवा आहे. परंतु २५ वर्षांनंतर, आदिवासी जनांची संपूर्ण सुधारणा झाल्यावर जर तेथील एखाद्या शहरांत कोणी शाळा काढूं लागलें तर त्याला समाजसेवा म्हणावें का एक सामाजिक आवश्यक गोष्ट किंवा सामाजिक गरजेची पूर्ति म्हणावें हा प्रश्न पडेल. वस्तुतः अनाथ, अपंग,

दुःखी, उपेक्षित, पतित, गुन्हेगार वगैरे जे नावडते लोक आहेत त्यांना हात देणें ही समाजसेवा आहे. ह्या कल्पना स्पष्ट झाल्यानंतर इतर कांहीं उपप्रश्नांचा विचार करणें आवश्यक ठरतें.

समाजसेवा हा एक व्यवसाय होऊं शकतो काय ? हा एक प्रश्न आहे.समाजसेवा व व्यवसाय हे विरोधी शब्द आहेत काय ह्याचें सरळ उत्तर, नाहीं असें आहे. कोणतीहि गोष्ट शास्त्रीय ज्ञानाच्या पार्श्वभूमीवर, त्यागपूर्वक केली तर ती श्रेष्ठ ठरतें. एखादा डॉक्टर पैसे घेऊन जर औषध देत असेल तर तो उपयुक्त घटक ठरेल. पण दुसरा एखादा डॉक्टर पैसे न घेतां औषध देत असेल तर तो थोर सेवक ठरेल. परंतु ह्या तुलनेमध्यें एक गोष्ट लक्षांत घेणें आवश्यक आहे. आणि ती म्हणजे ही तुलना दोन तज्ज्ञ डॉक्टरांच्या मध्येंच होऊं शकते. एखादा डॉक्टर पैसे घेत असेल व एखादा वैदू पैसे न घेतां उपचार करीत असेल तर तो वैदू डॉक्टरांच्या पेक्षां श्रेष्ठ ठरणार नाहीं. कारण वैद्यकीय धंद्याचें तात्त्विक ज्ञान डॉक्टरला असतें, वैदूला नसतें. यामुळें वैदूचें औषधदान समाजाला पुष्कळदां उपकारक न ठरतां अपकारकच ठरतें. हीच गोष्ट समाजसेवेच्या बाबतींत सर्वस्वीं खरी आहे. दुसऱ्याची सेवा करण्याकरितां किंवा त्याला मदत करण्याकरितां मायाळू अन्तःकरण असावे लागतें. परंतु डॉक्टरांना केवळ मायाळू अन्तःकरण असून चालत नाहीं. त्याला वैद्यकीय ज्ञानाची आवश्यकता असते. पूर्वी कोणत्याहि माणसाला कनवाळू अन्तःकरण व लोकसेवेकरितां रिकामा वेळ असला कीं तो समाजसेवक होत असे. आतां तेवढ्यानें भागत नाहीं. समाजसेवा हें एक शास्त्र बनलेलें आहे व शास्त्र बनल्याकारणानेंच समाजसेवा हा एक व्यवसाय बनत चाललेला आहे. नावडत्या लोकांच्या सेवेची जबाबदारी हळू हळू कुटुंबाकडून समाजाकडे व शासनसंस्थेकडे जात आहे.

खरें पाहतां समाजसेवा ही नेहमीं बदलती व गतिशील ( Dynamic ) असते. ज्या सेवेला आज सेवा म्हणतात तीच सेवा उद्यां सेवा न ठरतां एक नित्यकर्म ठरेल. समाजसेवेचा अर्थ इतकाच कीं जो गरजू आहे त्याला स्वावलंबी बनाविणें, उपेक्षित आहे त्याला मदत करणें व आपण गरजू आहों असेंहि ज्याला वाटत नाहीं,पण जो वस्तुतः प्रमेयात्मक असतो [ उदाहरणार्थ-

गुन्हेगार वगैरे ] त्या लोकांनासुद्धां समाजरक्षणाच्या दृष्टीनें मदत करणें, केवळ शारीरिक दृष्ट्या रोगी व पंगू लोकाना मदत करणें नव्हे.

समाजसेवेमध्यें प्रचलित असणारा दुसरा एक गैरसमज आहे. व्यावसायिक समाजसेवकाबद्दल कांहीं लोकांची अशी समजूत आहे कीं जो गृहस्थ समाजसेवेचा व्यवसाय करतो तो दर्जानें कमी आहे ह्याचें कारण तो त्याकरितां पैसे घेत असतो. पण हा दृष्टिकोन सर्वस्वीं अन्यायाचा आहे. कारण समाजसेवेचें असें एक शास्त्र आहे. त्याकरितां विशिष्ट तंत्र-ज्ञानाची आवश्यकता आहे. वैद्यकासारखा हाहि एक व्यवसाय झाला आहे. ही गोष्ट आता सर्वमान्य होत आहे. अजूनहि पुष्कळ लोकांना समाजसेवा हें एक शास्त्र आहे हें मानावेसें वाटत नाहीं. पण हे लोक एक महत्त्वाची गोष्ट विसरतात कीं केवळ रिकामा वेळ व तळमळ ह्यानें समाजसेवा होऊं शकत नाहीं. त्याला शास्त्रीय ज्ञानाची पार्श्वभूमि लागते. केवळ रिकामा वेळ आहे व तळमळ आहे म्हणून एखादा गृहस्थ दवाखाना काढूं लागला तर आपण त्याला दवाखाना चालवूं देऊं काय याचा प्रत्येकानें विचार करावा. आज जनावरांच्यावर उपचार करण्याकरितां सुद्धां जर पशुवैद्यकशास्त्र शिकलेला माणूस आम्हांला लागतो, तर जो गृहस्थ प्रत्यक्ष माणसांच्यावर उपचार करणार आहे, त्यांच्या आयुष्याला वळण लावणार आहे, अनेक लोकांचें भवितव्य ज्याला घडवायचें आहे त्या माणसाला शास्त्रीय ज्ञान नसेल तर काय होईल ? पूर्वी एक वेळ अशी होती कीं ज्या वेळीं हें ज्ञान देण्याघेण्याची सोय आपल्या देशांत नव्हती. पण आतां निरनिराळीं विद्यालयें निघालीं आहेत. लोक बाहेरून शिकून येत आहेत. अशा वेळीं समाजसेवा करणाऱ्या लोकांनीं समाजसेवेचें शास्त्र न शिकणें हें अक्षम्य आहे. कांहीं लोक असें विचार-तात कीं आजवर या क्षेत्रांत काम झालें नाहीं का ? त्याला उत्तर हें कीं आजवर जें कार्य झालें त्या कार्याबद्दल जनतेला नितान्त आदर व अभि-मान आहे. परंतु शास्त्र निर्माण झाल्यावर व तज्ज्ञ सेवक असतांना तसेंच करूं पाहणें हें चुकीचें आहे. मात्र एक गोष्ट महत्त्वाची आहे. व्यावसायिक वा हौशी कोणत्याहि समाजसेवकाला सेवेचा पिंड व मनोभूमिका व त्याला योग्य असें व्यक्तिमत्त्व असणें अगत्याचें आहे. शास्त्रीय ज्ञानाच्या

पायावर उभारलेली तळमळीची समाजसेवा हीच आजच्या युगाची आवश्यकता आहे.

ह्या शास्त्राची वाढ इतकी नवीन आहे व हें शास्त्र आपल्या देशांत इतकें अपरिचित आहे कीं समाजसेवेला शास्त्रीय तंत्रज्ञानाची पार्श्वभूमि आवश्यक आहे हें अजून कित्येकांना खरें वाटत नाहीं. म्हणूनच या कल्पनांची चर्चा व तंत्रासंबंधीं विवेचन थोडें विस्तारानें करणें आवश्यक आहे. त्याचा अर्थ असा नव्हे कीं आपल्या देशांत सामाजिक दृष्ट्या अपंग असणाऱ्या लोकांचा विचार नवीन आहे. उपलब्ध पुराव्यावरून असें अनुमान काढतां येतें कीं पूर्वीच्या काळींसुद्धां नीतिनियमाप्रमाणें व सामाजिक वर्गपद्धतीप्रमाणें ह्या लोकांचा विचार व व्यवस्था करण्याची धडपड चालू असते. एक फरक मात्र ध्यानांत घ्यायला हवा आणि तो म्हणजे या सेवेच्या व मदतीमागच्या हेतूचा. पूर्वी व आजहि क्वचित्‌च दानाच्या मागें पुण्य मिळविण्याची भावना असते. मी अनाथ--अपंगांना मदत करतों म्हणजे त्यांच्यावर एक प्रकारें उपकारच करतों. हें एक दान आहे, व ह्यांतून मला पुण्य व शेवटीं मुक्ति लाभणार आहे, असा दात्याचा हेतु असे. आजकालच्या समाजसेवेमध्यें कर्तव्याची, शास्त्राची व व्यावसायिकतेची जाणीव आहे. हा बदल हळू हळू लोकशाहीच्या आगमनाबरोबर व सामाजिक समतेच्या जाणिवेबरोबर होत आहे. पूर्वी राजा आणि प्रजाजन ह्यांच्या संबंधापेक्षां आजचे शासनसंस्था व नागरिक ह्यांचे संबंध अतिशय वेगळे आहेत. आज लोकशाही हा राज्यकारभाराचा पाया असल्यानें प्रत्येक नागरिक आपापल्या अंशभागानें राज्यकर्ताच झाला आहे, व म्हणून तो आपल्या गरजांची पूर्ति ही दान म्हणून न मागतां हक्क म्हणून मागत असतो. समाजवादाकडे झुकलेलें जग समतेचें तत्त्व मानत आहे. व त्यामुळेंच “ मी आंधळा आणखी गरीब असणें हा माझा अपराध नव्हे. मला मदत करणें हें समाज, सामाजिक संस्था, सरकार यांचें कर्तव्य आहे. ” अशी भावना हळू हळू.जागृत होत आहे. ह्या सर्व कारणांचा सामूहिक परिणाम म्हणून सरकारची जबाबदारी दिवसेंदिवस वाढत आहे व कल्याणकारी राज्यव्यवस्थेचें ध्येय ( Welfare State ) अस्तित्वांत येत आहे. ह्यांच्या अनुषंगानेंच समाजसेवेचीं खातीं, संस्था व संघटना सरकार वाढवीत आहे.

ही सर्व समाजसेवा सरकारनें अंगीकारली असली किंवा खाजगी संस्थांनीं अंगीकारली तरी त्यामध्यें कांहीं विशिष्ट तंत्राचा उपयोग केला जातो. त्या सर्व तंत्रांपैकीं गरजू मुलांच्या दृष्टीनें महत्त्वाचीं जीं तंत्रे आहेत ( Techeniques ) त्यांचा येथें विचार करणें जरूर आहे.

( १ ) व्यक्तिसाहाय्यः— ( Case-work ) अडचणींत सांपडलेल्या अगर जुवेनाईल कोर्टापुढें आलेल्या प्रत्येक मुलाची अडचण काय आहे, ती अडचण कशानें निर्माण झाली व ती अडचण दूर करण्याचा उपाय काय ? ह्याचा खोल अभ्यास करणें आवश्यक असतें. ह्या अभ्यासामध्यें चिकित्सा व उपचार हे महत्त्वाचे भाग आहेत. अडचणींत असणाऱ्या माणसाला मदतीचा हात हवा असतो, त्याला जर कोणी दया दाखवूं पाहील, तर त्याला अपमान वाटतो. एक प्रकारचा न्यूनगंड वाटतो. म्हणून गरजू माणसाला अगर मुलाला त्याच्या मनामध्यें न्यूनगंड निर्माण न होतां मदत करणें हें एक महत्त्वाचें कर्तव्य ठरतें. व्यक्ति-साहाय्याचा थोडक्यांत अर्थ म्हणजे " जी अडचण एखादा मनुष्य आपली आपण दूर करूं शकत नाहीं, ती दूर करण्याकरितां त्याला प्रत्यक्ष व रचनात्मक मदत करणें व त्या गरजवंताला स्वतःच्या पायावर उभें राहून अडचण निभावण्याकरितां मदत करणें. " माणूस अडचणींत सांपडतो तो पुष्कळदां त्यांची गरज समाज भागवीत नाहीं, किंवा समाजानें दिलेली मदत घेण्याइतकी त्याच्या स्वतःमध्येंच शक्ति नसते म्हणून. पुष्कळदां माणूस अडचणींत सांपडतो तो एका गरजेमुळें नव्हे तर अनेक गरजांमुळें, व त्या अनेक गरजांचा सामूहिक परिणाम त्या माणसाच्या व्यक्तिमत्त्वावर होत असतो. माणूस मागासलेला असतो, अशक्तहि असतो. व एखादे वेळेस अनाथहि असतो. ह्या किंवा अशा अडचणी एकदम आल्या म्हणजे माणसाचा कोंडमारा होतो व यांतून सोडविण्याकरितां त्या माणसाला न दुखवतां त्याच्या सुप्त शक्तीला जागृत करून त्याचें व्यक्तिमत्त्व फुलविण्याकरितां व्यक्ति-साहाय्याचा उपयोग केला जातो. गरजू मुलाला त्याच्या गरजेचें कारण शोधून उपचार करणें ह्या पद्धतीमध्यें कांहीं महत्त्वाचे घटक येतात ते पुढीलप्रमाणें:—

( अ ) परिचयः—कोणत्याहि केसवर्क करणाऱ्या कार्यकर्त्याला हा पहिलाच टप्पा फार अवघड वाटत असतो. परंतु त्याचें कौशल्य ह्यांतच असतें कीं

मदतीकरितां येणाऱ्या मुलाला त्याचें ओझें वाटूं देतां कामा नये. मुलाला असें वाटावें कीं आपण आपली अडचण आपल्या एखाद्या मित्रालाच सांगत आहोंत. प्रोबेशन ऑफिसर, व्यक्तिसाहाय्यक किंवा तत्सम कार्यकर्त्यांनीं हें लक्षांत ठेवावयाला हवें कीं पहिल्या भेटींत आपण त्या मुलाच्या मनांत आपणासंबंधीं विश्वास निर्माण करावयाला हवा. पुष्कळदां एखादें मूल घरांतून रूसून बाहेर आलेलें असतें, एखादा मुलगा साऱ्या जगावर चिडलेला असतो, किंवा एखादी मुलगी तिच्या मनांत सांठलेले विचार सांगायला कोणी माणूस नाहीं, म्हणून अस्वस्थ झालेली असते. ह्या सर्व मुलांमुलींना समाजसेवकासंबंधीं असा विश्वास वाटायला हवा कीं कितीहि खाजगी गोष्टी सांगितल्या तरी तो त्याचा गोप्य स्फोट करणार नाहीं. किती रागावलों तरी तो शांतपणानें ऐकेल, व आपल्या अडचणींतून पार होण्याकरितां मदत करेल. हा विश्वास निर्माण करणें अत्यंत कठीण असतें. विशेषतः जुवेनाईल कोर्ट व संमत शाळा यांमध्यें प्रोबेशन ऑफिसर, शाळाप्रमुख किंवा व्यक्तिसहाय्यक हे अधिकाऱ्याच्या जागेवर असल्याकारणानें हीं माणसें आपणाला मदत करतीलच असा विश्वास मुलांना वाटणें जरा कठीणच असतें. एकदां दोनदां मुलांच्यांशीं बोलून भेटून, खेळून हा विश्वास निर्माण करतां येतो. मात्र कार्यकर्त्यांनीं हें लक्षात ठेवावें कीं पहिल्याच भेटीमध्यें मुलगा सांगेल तें कागदावर टिपून घेणें, आपण आरामशीर बसून व मुलाला आरोपीसारखें पुढें उभें करून मुलाच्या हातून घडलेल्या गुन्ह्यासंबधीं किंवा त्याच्या अडचणींसंबंधीं आपणच चर्चा करूं लागणें हें बरें नव्हे. ह्यामुळें मुलाला कार्यकर्त्यासंबंधीं विश्वास वाटत नाहीं. पहिल्याच भेटीमध्यें मुलें पुष्कळदां विश्वास नसल्याकारणानें बोलतच नाहींत. परंतु त्यांच्या मनांतल्या गांठी उलगडून त्यांना बोलके करणे ही एक महत्त्वाची कला आहे. ह्याकरितां गप्पा, चित्रें, खेळ वगैरेंचा उपयोग करावा. मुलें बोलायला लागल्यानंतर सुद्धां स्वतःला वांचविण्याच्या इच्छेनें खोटी माहिती देतात, खोटीं नांवें सांगतात, किंवा स्वतःची अडचण भडक रंगांत रंगवितात. एका मुलाबरोबर पळून गेलेली मुलगी कोर्टापुढे येतांच घाबरून गेली व आपणहून स्वखुशीनें पळालों ही गोष्ट विसरून प्रोबेशन ऑफिसरची सहानुभूति मिळविण्याकरितां त्या मुलानें आपल्यावर बलात्कार केला असें सांगून त्याचें भडक वर्णन करूं लागली. कार्यकर्त्यांनीं आपला या गोष्टीवर विश्वास बसला नाहीं

असें एकदम न सांगतां त्या कशा उघड उघड खोट्या आहेत हें त्या मुलीच्या निदर्शनास आणलें. एकदां हा पहिला परिचय चांगला होऊन मुलाचा समाज-सेवकावर चांगला विश्वास बसला म्हणजे मग अडचणीची चिकित्सा सुलभ होते.

(ब) **पूर्वेतिहासः**—अडचणींत सांपडलेल्या मुलांशीं अगर मुलींशीं चांगला परिचय होऊन विश्वास निर्माण झाला म्हणजे चिकित्सेकरितां पूर्वेतिहास समजावून घेणें आवश्यक असतें. हा पूर्वेतिहास मुलाशीं पुन्हा पुन्हा बोलून त्यांच्या वागणुकीचें काळजीपूर्वक निरीक्षण करून, त्याचे आईबाप व शिक्षक ह्यांच्याकडून आणि मुलाच्या घराला भेट देऊन, आसपास चौकशी करून चांगला समजतो. मात्र ही माहिती जमा करतांना एक गोष्ट विसरतां कामा नये कीं ज्यांच्याकडून ही माहिती जमा होते तीं सर्व माणसें कोणत्याना कोणत्यातरी प्रकारानें त्या अडचणीशीं संबंधित असतात व त्या-बाबतची ते एकतर्फी माहिती देत असतात. परंतु अशी माहिती सर्वांकडून जमा केल्यानंतर त्या मुलाचें व त्याच्या अडचणीचें चित्र पूर्ण होतें. एका सावत्र मुलानें घरीं चोरी केल्यानंतर त्या चोरीसंबंधीं शिक्षक, मुलाचे स्नेही, मुलाची सावत्र आई, वडील व स्वतः मुलगा या सर्वांच्या हकीकती वेगवेगळ्या असतात. परंतु त्या सर्व हकीकती एकत्र करून समाजसेवकाला संपूर्ण चित्र पाहावें लागतें. त्या मुलाजवळ आपण चोरी कां केली ह्याबद्दलचें तर्कशास्त्र तयार असतें. परंतु तें तर्कशास्त्र चुकीच्या गृहीत कृत्यावर कसें आधारलेलें आहे हें त्या मुलाला पटवून देणें हें महत्त्वाचें काम असतें.

ह्याच ठिकाणीं कार्यकर्त्यांना एक सूचना देणें अगत्याचें आहे. आणि ती म्हणजे व्यक्तिसाहाय्य हें सदैव परस्मैपदी (Objective) राखायला हवें. मुलाच्या अडचणीमध्यें कांहीं कार्यकर्ते इतके मिसळून जातात, कीं मुलाची अडचण ही त्यांची स्वतःचीच अडचण बनते व उपचार आत्मनेपदी (Subjective) बनतो. ह्यामुळें समाज–सेवकाला मुलाची अडचण कळत नाहीं व खरा उपचारहि करतां येत नाहीं.

(क) **चिकित्सा** : मिळालेल्या पूर्वेतिहासावरून मुलानें चोरी कां केली, तो घरांतून कां पळाला किंवा त्याच्या वागण्यांत विकृति कां निर्माण झाली ह्याचें कारण शोधून काढतां येतें. पुष्कळ वेळां वरवर दिसणारीं कारणें फसवीं असतात. व मुलाच्या अडचणींचें कारण वेगळेंच असतें. मानवी जीवन इतकें गुंतागुंतीचें

झालें आहे कीं मुलाच्या उन्मार्गी प्रवृत्तीला अनेक कारणें असूं शकतात. उदा० एखादे मूल चोरी करतें ह्याचें कारण त्याला बाजारांत मांडलेल्या चविष्ट खाद्य पदार्थांचा मोह पडतो आणि घरीं तर सावत्र आई खायला देत नाहीं किंवा सख्खी आई असल्यास चांगलें चांगलें खावयास देणें तिला शक्य नसतें. कदाचित् बरोबरचा श्रीमंत मित्र ते जिन्नस खातो, व मला कां मिळत नाहीं ही मत्सरी वृत्ति असते. कदाचित् आपल्या खोट्या ऐश्वर्याचें प्रदर्शन करण्याची हाव असते. वगैरे वगैरे. ह्यापैकीं एक वा अनेक कारणें मुलावर परिणाम करीत असतात. परंतु समाजसेवकानें कोणचें कारण किती महत्त्वाचें आहे व त्याचा मुलावर कितपत परिणाम होतो हें अजमावून पाह्यचें असतें व मूल अडचणींत कशानें आलें ह्याचें खरें कारण शोधायचें असतें. ही चिकित्सा करण्याच्या कामीं बाल-मार्ग-दर्शन केंद्राचा अतिशय उपयोग होतो. मानस-शास्त्रज्ञ व मनोव्यथा-शास्त्रज्ञ यांचा सल्ला मिळाला व मुलाचें बौद्धिक वय जर समजलें तर मुलाची चिकित्सा पुष्कळच सुलभ होते. त्याचप्रमाणें पूर्वेतिहासामध्यें मुलाच्या घरची आर्थिक स्थिति, मूल व आईबाप ह्यांचे संबंध, मूल व भावंडें ह्यांचे संबंध, मुलाच्या घरचें नैतिक शिक्षण, घरांतील शिस्त, मुलाची संगत, मुलाची शाळेतील परिस्थिति, मुलगा जेथें राहतो तेथील वस्तीचें स्वरूप, मुलाच्या घरांत उन्मार्गीगामी प्रवृत्ति आहेत किंवा काय वगैरे माहिती काळजीपूर्वक गोळा करावी लागते. मुलाची मुलाखत घेणें, त्याच्या घरीं भेट देणें, व मिळालेली माहिती काळजीपूर्वक लिहून दप्तरीं दाखल करणें वगैरे गोष्टी फार महत्त्वाच्या आहेत.

(ड) उपचारः—वरील पद्धतीनें चिकित्सा केल्यानंतर मूल सुधारण्याकरितां किंवा मुलाची अडचण दूर करण्याकरितां काय करावें ह्याचा निर्णय केला जातो. अनाथ मुलाला आर्थिक मदत देऊन भागेल, तर अनैतिक संगत लागलेल्या किंवा गुन्हेगारीच्या मुळें मनांत घट्ट रुजलेल्या मुलाला एखाद्या संमत-शाळेंत पाठविणें इष्ट ठरेल किंवा केवळ अवखळपणा करणाऱ्याला मुलाला कांहीं काळ देखरेखीखालीं ठेवल्यास तो सुधारूं शकेल. अशा तऱ्हेनें मुलांच्या पूर्वेतिहास व चिकित्सा ह्यावर उपचार आधारला जातो. परंतु शाळेंत, कोर्टांत अगर रिमांड-होममध्यें मुलांच्या चिकित्सेकरितां व उपचाराकरितां व्यक्तिसाहाय्याचें तंत्र वापरलें जातें व मूल सुधारण्याचा प्रयत्न

केला जातो. व्यक्तिसाहाय्य हें तंत्र दिसायला अत्यंत साधें परंतु अवलंबण्यास अत्यंत अवघड व अत्यंत कौशल्याचे असें तंत्र आहे. त्याकरितां अत्यंत बारीक निरीक्षण, मुलांबद्दल अपार सहानुभूति व उपचाराचें कौशल्य समाजसेवकाला संपादावें लागतें.

(२)परिवीक्षा (Probation) : गुन्हेगारालाकोणत्या रीतीनें सुधारतां येईल हा विचार पुरातन काळापासून केला जात आहे. गुन्हेगारांना सरसकट तुरुंगांत घालून ( मग त्याचा तो पहिला गुन्हा असो किंवा त्यानें चुकून गुन्हा केलेला असो. ) माणसें सुधारतील ही कल्पना किती खोटी आहे, हें अनेक वर्षांच्या अनुभवानें सिद्ध झालेलें आहे. जर केवळ तुरुंगांत घालून माणसें सुधारत असतीं तर तुरुंगांची संख्या इतकी वाढलीच नसती. अर्थातच तुरुंग वाढण्याला नवे नवे कायदे व त्याच्या अनुषंगानें येणारे नवे नवे गुन्हे हें एक महत्त्वाचें कारण आहे. परंतु गुन्हा व गुन्हेगाराचें मन याविषयीं झालेल्या आधुनिक संशोधनानें असें सिद्ध झालें आहे कीं गुन्ह्याकडे केवळ कायद्याच्या किंवा केवळ नीतीच्या दृष्टीनें पाहून चालणार नाहीं. या संशोधनानें असें दाखविलें आहे कीं माणसाच्या चांगल्या अगर वाईट प्रत्येक कृत्याच्यामागें कांहीं तरी हेतु व कारण असतें व या हेतूची किंवा कारणांची संपूर्ण चिकित्सा केल्याशिवाय माणसांच्या हातून घडलेल्या चुका सुधारण्याची आशा फोल आहे. माणूस गुन्हा कोणता व कसा करतो ह्यापेक्षां तो गुन्हा कां करतो हा प्रश्न अधिक महत्त्वाचा आहे. आणि त्या प्रश्नाचें उत्तर शोधणें म्हणजेच गुन्हेगार मनाची चिकित्सा करणें. ह्या चिकित्सेवरून असें दिसतें कीं मुलांच्या किंवा मोठ्या माणसाच्या मनांतील उन्मार्गी प्रवृत्तींना वैयक्तिक महत्त्व व वैयक्तिक कारण असतें. उदाहरणार्थ:—'क्ष' नें चोरी कां केली या प्रश्नाच्या उत्तरांत त्याच्या मनाचें प्रतिबिंब दिसेल. कांहीं मुलें चोरी करण्याच्या उन्मादक अनुभवाकरितां, कांहीं आपल्या स्नेह्यासोबत्यावर वजन पाडण्याकरितां, कांहीं अभ्यासांत मागासलेलें असल्यानें, कांहीं मोहानें तर कांहीं मुलें आपल्या मित्रांना मदत करण्याच्या इच्छेनें चोरी करतात. म्हणून ह्या मुलांच्यावर उपचार करायचा तो त्याच्या कारणाशीं संबंधित असावा लागतो. ज्यानें केवळ धाडसी अनुभवाकरितां चोरी केली त्याची धाडसाची गरज भागवावी लागते. ज्यानें मनोविकृतिमुळें चोरी केली त्याची मनोविकृति सुधारण्याचा प्रयत्न करावा लागतो.

थोडक्यांत म्हणजे सर्व गुन्हेगारांना एकाच तुरुंगांत घालून त्याची सुधारणा होत नसते. त्यांना सुधारायाचें असेल तर वैयक्तिक लक्ष देऊन व उपचार करून गुन्हेगार प्रवृत्तीचें मूळ निपटून टाकावें लागतें. पुष्कळदां असें दिसतें कीं तुरुंगांत गुन्हेगाराला टाकल्यानें तो सुधारण्याच्याऐवजीं बिघडण्याचा व सराईत बनण्याचा संभव जास्त असतो. विशेषतः ज्या मुलांना किंवा माणसांना लहानसहान गुन्ह्याकरितां थोड्या दिवसांची ५।६ महिन्यांपर्यंत सजा देतात त्यांच्या बाबतींत तर ही शक्यता फार मोठ्या प्रमाणांत असते. म्हणून गुन्हेगाराचा पूर्वेतिहास पाहून तो सुधारण्याची शक्यता वाटल्यास (आणि ही शक्यता पहिल्या गुन्हा करणाऱ्या व परिस्थितीमुळें गुन्हे करणाऱ्या लोकांच्यांत फार असते.) त्यांना परिवीक्षेचा फायदा देण्यांत येतो.

परिवीक्षा म्हणजे गुन्हेगाराला समाजामध्यें राहून सुधारण्याची दिलेली संधि होय. गुन्हेगाराला सुधारण्याचे दोन मार्ग आहेत. तुरुंगांत घालून माणसें सुधारण्याचा प्रयत्न करणें किंवा त्यांचा पूर्वेतिहास पाहून त्यांना त्याच्या घरीं ठेवून समाज–सेवकाच्या देखरेखीखालीं व त्याच्या मदतीनें सुधारण्याची संधि देणें. उन्मार्गी लोकावर देखरेख ठेवणें व त्यांना मदत करणें हें अत्यंत महत्त्वाचें काम आहे, कारण मानवी स्वभाव इतका गुंतगुंतीचा आहे व त्यामध्यें बऱ्यावाईटाचे असें चमत्कारिक मिश्रण झालें आहे कीं आपले आपण, स्वतःला सुधारणें हे पुष्कळदां शक्य नसतें. गुन्ह्यापासून दूर राहण्याकरितां व स्वतःचें नैतिक आरोग्य कायम राखण्याकरितां त्याला प्रेम, मित्र, छंद, व श्रद्धा व जीवनाचें तत्त्वज्ञान असावें लागतें. हें तत्त्वज्ञान देण्याकरितां गुन्हेगारांना थोरल्या भावासारखा असा एखादा गृहस्थ लागतो, कीं जो गुन्हेगार चुकत असतांना त्याला सुधारण्याकरितां मदत करेल, त्याचे दोष सुधारून घेईल व त्याला मदत करून समाजांत पूर्वीचें मानाचें स्थान मिळवून देईल. परिविक्षा ह्या कल्पनेमागें शिक्षा स्थगित केल्याचा अन्तर्भाव असतो. म्हणजे आपण नीट न वागल्यास स्थगित केलेली शिक्षा पुन्हा भोगावी लागेल अशी जाणीव गुन्हा करणाऱ्याला असते. परिवीक्षेचा अर्थच हा कीं गुन्हेगाराला सुधारण्याची ती एक संधि दिलेली असते. तो जर न सुधारेल तर त्या अपराधाकरितां जी शिक्षा पूर्वी दिली गेलेली नसते ती दिली जाते. परिवीक्षा पद्धतीनें गुन्हेगाराला सुधारण्याचा प्रयत्न करतांना व्यक्तिसहाय्य

( केस-वर्क ) पद्धतीचा अवलंब करावा लागतो. परिविक्षा पद्धति केवळ लहान मुलांच्या बाबतींतच नव्हे तर मोठ्या माणसांच्या बाबतींत सुद्धां फार यशस्वी रीतीनें हाताळतां येते असें अनुभवानें सिद्ध झालेलें आहे.

आज सर्वत्र असें मानलें जातें कीं पूर्वेतिहास पाहून निवडून घेतलेल्या कित्येक गुन्हेगारांना योग्य देखरेख व मार्गदर्शन असणाऱ्या परिविक्षा पद्धतीनें सुधारतां येते व त्यांना तुरुंगांत पाठवून त्यांच्यांत होणाऱ्या सुधारणेपेक्षां परिवीक्षा पद्धतीनें होणारी सुधारणा ही अधिक यशस्वी व स्थिर स्वरूपाची असते. यामुळें तुरुंगांत लोक ठेवण्यामध्यें होणारा खर्च पुष्कळशा प्रमाणांत कमी होईल. पुष्कळ लोकांना परिवीक्षा म्हणजे अनिर्बंध सोडून देणें असें वाटतें. परंतु परिवीक्षा म्हणजे गुन्हेगाराला स्वतः च्या जबाबदारीची जाणीव करून देणें आहे. १९५१ सालचा मुंबई प्रांताच्या तुरुंगखात्याचा अहवाल जर पाहिला तर असें दिसतें कीं ज्या लोकांना सहा महिने व त्यापेक्षां कमी शिक्षा देण्यांत आली होती, अशा गुन्हेगारांची संख्या १९५१ सालीं ६८४६८ होती. ह्या आंकड्यावरून ज्या लोकांना थोड्या काळाकरितां तुरुंगांत जावें लागतें अशा लोकांची संख्या व त्यांच्यावर होणारा खर्च ह्याची कल्पना येईल. थोडा काळ लोकांना तुरुंगांत ठेवण्याचा कांहीं एक उपयोग होत नाहीं. कारण या लहान अवधींत त्यांना कसलेंहि शिक्षण देणें अगर कोणताहि व्यवसाय शिकविणें अत्यंत अवघड असतें. याकरितां ५६२ कलमांचा जास्तींत जास्त उपयोग करण्यांत यावा असेंहि कांहीं लोक सुचवितात. परंतु ५६२ कलमाखालीं त्यांना दया दाखवून सोडण्यापेक्षां परिवीक्षा पद्धतीचा फायदा देऊन त्यांना सुधारण्याचा प्रयत्न करणें अधिक रचनात्मक ठरणार आहे. केवळ मुलांच्या बाबतींत नव्हे तर मोठ्यांच्या बाबतींत सुद्धां परिवीक्षेचा जास्तींत जास्त फायदा घेतला जावा असें वाटतें.

(३) पॅरोल : पाश्चात्य देशामध्यें तुरुंगांत असणाऱ्या गुन्हेगारांना किंवा संमत-शाळेंत असणाऱ्या मुलांना थोडा काळ घरीं घालविण्याची संधि देण्यांत येते. त्यायोगें पुन्हा परत समाजांत येण्यापूर्वी मुलाला समाजांत मिसळण्याची संधि मिळते. ह्याला पॅरोल ( Parole ) असें म्हणतात. परिवीक्षा (प्रोबेशन) ही आज्ञा न्यायाधिशानें दिलेली असते. तर 'पॅरोल' ही आज्ञा कायद्याची अंमलबजावणी करणाऱ्या अधिकाऱ्यानें दिलेली असते. आपल्याकडे मुलांच्या

बाबतींत 'पॅरोल' ची पद्धत प्रचलित नसली तरी मधून मधून मुलांना सुट्या देण्यांत येतात व त्याचा उपयोग मुलें चांगल्या रीतीनें मिसळण्यांत व घरीं कितपत टिकतात हें पाहण्याकरितां होतो.

(४) संस्थान्तर्गत उपचारः— (Institutional Treatment) आजवर आलेल्या अनुभवानें असें सिद्ध केलें आहे कीं मुलाला सुधारण्याचा चांगला प्रयत्न संस्थेपेक्षां, संमत–शाळेपेक्षां घरांतच यशस्वी होऊं शकतो. कारण मुलाचें साधारण असलेलें घरसुद्धां उत्तम असलेल्या शाळेपेक्षां मुलाला जास्त आवडत असतें. म्हणून आजकाल मुलांच्या कोर्टांत, मुलांना शक्यतोंवर घरीं ठेवून उपचार करण्याचा प्रयत्न केला जातो. मुलाचें घर अगदींच वाईट असेल अगर मुलाचा स्वभाव इतका आडदांड असेल कीं त्याला संमत–शाळेमध्यें पाठविणें अपरिहार्य आहे असें वाटलें, तरच त्याला शाळेंत पाठविण्यांत येतें. ह्या कल्पनेप्रमाणें ज्यांना घरदार नाहीं अशा पोरक्या मुलांनासुद्धां शाळेंत घरासारखें वाटावें म्हणून नव्या नव्या पद्धति अंमलांत आणल्या जात आहेत. पूर्वी शाळा मोठ्या प्रमाणावर असणें योग्य मानलें जात असे, तर आज वैयक्तिक लक्ष पुरविण्याकरितां मुलांची संख्या शक्य तितकी कमी करण्याचा प्रयत्न केला जातो. पूर्वी शिस्तीसंबंधीं फार वेगळ्या कल्पना होत्या. सर्व मुलांनीं एकदम जेवणें, एकदम हात धुणें, एकदम झोपणें वगैरेंच्या योगानें शाळेचें लष्करीकरण करण्यांत येत होतें. शाळेंत मनमोकळें हसायची चोरी, मनमोकळें खेळण्याची चोरी, परंतु आतां शाळांतून मुलांना पुष्कळ मोकळेपणा देण्यांत येतो. गृहपद्धतीमुळें मुलांच्यावर देखरेख करण्याकरितां एक स्वतंत्र शिक्षक असतो (House-father). शाळेच्या कारभारामध्यें मुलांना भाग घेण्याची संधि दिली जाते. हा प्रयोग अमेरिकेंतील बाल–नगरांतच (Boys-town) केला जातो असें नाहीं, तर आपल्या इकडील कित्येक शाळांतूनहि हा प्रयोग केला जातो. ज्या वेळेला मुलाला शाळेंत पाठविण्यांत येते, त्या वेळीं कोर्टाच्या मनामध्यें एक विशिष्ट हेतु असतो. उदाहरणार्थ बेशिस्त मुलाला शिस्त लागावी, जो समाजांत मिसळत नाहीं अशा एकांड्या मुलाला समाजांत मिसळण्याची शिकवण द्यावी. ज्याला कोणतीहि जबाबदारी घेतां येत नाहीं त्याला जबाबदारी घ्यायला शिकवावी. हे सर्व हेतु ध्यानांत ठेवूनच शाळेचे प्रमुख त्या मुलाशीं वागतात. थोडक्यांत म्हणजे मुलाला आपल्या

ज्या अडचणी बाहेर राहून दूर करतां येत नाहींत त्या अडचणी सोडविण्याचा प्रयत्न शालान्तर्गत उपचार-पद्धतीमध्यें केला जातो.

(५) **मानलेलीं घरें** (Foster Homes) : पाश्चात्य देशामध्यें गरजू मुलाला घरीं ठेवून सुधारण्याची संधि मिळावी म्हणून कोणी उदारहृदयी गृहस्थ त्या मुलाचा आपल्या कुटुंबांत समावेश करून घेतात. तो मुलगाहि त्या घराला आपलें घर मानूं लागतो, व तेथील आईबापांना आपल्याच मातापित्यासारखें मानतो. ह्या व्यवस्थेमुळें पुष्कळ मुलांना घरचें वातावरणहि मिळतें, व त्यांची अडचणहि निभावली जाते. आपल्याकडे आपल्या आर्थिक व सामाजिक परिस्थितीमुळें अशा तऱ्हेची व्यवस्था करणें अजून शक्य झालेलें नाहीं. परंतु अशा तऱ्हेची व्यवस्था करतां आली तर मुलांच्या दृष्टीनें ती फार उपकारक ठरणार आहे. अशा तऱ्हेचा प्रयोग कांहीं मुलांच्या बाबतींत येथेंहि करण्यांत आलेला असून तो पुष्कळशा प्रमाणांत यशस्वीहि झालेला आहे. परंतु तो प्रयोग पूर्णपणें यशस्वी होण्याकरितां, आवश्यक अशी परिस्थिति निर्माण होण्याकरितां आणखी कांहीं काळ जावा लागेल असें वाटतें. त्यामुळें अशा तऱ्हेच्या उपचार-पद्धतीचा अवलंब करतांना आज फार काळजी घ्यावी लागेल.

(६) **दत्तक** ( Adoption ) : मुलांच्या कोर्टापुढें आलेल्या मुलांची तपासणी केली तर असें दिसून येतें कीं त्यांतील कित्येक मुलें पोरकीं असतात. कित्येकांच्या आईबापांचा ठावठिकाणा नसतो. दिवसेंदिवस मुलांच्या कोर्टाकडे दत्तकाकरितां येणाऱ्या अर्जांची संख्या वाढत आहे. कारण समाजांत अशीं अनेक माणसें आहेत, अशीं अनेक कुटुंबें आहेत कीं केवळ मुलांच्या अभावाकरितां तीं दुःखी झालेलीं आहेत. म्हणून शक्य असेल त्या त्या वेळेला अशा पोरक्या मुलांना त्या कुटुंबांत दत्तक म्हणून द्यावें काय असा प्रश्न येतो. ह्या कुटुंबाची पूर्ण चौकशी करून तीं कुटुंबें दत्तक मुलाला उत्तम रीतीनें संभाळतील अशी खात्री वाटल्यास तें कुटुंब, मानलेलें घर समजून मुलाला प्रथम तिथें ठेवावें, व मुलाला मिळणारी वागणूक उत्तम आहे असें सिद्ध झाल्यास मुलाला वयांत आल्यावर दत्तक देण्यांत यावें. कारण अशीं उदाहरणें घडलीं आहेत कीं प्रथम प्रेमानें मुलाचा स्वीकार करणाऱ्या कुटुंबांत पुढें त्या मुलाची किंमत नोकराइतकीहि ठेवली गेली नाहीं. शिवाय

पुष्कळदां आईबापांचा असा आग्रह असतो कीं आपण पाळलेले आहोंत हें मुलाला कळवूं नये. परंतु आपण सख्खें मूल नाहीं असें जर त्या मुलाला तिऱ्हाईत गृहस्थाकडून कळलें तर त्याला विलक्षण धक्का बसतो. आणि म्हणून मुलाच्या हिताच्या दृष्टीनें आईबापांनीं आपणहून मुलाला सांगावें कीं आम्हांला एक चांगला मुलगा हवा होता व आम्हीं पाहिलेल्या सर्व मुलांत तूंच आम्हांला चांगला वाटल्यानें आम्हीं तुला आमच्या घरीं आणलें, आतां तूं आमचाच आहेस. असें म्हणण्यानें आपण सख्खे नाहीं या भावनेचा अभाव, अनेक मुलांतून मला निवडलें ह्या अभिमानानें भरून निघतो, व तिऱ्हाइताकडून माहिती कळल्यावर बसणारा धक्का टाळला जातो. मानलेल्या घरांत व दत्तक–पद्धतीमध्यें सर्वांत मोठा फरक असा आहे कीं मानलेलें घर केव्हांहि सोडतां येतें, परंतु दत्तक–पुत्र ही जन्मभर न टळणारी जबाबदारी आहे. म्हणून मुलगा दत्तक देण्यापूर्वी व घेण्यापूर्वी संपूर्ण विचार करायला हवा, नाहीं तर अनवस्था प्रसंग ओढवतो, आणि कायद्याची गुंतागुंत टाळतां येत नाहीं ती नाहींच.

**(७) परवाना पद्धति—** ( Licensing ) ज्या वेळीं मुलाला सुधारण्याकरितां शाळेंत पाठविण्यांत येते, त्या वेळीं त्याला सुधारण्याकरितां लागणारा संपूर्ण कालावधि दिलेला असतो. समजा एका मुलाला तीन वर्षांकरितां शाळेंत पाठाविण्यांत आलेलें आहे. आणि दोन वर्षांनंतर मुलानें शाळेचें शिक्षण पूर्ण केलें, त्याची वागणूकहि चांगली आहे, असें दिसलें तर त्या मुलाला परवाना देऊन घरीं सोडण्यांत येतें. कोर्टानें दिलेला तीन वर्षांपर्यंतचा कालावधि पूर्ण होईपर्यंत त्याला देखरेखीखालीं राहावें लागतें. व ह्या देखरेखीच्या कालावधीमध्यें जर मुलगा पुन्हा वाईट मार्गाला लागतो आहे असें वाटलें तर त्याचा परवाना रद्द करून त्याला पुन्हा संमत–शाळेंत पाठविण्यांत येतें. परवान्यावर मुलाला सोडावें किंवा न सोडावें हें ठरविण्याकरितां शाळेची एक हितचिंतकांची समिति (Visiting Committee) नेमलेली असते, व ह्या समितीमध्यें त्या मुलाच्या पूर्वेतिहासाचा व शाळेंतील वागणुकीचा विचार करून व समितीला योग्य वाटल्यास मुलाला परवान्यावर सोडण्यांत येतें. समाजामध्यें मुलांच्या जीवनाची विस्कटलेली घडी पुन्हा बसविण्याकरितां ह्या पद्धतीचा चांगला उपयोग होतो.

(८) चौकशी व देखरेख (Inquiry and Supervision) : पूर्वी व्यक्तिसाहाय्याच्या ज्या तंत्राचा उपयोग केला त्याच तंत्राचा उपयोग करून मुलाचा पूर्वेतिहास शोधून काढणें व देखरेख करणें ह्या क्रिया केल्या जातात. चौकशी करतांना मुलाच्या अपराधाची चिकित्सा हा उद्देश मनांत असतो. देखरेख करतांना मुलानें सुधाण्याचे सर्व प्रयत्न आपले आपण करावे, व त्या प्रयत्नाला समाज-सेवकानें हातभार लावावा ही भूमिका असते. याच कार्यपद्धतीमध्यें सल्लामसलतीचा ( Councelling ) पुष्कळ उपयोग होण्यासारखा असतो. सल्ला देतांना त्या मुलाची अडचण लक्षांत घेऊन ती अडचण कोणच्या प्रकारें दूर करतां येईल याचा विचार करावा लागतो. कोणत्या संस्थेकडून कोणत्या तऱ्हेची व्यवस्था होईल ह्याचें संपूर्ण ज्ञान असल्याशिवाय असा सल्ला देणें कठीण असतें, म्हणून सल्ला देणाऱ्या प्रत्येक समाज-सेवकानें आसपासच्या सर्व संस्थांची माहिती घेणें, आसपास कोणत्या सोई उपलब्ध आहेत याचें ज्ञान करून घेणें आवश्यक असतें.

बिघडलेल्या मुलावर चिकित्सेकरितां व उपचाराकरितां अनेक व्यवसायांचा, खेळांचा व कलांचा उपयोग केला जातो. मुलाचें खेळतांना निरीक्षण करून त्याच्या मनाची घडण समजावून घेता येते. एखाद्या मुलाच्या व्यक्तिमत्त्वामध्यें, लाजाळूपणा, उद्धटपणा किंवा तत्सम कांहीं दोष निर्माण झाले असतील तर ते दूर करण्याकरितां खेळांचा उपयोग केला जातो. ( Play Therapy ). त्याचप्रमाणें ज्या मुलाच्या शरीरामध्यें मानसिक व शारीरिक कारणामुळें पंगूपणा निर्माण झालेला असेल त्या मुलाला आपल्या इंद्रियावर पुन्हा ताबा मिळविण्याकरितां सोपे सोपे उद्योग देण्यांत येतात. या उद्योगांच्या द्वारें दोन हेतू साधतात. एक तर तीं मुलें आपल्या अंगांत नवी शक्ति निर्माण करतात; दुसरें म्हणजे त्यांच्या भौतिक पुनःस्थापनेकरितां या औद्योगिक शिक्षणांचा उपयोग करण्यांत येतो. अशा पद्धतीला व्यवसायात्मक उपचार किंवा ऑक्युपेशनल थिरपी असें म्हणतात. अशा तऱ्हेचें पहिलें एक केन्द्र मुंबईच्या के. ई. एम्. हॉस्पिटलमध्यें डॉ. कमला निमकर ह्यांनीं सुरू केलें आहे. मुलाच्या चिकित्सेकरितां चित्रकला, नाट्य, संगीत वगैरे कौशल्यें यशस्वीपणानें उपयोगांत आणतां येतात. सदाशिव नांवाचा बुद्धीनें मागासलेला एक मुलगा होता. त्या मुलाची मुलाखत घेतांना त्याला

लवकर कळावें व घरीं त्याच्यावर कोणाचें प्रेम आहे हें पाहण्याकरितां मी चित्रें काढून " हा रस्ता, हें घर " असें दाखविलें. भावाबहिणींचें चित्र काढल्यानंतर व त्याची माहिती विचारून झाल्यानंतर रेषा व टिंबें ह्यांच्या साहाय्यानें वहिनीचें चित्र काढलें. भावाबहिणीविषयीं माहिती मिळाल्यामुळें मीं सदूला विचारलें " आतां भाऊबहिणीचें चित्र खोडूं का ? " त्यावर तो म्हणाला, " भावाचें व बहिणीचें चित्र खोडायला हरकत नाहीं, पण वहिनीचें चित्र खोडूं नका, " अशा तऱ्हेनें त्याच्या मनाचा एक न समजलेला कप्पा अचानक उघडला. व त्याला वहिनीविषयीं वाटणारी आपुलकी स्पष्ट झाली. अशा रीतीनें अनेक व्यवसायांच्या द्वारें बालमनाची चिकित्सा व उपचार करतां येतात.

आतांपर्यंत बालकल्याणाच्या क्षेत्रांत जीं तंत्रें ( Techniques ) वापरलीं जातात, त्यासंबंधी थोडें विवेचन केलें आहे. आतां या क्षेत्रांत कांहीं विशेष स्वरूपाची जी यंत्रणा वापरण्यांत येते तिचा विचार करूं.

(१) **बाल–संरक्षक पोलिस दल** (Juvenile Aid police Unit) : लोकशाहीच्या बदलत्या कल्पनेबरोबर पोलिस हा केवळ कायदे अंमलांत आणणारा अधिकारी राहिलेला नसून गुन्हेगारापासून समाजाचें रक्षण करणारा व चुकलेल्यांना मार्गदर्शन करणारा मदतनीस बनलेला आहे, व या दृष्टीनेंच उन्मार्गी मुलांच्याकरितां स्वतंत्र पोलिसदल बहुतेक सुधारलेल्या राष्ट्रांमध्यें स्थापन करण्यांत आलेलें आहे. हें दल संख्येनें लहान असलें तरी त्याचें कार्य-क्षेत्र विस्तृत असतें. ज्या ठिकाणीं मुलें वाईट मार्गाला लागतात, त्या जागीं बाजार, चित्रपटगृहें, हॉटेल्स्, वेश्यागृहें, नाटकगृहें ह्यांवर देखरेख ठेवणें, रस्त्यावर पडलेल्या अनाथ मुलांचा ताबा घेणें वगैरे प्रतिबंधक स्वरूपाचें कार्य हें पोलिसदल करीत असतें. असें दल सुरू करण्याचा प्रयत्न मद्रास राज्यांत केला जात आहे व मुंबई राज्यांत असें दल सुरू झालेलें आहे. ( २ ) **बाल-हितचिंतक मंडळें** ( Associate Child Welfare Boards ). पुष्कळदां मुलें बारीक सारीक कारणाकरितां कोर्टापुढें आणलीं जातात व अशा तऱ्हेच्या चौकशी करतांना कोर्टाचा वेळहि जातो व चौकशीचें स्वरूप सुद्धां अनौपचारिक असतें. शिवाय कोर्टापुढें आणल्यानें मुलांच्या मनावर गैर परिणाम होण्याचा संभव असतो. म्हणून अशा मुलांना कोर्टापुढें न आणतां

त्यांची परस्पर चौकशी करून त्यांची व्यवस्था लावण्यांत येते. हें करण्याकरितां कांहीं समाज-सेवक, कांहीं मनोव्यथा शास्त्रज्ञ व कांहीं मानसशास्त्रज्ञ ह्यांचें मंडळ नमण्यांते येतें, अशा तऱ्हेची व्यवस्था हॉलंड, स्वित्झर्लंड, व नॉर्वे या देशांत विशेषेंकरून प्रचलित आहे. अशा व्यवस्थेमुळें कोर्टापुढें येणाऱ्या मुलांची संख्या कमी होते. मुलांची चौकशी लवकर होते व अनौपचारिक पद्धतीनें काम चालवितां येतें. अशी सोय करावी म्हणून मुंबई राज्यांत प्रयत्न चालू आहेत.

( ३ ) **परिवीक्षा समिती :** परिवीक्षेखालीं असणाऱ्या मुलांच्या प्रश्नांचा विचार करण्याकरिता व परिवीक्षा-पद्धतीचा विकास करण्याकरितां निमसरकारी व खाजगी सेवकांची समिति नेमण्यांत येते. त्याला परिवीक्षा समिती किंवा प्रोबेशन कमिटी असें म्हणतात. अशा तऱ्हेच्या समित्या मुंबई राज्यांत कांहीं ठिकाणी स्थापन करण्यांत आलेल्या आहेत. (४) **बाल-मार्ग-दर्शन-** केन्द्रासंबंधीं उल्लेख पूर्वीं आलेलाच आहे. ह्या केन्द्रांतून मुलांच्या मनाची चिकित्सा करून त्यांना उपाययोजना सांगितली जाते. बाल-मार्ग-दर्शन केन्द्राला ( Child Guidance Clinics ) उन्मार्गी मुलांच्या सुधारणेच्या क्षेत्रामध्यें अत्यंत महत्त्वाचें स्थान आहे. परंतु तज्ज्ञ कार्यकर्त्यांच्या अभावीं अशीं केन्द्रें सुरू करणें सगळी कडेच शक्य होत नाहीं. आज अशीं दोन केन्द्रें मुंबईमध्यें, एक पुण्यामध्यें व एक बडोदें येथें आहे.

बाल-सुधारणेच्या कार्यांमध्यें समाजाचा दृष्टिकोन हा अतिशय उपयोगी असतो व तो दृष्टिकोन बदलण्याकरितां व सुधारण्याकरितां समाज-सेवेचें नवें तत्त्वज्ञान लोकांच्या पर्यंत जाऊन पोंहचवायला लागतें. हें विचार-प्रसाराचें काम करण्यासाठीं व समाजसेवेचें सुसूत्रीकरण करण्यासाठीं समाज-सेवेचें स्वतंत्र खातें निर्माण झाल्यास सुधारण्याच्या दृष्टीनें जलद पावलें टाकतां येतात. स्वातंत्र्याबरोबर राष्ट्राच्या सर्वांगीण विकासाकरितां निरानिराळ्या सामाजिक क्षेत्रांत जोमानें कार्य सुरू झालेलें आहे. सामाजिक कार्याचा व्यापक प्रसार पाहिला म्हणजे अशा तऱ्हेचें खातें कां असावें हें स्पष्ट होतें. जगांतील अनेक सुधारलेल्या राष्ट्रांत अशा तऱ्हेचीं खातीं आहेत. अशीं खातीं ( Ministries of SocialWelfare ) जर लौकर स्थापन झाली तर हा प्रश्न योग्य वेळीं व योग्य रीतीनें हाताळतां येईल. ह्या समाज-सेवेच्या खात्यांतील किंवा

आज अस्तित्वांत असणाऱ्या तत्सम खात्यांतील नामाभिधानें (Nomenclature) लोकांना कळतील अशी व अर्थवाहक असावी. बोर्स्टल स्कूल्स, फिट पर्सन इंडिव्हिज्युअल, इन्स्पेक्टर ऑफ सर्टिफाईड स्कूल्स, वगैरे शब्द जितके अर्थवाहक असायला पाहिजेत तितके नाहींत. कित्येकांच्या मागें पाश्चात्य कल्पना आहेत. त्या सहजीं लक्षांत येत नाहींत म्हणून या क्षेत्रांतील नामाभिधानें व परिभाषा अधिक अर्थपूर्ण करण्याचे प्रयत्न केले गेले पाहिजेत. मुंबई राज्यांत अशा तऱ्हेचे प्रयत्न चालू आहेत. एकमेकांच्या अनुभवापासून धडा देणें व नवीन कल्पना शोधून काढणें याकरितां अवलोकन व संशोधन (Survey and Research) होणें महत्त्वाचें आहे. हें कार्य सामाजिक परिषदा (Indian Conference of Social work) समाज-सेवा संघटन मंडळें (Co-ordinating Councils of social Service Agencies) वगैरे संस्थांच्या वतीनें व्हायला हवें. मुंबई राज्यांतील प्रोबेशन ऑफिसर्स व सुपरिंटेंडेंट्स याची एक स्वतंत्र संघटना असून तिच्या वतीनें समाज-सेवा नांवाचें इंग्रजी मुखपत्र चालविण्यांत येतें.

वरील सर्व तंत्र व साधनें ह्यांचा संपूर्ण विचार केला असतां ह्या क्षेत्रांत आपण किती मागें आहोंत ह्याची जाणीव भारतामध्यें अग्रेसर असणाऱ्या मुंबई राज्यातील कार्यकर्त्यांना सुद्धां झाल्याशिवाय राहणार नाहीं. परंतु ह्या क्षेत्रांत कार्य करणाऱ्या कार्यकर्त्यांना जोंपर्यंत प्रत्येक मुलगा हा मूलतः चांगला आहे व तो एखादे वेळीं चुकला असतां सुद्धां पुन्हा सुधारून समाजाचा उपयोगी घटक बनूं शकतो अशी श्रद्धा आहे तोंपर्यंत आम्हां कार्यकर्त्यांना पुढें जायला वाव आहे. उद्यांच्या यशाची खात्री आहे.

  

: ११ :

# उपसंहार

छगन हंसला; यावर चटकन् माझा सुद्धां विश्वास बसला नाहीं. पण बघतों तों छगन खरोखरच हंसत होता. त्याचे चिमणे डोळे तान्यांच्या तेजानें चकाकत होते. पण फक्त डोळेच हंसत होते. कदाचित् छगनच्या ओठांना हंसायची संवयच नसावी. बाकी एका अर्थानें तें खरें आहे, कारण छगन प्रथम रिमांड होममध्यें आला तेव्हांपासून त्याच्या चेहऱ्यावर एक प्रकारची उदासीनता पसरलेली असे. पांच सहा वर्षांचा छगन, पण त्या छोट्या आयुष्यांत त्यानें असे आघात सोसले होते कीं त्याला आतां रडायलाहि येत नव्हतें, हंसायलाहि येत नव्हतें. अगदीं लहान वयाचा स्थितप्रज्ञ होता तो. लहानपणींच पोरका झालेला पोरगा तो, त्याला सर्वांनींच फसवल्यासारखें वाटत होतें. त्यामुळें चांगल्या गोष्टींकडेहि तो अशा संशयानें पाही कीं जणूं त्यामागें कांहीं वाईट लपलेलें असेल.

मला आठवतें आहे; छगन आला त्या वेळीं, त्याला आणणाऱ्या पोलिसाकडे, कोर्टाच्या न्यायाधिशाकडे, आम्हां कार्यकर्त्यांकडे, तो अशा विलक्षण दृष्टीनें बघत होता कीं आम्ही सर्व खाटीक, त्या कोकराला कापायला निघालों होतों जणूं. माझ्या मनांत चटकन् आलें कीं, छगनच्या मनांत विश्वास निर्माण करणें किती अवघड असेल. सशाचीं पोरें, दबकत दबकत बघतात त्याप्रमाणें तो सर्वांच्याकडे पाहात होता, पण कोणाची नजर त्याच्याकडे वळतांच तो

दुसरीकडे पाही. त्याला घातलेला काळपट सदरा, गुडघ्याच्या खालीं लोंबत होता त्यामुळें विजार नसल्यासारखेंच वाटे. मानेवर केस वाढून जटा झाल्या होत्या. कित्येक वर्षांत न धुतल्यामुळें पाय काळवंडले होते व त्यावर एक लांब ओरखडा दिसत होता. मनाच्या प्रमाणेंच जणूं त्याच्या शरीराचाहि तोल त्याला साधत नव्हता, कारण तो मधून मधून दिडक्या पावलावर उभा राही व फार अस्वस्थ वाटूं लागलें म्हणजे ती अस्वस्थता दाबून टाकण्या-करितां सदऱ्याचा पुढचा भाग तोंडांत घालून चोखत बसे. छगनबरोबर त्याचा धाकटा भाऊ होता. दोघेहि कोपऱ्यांत भिंतीला इतके चिकटून उभे राहिले होते कीं जणूं त्या भिंतींतच नाहींसे व्हावे असें राहून राहून त्यांना वाटत असावें. आंतील मुलांच्याकरितां मास्तर केळ्यांचे घड घेऊन जात होते. छगनचा धाकटा भाऊ त्या केळ्यांच्याकडे भुकेल्या नजरेनें पाहात होता व मास्तरांच्या चालण्याप्रमाणें त्याचे डोळे केळ्यांच्या मागें मागें जात होते. छगनच्या हें बहुतेक लक्षांत आलें. त्याला वाटलें कीं चारचौघांत असें वागणें हें बरें नव्हे. छगनच्या मनांतील सभ्यतेचा विचार जागा झाला व त्यानें डोळे वटारून भावाकडे पाहिलें. इतक्यांत भावानें समोरून येणाऱ्या पोलिसाला पाहिलें व तो छगनच्या आड झाला. छगनच्या दृष्टींत लगेच बदल झाला व त्यानें भावाला पाठीशीं घातलें. सहा वर्षांचा छगन, चार वर्षांच्या भावाचा बाप होता, आई होता, आणि त्याच्यासारखाच भेदरलेला होता.

असा होता आमचा छगन. असा रडवेला चेहरा असायचा त्याचा कीं ह्या चेहऱ्यावर हंसूं फुटण्याची वहिवाटच नसावी असें वाटे. सदा तो आपल्या धाकट्या भावाच्या काळजींत असायचा. एकदां काय झालें कीं छगनचा भाऊ केळीं वांटतांना नव्हता. मास्तर विसरले वाटतें पण छगनच्या भावाला केळें मिळालें नाहीं. पण छगनच्या नेहमींच्या पद्धतीनें त्याचें लक्ष होतेंच त्याच्याकडे. भावाला मिळालें असेल ह्या समजुतीनें छगननें स्वतःचें केळें खाऊन टाकलें होतें. पण इतक्यांत त्याला जेवण–घरांत पांच सहा केळीं थाळींत ठेवलेलीं दिसलीं. केळीं घ्यावीं तर चोरी होती. न घ्यावीं तर धाकट्या भावाकरितां पोटांत गलबलायला लागे. अशा विचारद्वंद्वांत तो सांपडला होता. एकदां मी कागद पाहण्यांत गुंतलों आहे कां नाहीं हें पाही. एकदां त्या केळ्यांच्याकडे पाही व भावाकडे बघे. माझ्या हें लक्षांत आलें आणि मी

उठलों, छगननें नेहमींप्रमाणें अंगाची जुडी आणखीच घट्ट केली व मान खालीं घालून बसला. पण मीं दोन केळीं उचललीं व त्या दोघांना तीं दिलीं. तीं केळीं आपल्याला मिळालीं ह्यावर त्याचा विश्वासच बसेना. जणूं तीं केळींच नसावीं अशा रीतीनें छगन पाहात होता. त्यानें तीं घाईघानें घेतलीं व भावाच्या सदऱ्यांत टाकलीं. त्यानेंहि सदऱ्याचें खालचें टोंक वर उचलून तीं लपवल्यासारखें केलें. जणूं कांहीं न खातांच पोट भरलें होतें. मी पाहिलें तों खरोखरच छगन हंसला. जणूं त्याच्या मनचें मीं ओळखलें होतें. त्याचे डोळे हंसत होते. ह्या आठवणींबरोबरच माझ्या मनाला पंख फुटतात व जेथें छगन आतां आहे तेथें मी पोंचतों. तो स्मृतीचा स्पर्श होतांच, छगनला हंसूं फुटतें, त्याचे डोळे चकाकतात.

छगनसारखीं अनेक मुलें आहेत. त्यांचें जीवन म्हणजे स्वप्नच असतें जणूं. आपल्या जागृत मनानें पाहिलेल्या गोष्टी जागृतीमध्यें विसरून जात असल्या तरी त्या सुप्त मनांत कोठेंतरी राहतात आणि झोपेमध्यें, जागृतीचा पडदा दूर होतांच स्वप्नांच्या धूसर वातावरणांत, विलक्षणपणें एकत्र येऊन जागृत मनाला विसंवादी वाटणारा पण स्वप्नभूमीवर सुसंगत भासणारा एक स्मृतिप्रवाह निर्माण करतात. ह्यामधूनच नवीन वाटणारीं क्षणचित्रें निर्माण होतात व दहिंवराप्रमाणें क्षणांत विरतात. त्या एका क्षणाच्या स्वप्नरंजनांत वर्षांच्या वर्षें गेल्यासारखीं वाटतात. त्याचप्रमाणें ह्या नावडत्या मुलांचें असतें. लहान कालावधीमध्यें, थोड्या वर्षांत त्यांनीं अनेक वर्षांचा अनुभव घेतलेला असतो. जागृत नागरिकांना ज्या गोष्टी तर्कदुष्ट व बेकायदेशीर वाटतात त्या गोष्टी ह्या मुलांना तर्कशुद्ध व सुसंगत वाटत असतात. ह्या मुलांच्या अतार्किक वागण्याच्या पद्धती अभ्यासल्या म्हणजे त्यांना ह्या चलाख कल्पना कशा सुचल्या याचें आश्चर्य वाटूं लागतें. आगगाडींत भेटलेल्या एका बूटपॉलिशवाल्या मुलाला मीं म्हटलें, “ अरे, असें गाडींत येणें हा गुन्हा आहे. तुला धरून नेतील ना ! ” त्यावर त्या पोरानें सांगितलें कीं “ धरून ऑफिसांत नेऊन तरी काय करतील ? त्यांच्या बुटाला पॉलिश लावून घेतील आणि सोडून देतील. ” हे उद्‌गार सर्वस्वीं खरे नसतील कदाचित्, पण त्यामागें असणारा अनुभव विसरतां येणार नाहीं. आठआठ, दहादहा वर्षांचीं मुलें बोलतांना जीवनाचें तत्त्वज्ञान सांगतांना भेटतात. “ साहेब, चांगलें राहून शेवटीं उपाशींच

मरायचं ना ? आम्हीं घड्याळ चोरलें तर शिक्षा करतां पण काळा बाजार करून तुम्हांला देणगी दिली कीं त्याचा पुतळा उभारतां.'' ह्या मुलांचें असलें तर्कशास्त्र चुकीचें असेल कदाचित्, पण तें त्यांच्या मनांत रुजवायला, आपणच कारणीभूत आहोंत ना ? याचा विचार प्रत्येक सुबुद्ध नागरिकानें करायला हवा.

ह्या क्षेत्रांत काम करणाऱ्या प्रत्येक कार्यकर्त्यालाहि ह्याची जाणीव असायला हवी कीं जें तत्त्वज्ञान आपण सांगतों आहों, ज्या सत्प्रवृत्तीचा उपदेश आपण करीत आहों, त्याचें उदाहरण आपल्या वागण्यांत दिसलें पाहिजे. समाजसेवा ही व्यावसायिक झाली तरी ती मूलतः श्रद्धेवर आधारलेली व सहृदयतेनें अवलंबिलेली असावी. कारण ज्या यांत्रिकतेनें प्रयोगशाळेंत आपण रसायनें तपासतों, ज्या निर्जीवतेनें सांगतों कीं अमुक रसायनांत अमुक भार दुसरें रसायन ओतलें, म्हणजे अमुकअमुक गुणविशेष असणारा द्रव तयार होईल; ती यांत्रिकता समाजसेवेमध्यें व सामाजिक शास्त्रांत असत नाहीं. मानसशास्त्राच्या मूलभूत सिद्धान्ताप्रमाणें प्रत्येक माणसाचें मन व स्वभाव वेगळा व गतिशील आहे. त्यामुळें समाजसेवेमध्यें वैयक्तिक संबंध, प्रेम व श्रद्धा यांना अपार महत्त्व आहे. मुलांचें मन म्हणजे घड्याळाचे सुटे भाग नव्हेत कीं तंत्रज्ञानानें ते जोडतां यावे, त्यांची सुधारणा करतां यावी. मूल हें प्रेमावर जगणारें रोप आहे. म्हणून तंत्रज्ञान असणाऱ्या कार्यकर्त्यांनीं मुलांना प्रेम लावायला हवें. बालककल्याणाच्या तत्त्वज्ञानावर श्रद्धा ठेवावी. प्रेम व श्रद्धा वगळून केलेलें कार्य म्हणजे पैसे व शक्ति फुकट घालवण्याचा उद्योग आहे. त्याचप्रमाणें ह्या कार्याविषयीं सहानुभूति बाळगणाऱ्या कार्यकर्त्यांनीं व लोकांनीं हें विसरूं नये कीं घड्याळावर केवळ प्रेम असून घड्याळ दुरुस्त करतां येत नाहीं. त्याला शास्त्रीय ज्ञान लागतें व त्या ज्ञानाविना ह्या क्षेत्रांत काम करतां येणें अशक्य आहे.

मुलांना मानवी सुधारणेच्या व संस्कृतीच्या घडणीमध्यें फार श्रेष्ठ असें स्थान आहे. माझ्या एका इंडोनेशियन मित्रानें तेथें प्रचलित असलेली मुलासंबंधीं कल्पना मला सांगितली होती. तेथें मुलांना मानवी संस्कृतीची बँक मानण्यांत येते. प्रत्येक पिढीला जीं संस्कृतीचीं अशीं नवीं मूल्यें दिसतील सुधारणेचीं नवीं अंगोपांगें स्पष्ट होतील तीं त्यांनीं ह्या बँकेंत ठेवायचीं व त्या सुवर्णकोषाच्या आधारावर पुढील पिढीनें संस्कृतीची धुरा पुढें न्यायची; कारण भोंवतालच्या निसर्गाशीं व परिस्थितीशीं झगडा करून, युगायुगाच्या

परिश्रमानें सामाजिक संकेताची जोपासना करून मागील पिढीनें दिलेल्या पाथेयांत भर घालून ती शिदोरी पुढील पिढीच्या हातांत देणें हें प्रत्येक पिढीचें जीवितकार्य असतें. ह्या संस्कृतीच्या महान् यात्रेमध्यें आपण केवळ एका विशिष्ट कालापुरतेच घटक असतों. आपलें काम संपलें कीं आपण थांबतों, पण यात्रा मात्र चालूच राहते. केवळ ह्याच अर्थानें ' खलील जिब्रान ' या श्रेष्ठ तत्त्वज्ञान्यानें आईबाप व मुलें ह्यांच्यासंबंधीं लिहितांना असें म्हटलें कीं " बालकरूपी चैतन्यबाण सोडणारीं तुम्ही धनुष्यें आहांत... तुम्ही त्यांना प्रेम द्या पण आपले विचार मात्र देऊं नका, कारण त्यांना स्वतःचे विचार आहेत. त्यांच्या शरीरासाठीं तुम्ही त्यांना घरें बांधून द्या, पण त्यांच्या आत्म्याकरितां मात्र तीं देऊं नका......"

भारताच्या दृष्टीनें विचार करतांना सुद्धां असें दिसतें कीं स्वातंत्र्यप्राप्तीनंतर राष्ट्राच्या दृष्टीनें महत्त्वाचीं अनेक रचनात्मक कामें करायचीं आहेत व त्याचाहि मुख्य बोजा ह्या मुलांनांच उचलायचा आहे. स्वातंत्र्यानंतर समृद्धीचें युग यावयाचें असेल तर तें युग त्यांच्याच हांकांनीं येणार आहे. ह्या मुलांच्या मधील कित्येक मुलें अनाथ आहेत, उपेक्षित आहेत, कांहीं मनानें व शरीरानें अपंग आहेत. योग्य मार्गदर्शन न मिळाल्यामुळें कित्येकांच्या मनांत उन्मार्गी वृत्ति डोकावत आहेत. परंतु ह्या सर्व मुलांच्यामध्यें एक प्रचंड सुप्त शक्ति आहे. ती शक्ति योग्य कारणीं लावली तर मातीचें सोनें करतां येईल. त्या मुलांच्या हातामध्यें लपलेलें कौशल्य आहे व चिमुकल्या मनामध्यें विचारांची धडपड चालू आहे. उसळणाऱ्या शक्तीमध्यें कांहींतरी करून दाखवावें अशी ईर्षा आहे. चमकणाऱ्या डोळ्यांमध्यें उद्यांची आशा आहे,म्हणून आज तीं क्षणभर आपणांला नावडतीं वाटलीं तरी अखेर ती आपलींच मुलें आहेत. तीं चुकत असलीं तर आपल्यामध्यें, आपल्या समाजरचनेमध्यें कांहीं चुकत आहे असें मानून ह्या नावडत्या मुलांना जवळ करायला हवें. त्यांच्या सुप्त शक्तीच्या विकासाला वाव द्यायला हवा, कारण आजचीं स्वप्नें साकार करण्याचें सामर्थ्य त्यांच्यांतच आहे. आजचे कन्यापुत्र आवडते असोत अगर नावडते असोत, अत्यंत खऱ्याखुऱ्या अर्थानें भारताचे भाग्यविधाते तेच आहेत.

मानवतेच्या महायात्रेमध्यें मुलांना असणाऱ्या असाधारण महत्त्वामुळेंच असें वाटतें कीं ज्यांना समाजानें टाकलें त्यांना जवळ घेण्यांत; ज्यांचे अश्रु

